रवीन्द्र प्रतिभेचे

# कोंवळे किरण

[ लिपिका ]

अनुवाद व रसग्रहण

काका कालेलकर




नवजीवन प्रकाशन मंदिर
अहमदाबाद

# वातावरण

'अिंग्रज राज्यकर्त्यांनीं हिन्दुस्थान सोडून गेलेंच पाहिजे' अशी निर्वाणीची नोटीस देणारें आंदोलन महात्मा गांधींनीं सन १९४२ सालीं जोरानें चालवलें. आणि सरकारनें त्यांना व त्यांच्या जवळच्या आणि दूरच्या लाखो अनुयायांपैकीं जितक्यांना साधलें तितक्यांना जेलमधें डांबून टाकलें. तरीहि सरकारला सुरक्षित वाटेना. हे लोकनेते जेलमधें बसल्या बसल्या कशीं सूत्रें हालवतील आणि काय अुत्पात करतील याचा नेम नाहीं अशा भयानें सरकारनें त्यांना त्यांच्या प्रान्तांतून हलवून दूरच्या प्रान्तांत नेअून ठेवलें.

कदाचित् माझ्या पायावर चक्रें असल्यामुळें मला नेहमींच प्रवास घडत असतो. अेके ठिकाणीं रहावयाचा आराम मिळावयाचा तो तुरुंगांत. पण पायावरचीं चक्रें तुरुंगांत देखील अेके ठिकाणीं कशीं बसूं देणार? 'भारतांतून पाय काढा' या चळवळीच्या दिवसांत मला सहा वेळां तुरुंग बदलावे लागले. अेवढेंच नव्हे, तर तुरुंगांत मला अुत्तरोत्तर बढतीहि मिळूं लागली. जेलमधें पाठवलें तेव्हां माझा दर्जा नक्की झाला नव्हता. प्रथम अेकदोन दिवस तर अुपासमारच काढावी लागली. मग माझा दर्जा ठरला तिसरा. नंतर वाटचाला आला दुसरा. पुढे मिळाला पहिला दर्जा आणि शेवटीं विशेष दर्जा. या शेवटच्या परिस्थितींत श्री. किशोरलालभाअींना ते आजारी आहेत म्हणून अेक सेवक देण्याचें नक्की झालें. यापूर्वी मीहि अेक लेखक मित्र असावा अशी मागणी केलीच होती आणि त्यामुळें आश्रमवासी श्री. शिवबालक बिसेन यांना तिसऱ्या वर्गांतून दुसऱ्या वर्गांत चढविण्यांत आलेंहि होतें. त्यांचीच योजना श्री किशोरलालभाअींच्या सेवेसाठीं होअून त्यांना आमच्या शेवटच्या शिवनी जेलमधें आणण्यांत आलें.

श्री. शिवबालक बिसेन हे जसे खादीकाम, सुतारी वगैरे अुद्योगांत निष्णात, तसेंच त्यांना साहित्याचीहि गोडी पुष्कळ. निरा आणि

ताडीमधून अुत्कृष्ट गूळ आणि साखर तयार करण्याची कला शिकतां शिकतां ते पूर्वबंगालांत पोंचले होते. आपल्या सेवापरायण प्रेमळ वृत्तीनें त्यांनीं तेथल्या बंगाली कुटुंबांत स्थान मिळवलें आणि अगदी घरचे होअून राहिले. पूर्व बंगालांत बोलली जाणारी अगदी थेट बंगाली भाषा ते समजूं बोलूं लागले. आणि माझेकडे असतांना त्यांनीं जवळ जवळ सगळें रवीन्द्र साहित्य मूळ बंगालींत वाचून काढलें.

श्री. विनोबा आणि मी शिवनी पूर्वी दक्षिणेकडे वेल्लोर जेलमधें असतांना आम्ही अनेक भाषा शिकण्याचा कार्यक्रम ठरविला. मी कानडी भाषेचें थोडेसें अध्ययन केलें आणि बरोबरच्या राजकैद्यांना बंगाली साहित्य वाचून दाखवण्याचा वर्ग काढला. विनोबांनीं तर दक्षिणच्या चारहि भाषा आपल्याश्या केल्या.

पुढें आम्ही जेव्हां शिवनी जेलमधें गेलों (१९४३–'४४) तेव्हां शिवबालक बिसेनची मदत मिळतांच आम्हीं बंगाली साहित्याचें आस्वादन सुरूं केलें. रविबाबूंची प्रख्यात कादंबरी 'गोरा' विनोबांनीं संपूर्ण अैकली; आणि तिचेविषयीं आम्ही महिना दोन महिने चर्चाहि केली.

अशा वातावरणांत रविबाबूंचा 'लिपिका' म्हणून अेक सुन्दर कलात्मक निबंधसंग्रह विनोद म्हणून मीं भाषांतर करावयास घेतला. श्री. बिसेननीं मूळ वाचावें आणि मीं त्याचें मराठी करून सांगेन त्याप्रमाणें त्यांनीं लिहावें असा आमचा क्रम होता. मधून मधून आम्ही शब्दचर्चाहि करीत असूं. शब्दाच्या पसंतीमधें शेवटचा निर्णय माझा असावा असें जरी आमचें ठरलें होतें तरी श्री. बिसेनजींचा जबर-दस्त आत्मविश्वास त्यांना केव्हां केव्हां स्वतःला पसंत असलेला शब्द लिहिण्याला बाध्य करी. 'लेखक' ते, तेव्हां मी करणार काय? आणि त्यांनीं कोणचा शब्द लिहिला आहे हें माझ्या ध्यानांत तरी कसें यावें? श्री. बिसेन नागपूरकडचे राहाणारे. हिंदी आणि मराठी दोन्ही भाषा त्यांना अगदीं जन्मभाषेसारख्या. साबरमती आश्रमांत राहिले असल्यामुळें गुजराती भाषा देखील अवगत. अशा परिस्थितींत ते जी शब्दयोजना करतील तिचेविषयीं विशेष चिंता

करण्याचें कारण नाहीं अशी माझी वृत्ति असल्यामुळें त्यांच्या आग्रहापुढें मान वाकवण्यांत मला कसलाच असंतोष नव्हता.

हें सर्व येथें अशासाठीं लिहिलें आहे कीं मराठी वाचकांना या भाषान्तरांतील कांहीं शब्दप्रयोग काकांच्या शैलीचे नव्हेत असें पाहून आश्चर्य वाटावयास नको.

आज मला स्पष्ट आठवत नाहीं. पण या पुस्तकांतील कांहीं तुरळक भाग मजकडून भाषान्तरित होण्याचें राहून गेल्यामुळें बिसेननींच तो पुरा केला असेल. तें कसेंहि असो. असें भाषान्तर देखील माझ्या नजरेखालून गेलेंच आहे. तेव्हां जबाबदारी माझी खरीच.

श्री. बिसेनजींची परवानगी असती तर सर्व भाषान्तर आम्हां दोघांचें आहे हें स्पष्ट करण्यासाठीं मुखपृष्ठावर माझ्या नांवाबरोबर त्यांचेंहि नांव मी आनंदानें घातलें असतें आणि फक्त निरूपणाच्या बाबतींत काय ती जबाबदारी माझी अेकटयाची, असें स्पष्ट केलें असतें.

२

'रवीन्द्रनाथांचा गूढवाद किंवा शून्यवाद आम्हांला मुळींच समजत नाहीं' असें महाराष्ट्रांतील अेकदोन नामांकित लेखकांनीं जाहीरपणें म्हटल्यामुळें मला विचार सुचला कीं रवीन्द्रनाथांच्या कांहीं वेंचीव कवितांचें भाषान्तर किंवा भावानुवाद मराठींत देअून त्यावर थोडक्यांत निरूपण लिहावें. संतवाङ्मयावर पोसलेल्या महाराष्ट्राला गूढ आध्यात्मिक गोष्टींचें सूचन दुर्बोध होअूं नये असें मला वाटतें. आणि रवीन्द्र तर जीवन-विमुख वैरागी अध्यात्मवादी नसून जीवनदेवतेचे परम अुपासक म्हणून नावाजलेले. आणि जीवनानुभव नसतो कुणाला ?

या खेरीज रविबाबू तर स्पष्ट म्हणतात कीं, 'माझ्या अनुभवा-प्रमाणें आणि कविकल्पनेप्रमाणें मला सुचेल तसें मी लिहितों. माझाच अर्थ तुम्ही घेतला पाहिजे असा माझा आग्रह नाहीं. अेवढेंच नव्हें तर माझ्या लिखाणाचा अर्थ करून सांगण्याच्या जबाबदारींतून मला मुक्त कराल तर मला आनंद होअील.'

तेव्हां अेवढें मोठें 'आर्थिक' स्वराज्य मिळाल्यानंतर आपण संकोच कां करावा?

रवीन्द्रांच्या कवितांवरील मनन लिहीत असतांना त्याच वातावरणांत 'लिपिके' चा अनुवाद सुरू केला. लिपिका हीं बहुतेक गद्यकाव्येंच आहेत. कांहीं निबंध आहेत, कांहीं रेखाचित्रें आहेत, कांहीं आहेत लहान लहान कथिका, तर कांहीं आहेत रूपक-कथा. अनुवाद करण्यापर्यन्त यांचा आस्वाद घेतला असतांना जो कांहीं आनंद हृदयांत स्फुरला त्याची नोंद मराठी वाचकांपुढें मांडणें अिष्ट वाटलें म्हणून हीं निरूपणें लिहिलीं आहेत. कित्येक मित्रांना ती विशेष आवडलीं म्हणूनच तीं मराठी वाचकांपुढें मांडण्याचें धारिष्टय केलें आहे. प्रत्येक निबंधासंबंधानें निरूपण किंवा रसग्रहण म्हणून थोडें-बहुत लिहिल्यानंतर सबंध पुस्तकाविषयीं प्रस्तावनेंत निराळें लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

रविबाबूंनीं वंगाब्द १३२४ ते १३२९ या दरम्यान निरनिराळ्या मासिकांतून हीं गद्यकाव्यें लिहिलीं होतीं. पुस्तकरूपानें छापतांना त्यांनीं कित्येकांचीं शीर्षकें बदललीं. जुन्या शीर्षकांमधें 'कथिका' हें नांव वारंवार येतें. हें नांव जर प्रथम हातीं येतें तर या सबंध पुस्तकाला 'लिपिका' न म्हणतां 'कथिका' म्हणणेंच मीं पसंत केलें असतें.

मराठी भाषांतराला मूळचें 'लिपिका' हें नांव ठेवण्यांत असलेलें अेक संकट अेका गृहस्थांनीं नुकतेंच माझ्या नजरेस आणलें. देवनागरी लिपि सुधारणेसंबंधानें गेल्या पंचवीस वर्षांत मीं बरीचशी प्रवृत्ति केली असल्यामुळें आणि लेखहि लिहिले असल्यामुळें 'लिपिका' हें नांव पाहून वाचकांना वाटावयाचें कीं काकांचें हें कांहीं येळकोट आहे. आणि बिचाऱ्या रवीन्द्रांची अेक कलाकृति लोकांच्या नजरेआड व्हावयाची. धोक्याची सूचना पटली आणि म्हणून पुस्तकाचें नांव ठेवलें — 'रवीन्द्र प्रतिभेचे **कोंवळे किरण**'. खात्री वाटते कीं वाचकांना हें नवें नांव आवडेल. कारण हिंवाळ्याच्या दिवसांत हें पुस्तक प्रकाशित होणार आहे!

नवी दिल्ली
विजयादशमी
२६–१०–'५५

**काका कालेलकर**

# अनुक्रम

# पायमळणीची वाट

## १

ही आहे पायमळणीची वाट.

ही आली आहे वनामधून मैदानांत, मैदानांतून पोहोचली नदीकांठीं, नदीच्या घाटावरील वडाच्या झाडाखालीं; त्यानंतर पैलतीरावरील पडक्या घाटावरून वळणें घेत शिरली आहे गांवामध्यें; पुढें अळशीच्या शेताच्या बाजूनें, आमराअीच्या छायेमधून, रथतळाच्या समोरून, चालत चालत कोणत्या गांवाला जाअून पोंचली आहे, कोण जाणे.

या वाटेनें माणसें तरी किती! कोणी माझ्या बाजूनें निघून गेलीं, कोणी बरोबर आहेत, कोणी दूरूनच दिसले; कुणाच्या डोक्यावर पदर आहे तर कुणाच्या नाहीं; कोणी पाणी आणायला जात आहे तर कोणी पाणी भरून घेअून परतत आहेत.

## २

दिवस मावळायला आला, अंधार वाढूं लागला.

अेके दिवशीं या वाटेविषयीं मला वाटलें होतें कीं ही माझीच वाट आहे, सर्वस्वी माझीच. आतां स्पष्ट कळून आलें आहे कीं, या वाटेनें अेकदांच, फक्त अेकदांच काय तो चालायचा परवाना घेअून मी आलों आहें.

अुलट दिशेनें परत पावलीं पुन: त्याच लिंबवनांतून, त्याच सरोवराच्या कांठानें, तोच द्वादश-लिंग मंदिराचा घाट, नदीचें वाळवंट, गवळीवाडा; तेंच धान्याचें खळें पार करून त्याच ओळखीच्या दृष्टिभेटी, त्याच ठराविक गोष्टी, तेच परिचित चेहरे यांच्या मेळाव्यांत पुन: परत जाअून म्हणतां येअील का, 'अरे, तेच हे!'

ही चालायची वाट आहे, परतायची वाट नव्हे.

## ३

आजच्या या धूसर संध्याकाळीं अेकदां मागें वळून बघतां वाटलें कीं, ही वाट म्हणजे अनेक विस्मृत पदचिन्हांची पदावलि आहे, भैरवीच्या सुरांत गुंफलेली !

आजवर जितके जितके वाटसरू या वाटेनें चालत निघून गेले, त्यांच्या जीवनांतील सर्वच गोष्टींना या वाटेनें आपल्या अेकमात्र धूलिरेखेंत संक्षिप्त करून अंकित केलें आहे; तीच अेकमात्र रेषा सूर्योदयापासून निघून सूर्यास्ताकडे चालली आहे. जणु अेका सोन्याच्या सिंहद्वारापासून दुसऱ्या अेका सोन्याच्या सिंहद्वाराकडे.

३

"हे पायमळणीच्या वाटे, अनेक काळच्या अनेक गोष्टींना आपल्या धुळीच्या बंधनांत बांधून नीरव करून ठेवूं नकोस ! मी तुझ्या धुळीवर कान मांडून आहें. मला त्या गोष्टी हळूंच कानांतल्या कानांत सांग."

रात्रीच्या काळया पडद्याकडे बोट दाखवून वाट चूप रहाते.

"हे पायमळणीच्या वाटे, अितक्या अितक्या वाटसरूंच्या अितक्या चिंता आणि अितक्या अिच्छा, सर्वच गेल्या तरी कुठें ?"

मुकी वाट कांहींच बोलत नाहीं, केवळ सूर्योदयापासून तो सूर्यास्तापर्यन्त आपलें सूचन फैलावून ठेवते.

"हे पायमळणीच्या वाटे, तुझ्या वक्षःस्थळावर अेके काळीं पुष्प-वृष्टी प्रमाणें जीं सगळीं पावलें पडलीं होतीं, कां आज तीं कुठेंच नाहींत ?"

वाळून नामशेष झालेलें फूल आणि गाअून स्तब्ध झालेलें गायन जेथें पोचलें, जिथें ताऱ्यांच्या प्रकाशांत न शमणाऱ्या संवेदनेची दिवाळी फुललेली असते, अशा त्या आपल्या शेवटाला वाट जाणत का असते ?

## निरूपण — पायेचलार पथ

१

विशाल आकाश, वाळूचें रण आणि अफाट समुद्र यांचें काव्य निराळें आणि पहाड, नदी, कालवे, रस्ते आणि अितिहास यांचें काव्य निराळें. वरच्या त्रिकुटाला फक्त असावेसें वाटतें, पसरण्यांतच त्यांना आनंद.

दुसरी टोळी यात्रेकरूंची. होय, पहाड देखील यात्रेकरूच म्हटला पाहिजे कसा दूरवर पोहोचलेला असतो! आपले हात पसरून हें जग किती वाव मोठें आहे हें त्याला शोधायचें असतें. पहाड जर परि-व्राजक नसेल तर रस्ताहि परिव्राजक नव्हे. रस्ता स्वतः कुठें चालत असतो? तरीहि कोणीहि कबूल करील कीं रस्ता म्हणजे चालणाऱ्यांची साधना. नदी वहात असते; त्यामुळें तिच्या पृष्ठभागावर स्वस्थ पडून राहिलें तरी आपल्याला पुढें पुढें जातां येतें. रस्त्याचें तसें नाहीं. तो स्वतः पडून असतो. पण कुणालाहि पडून राहूं देत नाहीं. म्हणतो, "चला चला. थांबूं नका. थकलांत तर वाटल्यास बाजूला बसून विसावा घ्या. पण पुनः अुठा आणी चालूं लागा."

पण कुठें? रस्ता म्हणतो, "कुठें बिठें तें मला ठाअूक नाहीं. चालण्याच्या शेवटीं पोहोंचणें आहे, थकणें आहे, मरणें आहे का कशांत तरी विलीन होणें आहे तें मी काय सांगूं? चालण्याच्या शेवटीं रण सांपडलें तर प्राण सोडा, जीवनसमुद्र सांपडला तर तदाकार व्हा आणि विराट आकाशच अुरलें तर त्यांत विरून जा. तो तुमचा प्रश्न आहे."

अेकदां अेक मनुष्य रस्त्यानें चालला. रस्ता वळणावळणांनीं डोंगरावर चढला, तिकडून खालीं अुतरला, शेतांतून गेला, कुरणांतून गेला. शेवटीं अेक नदी आली. मनुष्याला वाटलें येथें जाणें संपलें. नदी खळखळ हांसत म्हणाली, "मला पाहतोस आणि तरीहि म्हण-तोस जाणें संपलें? जरा आंत ये; म्हणजे तुला दाखवतें जाणें संपलें किंवा कसें तें!" मनुष्य लाजला. पण म्हणाला, "चुकलों.

मला अजून चाललेंच पाहिजे. पण तुझ्या चालीनें मला चालावयाचें नाहीं. मला पैलतीराला जाऊं दे." नदी म्हणाली, "तो तुझा पुरुषार्थ. माझी ना नाहीं." मनुष्य पैलतीराला गेला आणि मनांत म्हणाला, "आतां समजलें. रस्त्याच्या दोन्हीं बाजूला कधीं खंदक होते तर कधीं कुंपणें होतीं, कधीं घराच्या रांगा होत्या.

नदीच्या दोन्ही बाजूनें दोन तीर असतात."

अितक्यांत पैलतीरावर त्याला अेक मोठें झाड दिसलें. झाडाच्या छायेखाली तो जाअून बसला. झाड म्हणालें, "आराम घे हवा तेवढा. पण पहात नाहींस कां कीं मी अेक रस्त्याच्या बाजूचें झाड आहें. जो रस्ता सोडून तूं पाण्यांत पडलास तोच हा रस्ता पुढें जात आहे." आतां या मनुष्याला कळलें, रस्ता म्हणजे जीवन. नदी म्हणजेहि जीवन आणि रस्ता म्हणजेहि जीवन. येथें थांबतां येत नाहीं. कांहीं विसरलें तर थोडेसें परत जावें. त्याला हरकत नाहीं. जितक्या वेळां विसरायला होअील तितक्या वेळां परत गेलेंच पाहिजे. सुटका थोडीच होणार! पण पुनः पुढेंच चालावयाचें आहे. पुराणकार सांगतात, 'मरणाच्या वेळीं वैतरणी नदी लागते.' मघांच्या आपल्या नदीहून ही वैतरणी निराळी थोडीच असणार! तिलाही तरून गेलेंच पाहिजे. तिकडे दुसरा तीर लागणारच. तोहि म्हणणार, 'बसूं नका, चालूं लागा.' थकलेल्याची दया वाटून रस्त्यानें जरी 'चालूं लागा' म्हणून सांगितलें नाहीं, तरी त्याचे पाय त्याला थोडेंच बसूं देणार! वेदांत पायाला 'चरित्र' म्हणजे चालण्याचें साधन, म्हणतात. या साधनाची ज्यानें साधना साधली त्यानें अफाट विश्व पाहिलें. नुसत्या डोळयानें पाहूं शकला असता त्याहून अधिक विश्व त्याला पायाच्या मदतीमुळें पहावयास मिळालें. त्यानें विश्वाचें नांव ठेवलें — जगत्. जें जातें, चालत असतें, चालेल तोंवरच असूं शकतें तें जगत्. या जगांत जो थांबला तो गळाठला. चाक देखील धांवतें तोंवरच अुभें राहतें. थांबलें कीं पडलें.

मनुष्य पायानें चालतो तेव्हां त्याला यात्रा म्हणतात, प्राणानें चालतो तेव्हां त्याला जीवन म्हणतात. समुदायानें चालतो त्याला

समाज म्हणतात 'समं जना: अजन्ति गच्छन्ति अस्मिन् अिति समाजः,' लोक अेकत्र मिळून चालतात म्हणून तो समाज होतो. पिढयान् पिढया जेव्हां चालूं लागतात आणि दिक् आणि काल यांना ओतप्रोत करून जीवनपट विणतात तेव्हां त्याला अितिहास म्हणतात. ही सर्व जाणारी मंडळी. जग यांचेंच आहे. पुरुषार्थ यांचाच आहे. या साधकांनाच आजवर सिद्धि मिळत आली आहे. पण त्यांचें चालणें थांबलें नाहीं.

२

लहानपणापासून मी चालत आलों आहें. कौटुंबिक जीवनांतील माझा पहिला अनुभव म्हणजे मला घरांतून रस्त्यावर जाअूं देत नसत. म्हणे, 'याला वाअीट मुलांची संगत लागेल. अभद्र शब्द बोलायला शिकेल!' बाहेर गेलोंच तर तें नोकराच्या खांद्यावर बसून. त्यामुळेंच कदाचित असेल मला रस्त्याचें प्रेम वाटूं लागलें! चालण्याची संधि मिळाली आहे आणि ती मीं कधीं दवडली आहे असें झालें नाहीं. पायीं चाललों, गाडीघोडयावरून गेलों, होडी नावेंतून गेलों. मग आली आगगाडी. जीं जीं म्हणून साधनें अुपलब्ध झालीं तीं सर्व वापरलीं. पण मला सर्वांत आवडली ती पायगाडी. मनुष्याला पांगळा न बनवणारी जर अेखादी गाडी असेल तर ती हीच होय. ज्यांना पाहून मला आनंदाचा अुमाळा येअी अशा गोष्टी म्हणजे बैल, घोडे, गाडया, होडया, नावा, आगबोटी, मोटरी. पण ज्यांच्यापुढें माझें मस्तक नम्र होतें अशा वस्तु दोन. पूल आणि रस्ता. पुलावरून जातांना जितका आनंद होतो, तितकाच पुलाखालून जातांना होतो.

लहानपणीं जेव्हां अगदीं पहिल्याप्रथम व्याकरणाशीं टक्कर घडली, तेव्हां अुभयान्वयी अव्ययाची व्याख्या समजतांच प्रथम डोळयांपुढें अुभें राहिलें चित्र पुलाचें, त्यानंतर आगगाडीच्या दोन डब्यांतील सांखळीच्या आंकडयाचें. रस्त्यावरून पुष्कळ चाललों, पण अेका रस्त्यावरून जात असतां झाडांच्या रांगेमधून जाणारा दुसरा रस्ता दुरून दिसला कीं त्याला हांक मारावीशी वाटे. पण रस्त्यांचें

खरें दर्शन जें झालें तें पहाडावरून. विस्तीर्ण प्रदेशांतून, झाडांवनांतून, तळघांना वळसे देत शेतांमधून वाट काढत जेव्हां रस्ता चालतो तेव्हां मला वाटतें, 'हा कुणी तत्त्वज्ञानी आहे. अज्ञाताचा वेध करून सर्व कांहीं ज्ञात करण्याचा हव्यास याला आहे.' अगदीं लहानपणीं सातान्याजवळचा बोगदा पाहिला होता. हें सर्व जणुं कांहीं मींच केलें आहे अशा अभिमानानें माझ्या हृदयांतील मनुष्य जातीचा प्रतिनिधि तें विवर पाहूं लागला. नदीवरील पूल आणि डोंगरामधील बोगदा हे दोन्ही मनुष्याचे महान पुरुषार्थ होत. गोव्याला जातांना अेकवीस बोगदे लागले. पूल किती लागले याचा हिशेब लागेना.

पुढें मुरगांवला अफाट समुद्र पाहिला. वाटलें येथें वाट खुंटली. पण नाहीं. भों करीत अेक आगबोट आली आणि मला घेअून गेली. त्या रात्रीं खात्री झाली कीं वाटेला अडवणारें कांहीं नाहीं. आडवाट असो किंवा राजमार्ग असो, जमिनीवरून असो किंवा पाण्यावरून असो, जाणें हें आहेच. तेव्हांपासून मी 'मार्गमार्गी' झालों आहें.

मी म्हणालों कीं, आकाश, समुद्र आणि रण हीं स्थिरतेचीं काव्यें आहेत. पण तीहि भ्रांतीच ठरली. समुद्राच्या लाटा मला हसल्या; रेतीनें अुडून अुडून मला सांगितलें कीं, 'तूं आंधळा आहेस.' आणि आकाशांतील तान्यांनीं मला दीक्षा दिली कीं, 'सर्व ब्रह्मांडें मिळून अेक रहाटगाड्गें चालूं आहे. जरा मोठा झालास म्हणजे तूंच म्हणशील कीं रहाटगाडग्याची अुपमा चुकीची आहे. हा अेक विराट रास चालूं आहे. येथें चालण्याचाच रस आहे. रासेश्वर आणि रसेश्वर अेकच आहेत.' तेव्हांपासून रस्त्याला माझ्या विभूतियोगामध्यें फार मोठें स्थान आहे. रस्त्याचा रसप्रवाह गातां गातां मी कधींच थकलों नाहीं. थांबलों आहें पुष्कळदां. तसें आतांहि थांबतों.

३

हाताच्या परिश्रमानें बनवलेली वाट आणि पायांनीं चालून चालून आपोआप बनलेली वाट यांत मोठा फरक आहे. बनवलेली वाट शिष्टसंस्कृतीची प्रतिनिधि म्हणतां येअील, पायवाट हें लोक-

संस्कृतीचें स्मारक आहे. बनवलेली वाट मनुष्याचा पुरुषार्थ सुचवते; आपोआप बनलेली पायवाट लोकजीवन गाते. दोघांच्या जवळ मौन-वाणी आहे म्हणूनच दोघांनीं असंदिग्ध असें कांहींच सांगितलें नाहीं. वाटेला कांहींहि विचारायला जा, वाट म्हणते, 'आपोआप समजून घे. तरीहि जें समजणार नाहीं तें चालून पहा. चालून पहाणें हीच अनेक संशयोच्छेदी साधना आहे.'

त्यांत ही पायवाट म्हणते, "वाटेनें चालूं नकोस, नवीन वाट पाड. शिळ्या अुष्ट्या वाटेनें कां जातोस? मोठमोठे राजे शककर्ते होअून गेले असतील. तूं मार्गकर्ता हो. नवीन नवीन तीर्थें शोधून काढ. (तीर्थ – पाणअुताऱ्याची जागा) त्यांतच अधिकाधिक आनंद मिळेल."

"तुला अितिहासवेत्ता व्हावयाचें असेल तर कुणाच्या तरी रस्त्यानें चाल पण जर अितिहासकर्ता व्हावयाचें असेल तर नवीन रस्ता अुत्पन्न कर. महाश्रमण बुद्ध भगवान म्हणाले, 'प्रव्रज्या घे, चालूं लाग आणि स्वतःचा अेक दिवा बरोबर बाळग. आत्मदीपो भव।' परिव्राजकाचार्य शंकरयतीन्द्र म्हणाले, 'पृथ्वीपर्यटन कर, पण जवळ कांहीं बाळगूं नकोस. अर्थाचें ओझें अनर्थकारक असतें. अर्थमनर्थं भावय नित्यम्।' बुद्ध म्हणाले, 'गेंड्याच्या शिंगासारखा अेकाकी रहा.' शंकराचार्य म्हणाले, 'सर्वत्र स्वतःलाच पहा.' हे दोघेहि मार्गकृत् होते, म्हणूनच ते जगद्गुरु झाले."

४

पशु आणि पक्षी निसर्गाहून निराळे नसतात. जगतां येअील तोंपर्यंत जगतात. मरण टाळण्याचा बौद्धिक प्रयत्न करीत नाहींत. चांगला आहार मिळेल तेथें जाअून रहावें, संकट दत्त म्हणून येअून समोर अुभें राहील तेव्हां जीव घेअून पळावें आणि जगण्यासाठीं टोळी किंवा कळप करून रहाण्याचें सुचलें तर अेकटें पडूं नये, येवढेंच त्यांना ठाअूक असतें. त्यांनीं कधीं शेती केली नाहीं, किल्ले बांधले नाहींत, शस्त्रास्त्रें तयार केलीं नाहींत. अशा प्राण्यांना जाण्याचें अुत्तम साधतें, रहाण्याचा त्यांचा

आग्रह नसतो. आणि म्हणूनच या प्राण्यांचा निर्वंश झाला तरी त्यांना पुन: पुन: अुत्पन्न करण्याची जबाबदारी निसर्गावर येअून पडते.

माणसानें पाहिलें कीं, 'वाट आपल्याला पुढें पुढें नेते. वाटेनें चालतां चालतां आपण लहानाचे मोठे होतों. मोठेपणीं पुरुषार्थ केल्यानंतर आपण क्षीण होतों, तेव्हां पुढची तयारी थोडीबहुत करून ठेवलेली बरी.' पशुपक्षी आपल्या संततीच्या जगण्याची काळजी करतात. पण त्यांना प्रगतीची चिंता नसते. माणसाच्या बाबतींत या 'प्र' नें सगळा घोटाळा केला आहे. देवानें म्हणा, निसर्गानें म्हणा त्याला गति दिली. तेवढ्यानें त्याचें समाधान होईना. म्हणून त्यानें आपल्यामागें 'प्र' ची पीडा लावून घेतली. या 'प्र' चा अर्थ समजेना म्हणून त्यानें वेग वाढवून पाहिला. पुढें या वेगाचेंच त्याला वेड लागलें. धबधबे पाहून देखील त्याला शहाणपणा सुचेना. एकदां वेगांत सांपडलों म्हणजे आपलें कांहीं चालत नाहीं, मागें वळतां येत नाहीं हें समजून देखील तो आपला धांवतच आहे.

हें झालें अेक वेडेपण. दुसरें वेडेपण म्हणचे अेकाच वेळीं अनेक वाटांनीं धांवपळ करण्याची माणसाची अिच्छा. शरीरानें हें साधेना तेव्हां त्यानें मनाचे केले तुकडे; आणि अेकाच वेळीं अनेक वाटांनीं मनाच्या वेगानें तो धांवूं लागला. हें वेडेपण अितकें विचित्र आहे कीं त्याचें वर्णनहि होणें शक्य नाहीं. आणि गंमत अशी कीं अशा वेडेपणासाठीं देखील माणसाला साथी आणि सवंगडी मिळतात. अशा लोकांपुढें देव देखील थकून जात असेल. पण अुपनिषदाचा ऋषि म्हणतो कीं, 'नाहीं, परब्रह्म या सर्व धावणाऱ्या वेड्यांना अुभें अुभेंच गांठतें! तद् धावतोऽन्यान् अत्येति तिष्टत्।'

# मेघाळ दिवशीं

"रोजच असतें सारा दिवसभर काम, आणि चोहींकडे लोकसमुदाय. दिवस संपला कीं नेहमींच वाटतें कीं रोजच्या त्या दिवशींच्या कामकाजांतून, त्या दिवशींच्या संभाषणांतून त्या दिवशींचें सर्वच कांहीं जणुं पार संपलें आहे.—परंतु अंतरीं कांहीं अुरलें आहे त्याचा विचार करायला वेळच अुरत नाहीं."

आज सकाळीं मेघांच्या गुच्छागुच्छांनीं भरून आलें आहे आकाशाचें हृदय. आजहि अुभ्या दिवसाचें काम पुढें अुभें आहे, आणि चारी बाजूंना आहे माणसांचा मेळावा. परंतु आज वाटतें कीं अंतरीं जें कांहीं आहे तें सगळेंच बाहेरून संपवितां येत नाही.

मनुष्यानें समुद्र पार केले, पर्वत ओलांडले, पाताळपुरीपर्यंत विवर खोदून मणि-माणिक्य चोरून आणलें; परंतु अेकाच्या मनींचें आणखी अेकाला चुकतें करणें मात्र कांहीं केल्या तो करूं शकला नाहीं.

आजच्या मेघाळ दिवशी सकाळीं तीच माझी बंदिस्त गोष्ट मनामध्यें पंख फडफडवीत पडली आहे. आंतला मानव म्हणतो, "चिरकाल माझाच असलेला तो आणखी अेकजण कुठें आहे, जो माझ्या हृदयाच्या श्रावणमेघांना 'निःस्व' करून त्यांचें सगळें वर्षण काढून घेईल ?"

आजच्या मेघाळ दिवसाच्या सकाळीं तीच अंतरींची गोष्ट माझ्या बंद दाराची कडी खडखडावीत असल्याचें मी अैकत आहें. वाटतें, "काय करूं ? असा कोण आहे, ज्याच्या हांकेसरशीं कामाचें हें कुंपण ओलांडून माझी वाणी, सुरांचा प्रदीप हातीं घेअून याच क्षणीं विश्वाच्या अभिसारासाठीं बाहेर पडेल ? असा कोण आहे कीं ज्याच्या डोळ्यांच्या केवळ अिशाऱ्यानेंच माझ्या विखुरलेल्या सर्व व्यथा क्षणांत अेका आनंदीं गुंफल्या जातील, अेकाच प्रकाशीं पुंजाळतील. जो मजकडून माझ्यांत योग्य सूर जागवून मागून घेईल त्यालाच

केवळ मी देऊं शकेन! असा तो माझा सर्वविनाशी भिकारी मार्गाच्या कोणत्या वळणावर आहे?"

माझ्या अंतरींच्या–अन्त:पुराच्या व्यथेनें आज भगवीं धारण केलीं आहेत. ती आज मार्गावर बाहेर पडूं बघत आहे — सर्वकर्मांच्या पलीकडच्या मार्गावर. जो मार्ग अेकाच सरळतारी अेकतारी प्रमाणें कोणा प्रिय व्यक्तीच्या पावलांच्या ताला तालावर वाजत आहे.

## निरूपण — मेघला दिने

लिपिकेमधील शब्दचित्रें म्हणजे अुच्च कोटीचें नाजुक साहित्य आहे. सामान्य लिखाणांत ज्या प्रकारच्या आटीव रसाची आणि पूर्णतेची आपण अपेक्षा करतों तसलें कांहीं येथें सांपडावयाचें नाहीं. परंतु येथील साध्या वर्णनांत हृदयाची तार छेडणारें असें कांहीं काव्य भासतें आणि त्यांतून चुटपुट लावणाऱ्या सुगंधाची झुळूक अनुभवास येते. या लिखाणाचें रहस्य तर्कबुद्धीनें किंवा विश्लेषण-पद्धतीनें शोधून काढावयाचें नसून समवेदनेनें किंवा सहानुभूतीनें अुमगावयाचें असतें.

'मेघला दिने' हें शब्दचित्र अेखाद्या कादंबरीत विशिष्ट प्रसंगाचें वातावरण स्पष्ट करण्यासाठीं लिहिलें असावें असेंच वाटावयाचें. पण कवीनें केवळ अेकच हुरहुर लावणारी काव्यमय अनुभूति शब्दबद्ध करून स्वतंत्रपणें अेक चित्र म्हणून रुजू करण्याजोगी आहे असें ठरविण्याची हिंमत दाखविली आहे.

पुष्कळदां घरांत बरेच पाहुणे आले असले म्हणजे घरांतील मुलाबाळांची किंवा प्रियजनांची आपण हेळसांड करतों. आतिथ्यांत कांहीं अुणेपणा राहूं नये याची आपल्याला अितकी काळजी असते कीं प्रियजनांची हेळसांड होत आहे अिकडे आपलें लक्ष जात नाहीं. आलेला दिवस आणि प्रसंग यथासांग पार पडला या समाधानांतच आपण झोपीं जातों.

पण अेखादे दिवशीं कांहींतरी होअून या कामाच्या गडबडीला खिंडार पडतें आणि मग, काय काय राहून गेलें, कोणाची अक्षम्य अुपेक्षा घडली अिकडे लक्ष जातें आणि मनाला पश्चात्ताप होतो, कीं अरे, ज्यांचेसाठीं गृहस्थाश्रम केला आणि आतिथ्यधर्म स्वीकारला त्यां मुलाबाळांचीच हेळसांड मी करीत आहें! विचार करायला जर हा थोडासा अवकाश मिळाला नसता तर माझी ही हेळसांड अशीच पुढें चालली असती. आपलें कांहींतरी चुकतें हें नजरेसहि आलें नसतें! जे अत्यंत जवळचे त्यांना दूर करण्यांत आणि विसरून जाण्यांत मीं काय मिळविलें?

आकाश जेव्हां निरभ्र असतें, चक्क सूर्यप्रकाश पडलेला असतो, वारा अनिरुद्ध खेळत असतो त्या वेळीं आपण बहिर्मुख होतों आणि आपल्या प्रवृत्तींचा व्याप बेसुमार वाढतो. बाहेरचें जगच आपला सर्व वेळ व्यापून टाकतें. पण जेव्हां पाऊस रिप्रिप् पडत असतो किंवा मेघांनीं आकाशावर पासोडी पसरून दुपारची संध्याकाळ करून टाकलेली असते, तेव्हां आपण अन्तर्मुख होतों. कांहींच करण्याकडे मन लागत नाहीं, काय करावें सुचत नाहीं. या स्थितींत मनाला अेक प्रकारची निष्कारण हुरहुर लागते आणि त्यांतून प्रियजनांची आठवण होते. आपल्या स्मरणानें प्रमाद करून त्यांची हेळसांड कशी केली याचा विषाद वाटून पश्चाताप होअूं लागतो. मग वाटतें, नको हा सगळा कामाचा व्याप ! अशा वेळीं फक्त प्रियजनांचा सहवास असावा. अंतरानें अंतराला ओळखावें आणि त्याचीच तृप्ति अनुभवावी. बस ! ही वृत्ति जागृत झाल्याबरोबर मन बसल्याबसल्या प्रियजनांच्या भेटीला निघतें. सर्व कामें विसरून प्रियजनांची ही जी आठवण हृदयांत कोंदाटली आहे तिचीच भेट त्यांना देअून येण्यासाठी तें धांवूं लागतें. पुष्कळ दिवसांच्या हेळसांडीमुळें विस्मृतीच्या अंधारांत पडलेलें हें प्रेमरूपी रत्न अचानक हातीं आल्यानंतर तें वेळींच पोंचतें करण्याची अुत्कण्ठा लागून राहाते.

दोन हृदयें कितीहि जवळ असलीं तरी तीं अेकमेकांना सहजासहजीं ओळखूं शकत नाहींत. मनुष्याचा पराक्रम कांहीं लहानसहान नाहीं. तो समुद्र पार करून जाअील, महापर्वत ओलांडून जाअील, पाताळा-पर्यंत पोहोंचेल; परंतु आपल्या हृदयाला बिलगलेल्या हृदयाचा देखील ठाव त्याला सांपडत नाहीं. ही आहे नेहमींची स्थिति. आणि म्हणूनच अेखाद्या मेघाळ दिवशीं जेव्हां प्रवृत्तींवर विरजण पडतें, मन अुत्कट होतें आणि हृदयपद्म अुघडतें तेव्हां त्या मंगलमुहूर्तीं बाकी सर्व कांहीं बाजूला ठेवून हृदयाचीं मोतीं अर्पण करण्यासाठीं प्रेमाच्या तालांत तें धांवूं लागतें हीच त्याची धन्यता ! हीच कृतार्थता ! हेंच जीवनांतील स्वर्गाचें, ओझरतें का होअीना, पण चिरस्मरणीय दर्शन !

शरीरानें आणि जीवनानुभूतीनें आपणाहून भिन्न अशा प्रियजनां-विषयींची जर ही स्थिति तर जो प्रियजन आपल्याच हृदयांत अखंड

वास करीत आहे, जो 'अन्तरतर' आहे, जन्मोजन्मीं आणि युगोयुगीं जो आपला सहयात्री साथी आहे, ज्याच्या आधारावर अनंत यात्रा चालवत असूनहि ज्याला आपण विसरलों आहोंत, त्याची जेव्हां चुकूनमाकून विरळ प्रसंगीं विजेच्या चमकण्याप्रमाणें आठवण होते तेव्हां हृदयांत होणाऱ्या कालवाकालवीचें वर्णन कसें करावें ? आपण स्वतःला ओळखतों. पण जो आपल्याला आपल्याहूनहि जवळचा आहे त्याला विसरल्याचा पश्चात्ताप जेव्हां खडबडून जागा होतो तेव्हां जी अस्वस्थता हृदयाला झोंबते तिचा परिहार कसा करायचा ? अितर सर्व व्यवधानें झाडून टाकून, अितर सर्व आकर्षणें तोडून टाकून, स्वतःचा सोलीव गाभाच त्याला अर्पण करणें; स्वतःचें कांहीच राहूं न देणें आणि मग 'तूंच तूं' 'तूंच तूं' असें पक्षाप्रमाणें स्वच्छंद गात सुटणें हाच अेक अुपाय रहातो. केवढी ही धन्यता ! जिवाचा धडा करून स्वतःच्या व्यक्तित्वाला मारून टाकणें आणि अशा मरणाची किंमत देअून चिरजीवन मिळविणें आणि आनंदमय नव्हे पण आनंदरूप होअून जाणें हें विरहसाधनेलाच साधतें. विरहांत जी गोडी असते ती याच अपेक्षेची होय.

# ‘मेघ संदेश’

## १

थेंबाथेंबांनीं पाअूस होअून आकाशांतील मेघ खालीं अुतरतात, स्वतःचें पृथ्वीच्या हातीं समर्पण करण्यासाठीं. त्याच प्रमाणें मुली कुठून तरी येतात या पृथ्वीवर, बंधन पत्करण्यासाठीं.

त्यांचें असतें थोडक्या जागेचें, मोजक्या माणसांचें जग. तेवढ्यांतच त्यांना सामावयाचें असतें त्यांचें सर्वच — त्यांच्या सर्व गोष्टी, सर्व वेदना, सर्व कल्पना. म्हणूनच असतो त्यांच्या माथीं पदर, हातीं कंकण, अंगणीं कुंपण. थोडक्यांत, स्त्रिया म्हणजे सीमास्वर्गाच्या अिन्द्राणी होत.

परंतु कोणा देवतेच्या खट्याळ हास्याप्रमाणें अपरिमित चांचल्यासह आमच्या शेजारीं या लहानग्या मुलीचा जन्म झाला. आअी तिला रागावून म्हणें ‘टवळी’! नि वडील तिला हंसून म्हणावयाचे ‘वेडी’!

ती आहे पळत्या झऱ्याचें पाणी, शिस्तीचे दगड अुल्लंघीत चालणारें. तिचें मन म्हणजे जणूं वेणुवनाच्या शेंडयावरच्या शाखेचीं पानें, केवळ अेकसारखीं झुळझुळ हलणारीं.

## २

आज तीच अवखळ मुलगी ओट्याच्या कटवंजनावर (व्हरांडयाच्या रेलिंगवर) रेलून गुपचूप अुभी आहे. ओसरत्या सरीच्या शेवटींचें अिन्द्रधनुष्यच पाहून घ्यावें! तिचे ते मोठाले टपोरे डोळे आज अचंचल होते, तमालवृक्षाच्या डहाळीवरच्या, पावसानें पंख चिंब झालेल्या पक्ष्याप्रमाणें.

तिला मी अितकी स्तब्ध, शान्त कधींच बघितली नव्हती. वाटलें, नदी जणूं चालतां चालतां सहसा अेके जागीं थबकून जाअून सरोवर झाली आहे.

३

कांहीं दिवसांपूर्वी अुन्हाचें कडक राज्य होतें; दिगन्ताचा चेहरा शुष्क झालेला, झाडांचीं पानें पिवळट आणि हताश्वास.

अशा वेळीं अकस्मात् काळ्या काळ्या गबाळ्या पागल मेघांनीं आकाशाच्या कोपऱ्याकोपऱ्यांतून आपले तंबू ठोकले. अस्त-सूर्याचे किरण म्यानांतील तलवारीप्रमाणें बाहेर पडले.

मध्यरात्रीं पहातों तों दारें खडखड शब्द करीत कांपत आहेत ! सगळ्या शहराच्या झोंपेला त्या वावटळी वाऱ्यानें, तिचा बुचडा धरून, गदगदां हलवून सोडलें !

अुठून पहातों तों आळीच्या कोपऱ्यावरचा दिवा जोराच्या सतत वृष्टीमध्यें, दारुड्याच्या गढूळ डोळ्याप्रमाणें दिसत होता. आणि गिरजाघराच्या घड्याळाचा शब्द पावसाच्या आवाजाची शाल पांघरून येत होता.

सकाळच्या वेळीं पावसाच्या सरी जोरानें कोसळूं लागल्या. अुन्हें वर आलींच नाहींत.

४

अशा या मेघाच्छन्न दिवशीं आमची ती शेजारची मुलगी व्हरांड्याच्या कठड्याला धरून गुपचूप अुभी आहे.

तिची धाकटी बहिण आली; म्हणाली, 'आअी बोलावते.' तिनें केवळ जोरानें मान वेळावली ! तिची वेणी नाचून अुठली !

कागदाची नाव हातांत घेअून तिच्या लहानग्या भावानें तिचा हात धरून खेंचला. तिनें हात हिसकावून घेतला, तरीहि तिचा भाअू खेळण्यासाठीं म्हणून तिची ओढाताण करूं लागला. त्याला तिनें अेक थप्पड भडकावून दिली !

५

पाअूस पडतच आहे. अंधार आणखी कुट्ट झाला. मुलगी तशीच स्थिर अुभी आहे.

युगारंभीं, सृष्टीच्या मुखीं प्रथम वाचा फुटली होती जलाच्या भाषेंत, हवेच्या कंठीं. लक्ष कोटी कोटी वर्षें पार होऊन, स्मरणा-विस्मरणाच्याहि पलीकडील गोष्टींनीं आज पावसाच्या रूपानें या मुलीला हांक मारली. म्हणूनच ती वर्तमानाचीं सगळीं बंधनें ओलांडून आत्मविस्मृत झाली आहे.

किती अमाप काळ! केवढें विशाल विश्व! पृथ्वीवर किती-तरी युगांपासूनची विविध जीवलीला! त्याच सुदूरानें, त्याच विराटानें आज या अवखळ मुलीकडे न्याहाळून पाहिलें, मेघाच्या छायेमधून, वृष्टीच्या कलकल सुरांतून!

म्हणूनच ती मोठाले डोळे लावून निश्चल उभी राहिली आहे. जणूं अनंत काळाचीच प्रतिमा!

## निरूपण — वाणी

पावसाळी दिवसांत जेव्हां आकाश मेघांनीं भरून जातें आणि रस्ते ओले झाल्यामुळें बाहेर कोठें जाण्यास मनहि घेत नाहीं, अशा वेळीं कल्पनाचक्षूला मोठा जोम येतो. आणि माजावलेलें मन वर्तमान-काळांतून अेकदम अनंत कालाकडे धांव घेतें. रात्रीं झोंपमोड झाली असतां, ज्याप्रमाणें तऱ्हेतऱ्हेच्या शंकाकुशंका मनांत येतात आणि मनुष्याच्या मनामध्यें चित्रविचित्र विचार घोळूं लागतात, त्याचप्रमाणें पावसाळी दिवसांत मनुष्य वर्तमानाला विसरून जाअून, व्यवहाराला बाजूला सारून, कल्पनाप्रवण तत्त्वज्ञ बनतो.

प्रस्तुत रेखाचित्रांत घटनेचा अंश तो केवढा! कवीच्या शेजारीं अेक अल्लड मुलगी राहत आहे. हंसणें, खेळणें, मनाला येअील तसें वागणें, कुणाचीहि पर्वा न करणें, अेवढेंच तिला ठाअूक. अशा मुलीचें जीवन स्वाभाविकपणें बहिर्मुख असणार. अंतर्मुखतेची कल्पना देखील तिच्या वाटेला गेलेली नसावयाची. आअीशीं लडिवाळपणा करावा किंवा तिला चिडवावें, भावाबहिणींशीं खेळावें आणि आपल्या खोड-करपणानें वडिलांना रिझवावें अेवढेंच तिला ठाअूक.

अशा मुलीवर पावसाळी दिवसानें आपली झांपड घातली. ती गच्चीवर येअून आकाशाकडे पाहूं लागली. अेकाअेकीं ती अंतर्मुख झाली! जिच्या पायांना, जिभेला, हातांना आणि कल्पनेला अेका क्षणाचीहि विश्रांति ठाअूक नाहीं, ती अेकदम निस्तब्ध होअून आकाशाकडे टक लावून पाहूं लागली! आअीनें तिला बोलावलें तें तिनें मनावरहि घेतलें नाहीं. अेरवीं धांवत गेली असती ती आअीकडे! आज तिनें पहिल्या प्रथम मानेनें नकार दिला. तिचा प्रेमळ भाअू तिला खेळायला बोलवा-वयाला आला. नेहमींची गोष्ट असती तर तिनें भावाला किती तरी खेळ शिकविले असते. पण आज त्याला तिनें झिडकारून टाकलें. त्यानें नेहमीं-प्रमाणेंच समजून तिच्याशीं ओढाताण केली. परिणामीं त्याला अेक धपाटा मिळाला! आणि ती मुलगी निश्चलपणें आकाशाकडे पाहतच राहिली. पाहत होती बाहेर, पण दृष्टि झाली होती अंतर्मुख.

बस; अितकें विस्तारपूर्वक सांगितलें तरी याहून अधिक घटना नाहीं! पण कवि ते कवि! आणि त्यांत ढगाच्या पांघरुणाखालीं त्यांची कल्पना अुबवली गेलेली! या घटनेंत त्यांना सृष्टीचा सनातन व्यापार दिसूं लागला. ही वृष्टि जशी अनंत आकाशांतून सान्त पृथ्वीवर पडते त्याचप्रमाणें अनंताच्या घरून मुली येतात आणि मानवी कुटुंबाच्या घरकुलांत आपलें स्थान घेतात. अेवढयाश्या सीमित, परिमित वातावरणाचा त्यांना स्वर्ग बनवितां येतो, आणि आपणच बनविलेल्या सीमास्वर्गांत त्या अिन्द्राणीचें स्थान पटकावतात. केवढें हें आश्चर्य आणि केवढी ही दिव्य मधुर साधना!

पण ती शेजारची मुलगी अजूनहि बंधनांत सांपडली नव्हती. ती अल्लडची अल्लडच राहिलेली आहे. तिचा तो प्रेमळ खोडकरपणा आणि स्वतंत्र मनस्वीपणा पाहतांच कवीला आठवण झाली खळखळ वाहणाऱ्या आणि गोटयांमधून अुडया मारणाऱ्या खेळकर झऱ्याची. पक्ष्यासारखें अिकडून तिकडें बागडणारें तिचें मन पाहून, वाऱ्याशीं खेळ करणाऱ्या वेणुवनांतील अुंच अुंच शाखांचें त्याला स्मरण झालें. बांबूच्या बेटांचीं द्वीपकल्पें तुम्हीं पाहिलीं आहेत काय? अेकेक बेट म्हणजे वनस्पति-सृष्टीच्या कारंज्याचा फवारा! बारीक-मोठया बांबूंचीं टोंकें कशा सुंदर वळणांनीं झुकलेलीं असतात! जणूं जीवनसमृद्ध वनदेवीची शान्त शीतल आतिषबाजीच! कवीला नव्या नव्या कल्पना सुचाव्या त्या-प्रमाणें वेळूंचीं हीं टोंकें अेकावर अेक चढूं लागतात. त्यांचे हे अुत्तरोत्तर वाढणारे अुमाळे पाहून वाऱ्याच्यानें राहवत नाहीं. घरांतील अेखाद्या बाप्यानें लहान मुलींचा खेळ बिघडवला म्हणजे त्या ज्या-प्रमाणें खोटया खोटया रागावून कलकलाट करीत आनंदवृद्धि करतात, त्याचप्रमाणें वारा जवळ येतांच बांबूंचे हे शेंडे सोसाटयाचा आव आणतात आणि असे कांहीं नाचूं लागतात कीं, त्या नाचाला तांडव म्हणावें का लास्य, हें ठरविणें कठिण जातें!

पण आज रोजच्यासारखी स्थिति नाहीं. मेघांनीं ब्रह्मांडावर बहिष्कार घालून पृथ्वीचेंच अेक लहानसें अंडें बनविलें आहे. त्यामुळें प्रत्येक मनांत कांहींसें घरगुती वातावरण अुत्पन्न झालें आहे. पशु-

पक्षी, झाडपाला जसे भिजून चिंब होतात, त्याप्रमाणें स्वतःला अजून न ओळखूं शकणाऱ्या त्या मुलीची अवस्था झाली आहे. तिचा स्वभावच बदलला. कवीला वाटलें कीं, काश्मीरमधील जेहलम नदीचें जणूं वूलर सरोवर झालें आहे! खळखळ वाहणाऱ्या ओढयाचा हा नीरव गभीर डोह झाला तरी कसा, याचें कवीला आश्चर्य वाटलें! प्रखर अुन्हाळा जाअून ज्याप्रमाणें अेकदम मेघांनीं अंबर व्याप्त व्हावें आणि त्यांतून बाहेर पडणारी सूर्यकिरणें म्यानांतून निघणाऱ्या तलवारीप्रमाणें भासावींत, आणि विराट् मोकळेपणा अंधकाराच्या पासोडींत गुरफटून जावा, तशीच स्थिति झाली त्या मुलीची. ती स्वातंत्र्यांत वाढलेली असल्यामुळें आणि तिच्या स्वभावांत कृत्रिमतेचा लवलेश नसल्यामुळें, तिच्या भावा-बहिणींहून आणि आअीहून निराळाच आणि खोल परिणाम तिच्यावर झाला त्या वातावरणाचा.

कवि आपल्या मनाला विचारतो, "ही खेळकर मुलगी अशी अेकदम स्तब्ध कां झाली? तिनें वातावरणांत काय पाहिलें? हवे-कडून तिनें काय अैकलें?" कवीला वाटलें, सृष्टीच्या आरंभीं हवेच्या कंठांतून, पाण्याच्या भाषेंतून सर्जनाचा जो संदेश प्रकृतीनें अुच्चारला, तोच संदेश अनंत काळांतून यात्रा करीत करीत, स्मरण-विस्मरणाच्या लाटांतून मजल दरमजल कूच करीत या मुलीपर्यंत येअून पोंचला आहे! आणि मेघवाणीनें तिला तो अेकविला आहे! म्हणूनच ती आतांपर्यंतचीं सर्व बंधनें बाजूला सारून विश्वप्रसविनी प्रकृतिमातेशीं अशी अेकरूप झाली आहे. ही सार्वभौम वाणी अैकतांच अवखळ मुलीचा खळखळाट अेकदम बन्द झाला आणि ती अनंत काळाच्या निस्पंद प्रतिमेप्रमाणें टक लावून पाहत राहिली. तिच्या स्वभावांत, प्रकृतींत आणि जीवनदृष्टींत या आजच्या अेका दिवसाच्या अनुभवानें कायमचें परिवर्तन झाल्यास मुळींच आश्चर्य नाहीं.

बाल्य आणि यौवन यांच्या संधिकाळाचा तो नेमका क्षण कवीला सांपडला हें मात्र धन्य आश्चर्य खरें!

# मेघदूत

१

मीलनाच्या प्रथम दिवशीं सनअी काय म्हणाली होती?

ती म्हणाली होती, 'तीच व्यक्ति मला आज जवळची झाली, जी मला दूरची वाटत होती.'

सनअी आणखी असेंहि म्हणाली होती कीं, 'धरलें जाऊनहि जें धरलें गेलेंसें वाटत नाहीं तें आज धरलें गेलें आहे आणि जें मिळालें असतां सर्व मिळकतीच्याहि वरचढ होतें तें आज मिळवलें आहे.'

तर मग रोजच तशी सनअी कां वाजत नाहीं?

कारण अर्ध्या गोष्टीचा आतां विसर पडला आहे. अेवढेंच बरीक ध्यानांत राहिलें कीं ती जवळ आहे. पण ती दूरहि असूं शकते हें मात्र ध्यानांतच राहिलें नाहीं.

प्रेमाच्या ज्या अेका अर्धभागांत मीलन असतें तेवढाच काय तो दृष्टीस पडतो. पण ज्या दुसऱ्या अर्धभागांत विरह असतो तो मात्र दृष्टीस पडत नाहीं. म्हणून 'दूरत्वा'चें जें चिरतृप्ति-हीन पहाणें असतें तें डोळ्यात भरत नाहीं. कारण 'जवळिके' चा पडदा त्याच्या आड येतो.

दोन व्यक्तींमध्यें जें अनन्त आकाश असतें तिथें सगळेंच निःशब्द असतें. तेथें शब्दांना अवकाश नसतो. या विराट निःशब्दतेला सनअीच्या सुरांनीं भरून काढावयाचें असतें. अनन्त आकाशाची पोकळी न मिळाली तर मुरली वाजूं शकत नाहीं.

तेंच आमच्यामधलें आकाश वावटळीनें व्याप्त झालें आहे— रोजच्या कामकाजानें आणि कथांनीं भरून निघालें आहे. दररोजच्या शंका कुशंकांनीं आणि क्षुद्रतेनें कोंदाटलें आहे.

२

कधीं कधीं चांदण्या रात्रीचा वारा वाहतो नि जाग येतांच हृदय वेदनेनें भरून निघतें. अंथरुणावर बसल्या बसल्या आठवतें कीं जवळचें माणूस तर मी गमावून बसलों आहें.

हा विरह — माझ्या अनन्तत्वाशीं झालेला तिच्या अनन्तत्वाचा विरह नाहींसा व्हावा तरी कसा ?

दिवसाचे शेवटीं काम आटपून घरीं परत येऊन जिचेशीं मी चार गोष्टी बोले, ती कोण होती ? ती तर जगांतील हजारो व्यक्तीं-पैकींच अेक होती. तिला मीं ओळखलें होतें, पारखलें होतें. सगळेंच अेकपरी संपलें होतें. परंतु तिच्यांत अनन्त रूपानें वास करणारी अशी माझी ती अेक विशिष्ट व्यक्ति — संपूर्ण माझीच अशी — आहे कुठें ? तिला पुन्हा नव्यानें कुठें शोधूं — कोणत्या अमर्याद कामनेच्या तीरीं ?

तिचेशीं पुन: अेकदां चार गोष्टी बोलायला वेळांत वेळ तरी कोणता मिळेल, वनमल्लिकेच्या सुगंधानें दाटलेली अशी कोणती रिकामपणची अंधारी संध्याकाळ ?

३

अशा समयीं नववर्षा आपला छायेचा पदर अुडवीत पूर्व दिगन्तीं येअून ठाकली. अुज्जयिनीच्या कवीचें स्मरण झालें. वाटलें, प्रियेजवळ दूत पाठवावा.

माझ्या गायना, मार भरारी आणि जवळिकेच्या हव्यासाचें हें अतिदूरचें आणि दुर्गम निर्वासन पार होअून जा.

तर मग त्याला जायला हवें काळाच्या अुलट दिशेनें सनअीच्या कंपित सुरांच्या मागोमाग आमच्या प्रथम मीलनाच्या दिनाकडे — आमच्या त्या दिनाकडे जो चराचर विश्वांतल्या चिरवर्षेच्या आणि चिरवसंताच्या सुगंधांत आणि क्रंदनांत, केतकीवनाच्या दीर्घ निश्वासांत आणि शालमंजरींच्या अुत्कट आत्मनिवेदनांत भरून अुरला आहे.

निवांत पुष्करणीच्या कांठींच्या कुळागरांतून मर्मर-मुखरित वर्षेच्या शब्दांनाच माझे शब्द मानून त्यांना, आपल्या मोकळ्या केसांचा सुटा अंबाडा बांधून कमरेला पदर खोवून संसारांत व्यस्त अशा माझ्या प्रियेच्या कानीं पोंचते करा.

४

लांबवरचें तें असीम आकाश आज वनराजि-नीला पृथ्वीच्या अुशाशीं वांकून हळूंच तिच्या कानांत म्हणालें, 'मी तुझाच आहें.'

पृथ्वी म्हणाली, 'तें कसें जुळायचें. तूं असीम नि मी लहान'. आकाश म्हणालें, 'मी स्वतःला चारी बाजूंनीं माझ्याच मेघांच्या सीमेंत बांधून घेतलें आहे.'

पृथ्वी म्हणाली, 'तुझी किती मोठी थोरली ज्योतिष्कांची संपदा आहे. माझेजवळ तर प्रकाशाचें वैभवहि नाहीं.'

आकाश म्हणालें, 'आज मी माझे चंद्रसूर्य तारे सर्वच गमावून बसलों आहें. आज अेकमात्र तूंच माझी आहेस.'

पृथ्वी म्हणाली, 'अश्रूंनीं ओथंबलेलें माझें हृदय वाऱ्याच्या प्रत्येक झोताबरोबर चंचल होअून कांपूं लागतें आणि तूं तर अगदीं अविचल असतोस.'

आकाश म्हणालें, 'माझे अश्रूदेखील आज चंचल झाले आहेत ते तूं पहात नाहींस कां? आज माझें हें वक्ष देखील तुझ्या श्यामल हृदयाप्रमाणेंच श्यामल झालें आहे.'

अेवढें बोलून त्यानें आकाश आणि पृथ्वी मधील चिरविरहाला आपल्या डोळयांतील अश्रुजलाच्या गानानें भरून काढलें.

आकाश आणि पृथ्वीच्या त्या विवाहमंत्राचें गुंजन गात नववर्षा आमच्या विच्छेदामध्यें अवतरो. प्रियेमध्यें जें कांहीं अनिर्वचनीय असतें तेंच — अकस्मात् झंकृत झालेल्या वीणेच्या तारेप्रमाणें झंकृत होवो. तीहि दूरवर दिसणाऱ्या वनाच्या रंगासारखा आपला निळा शालू डोक्यावर घेवो. तिच्या काळयाभोर डोळयांच्या नजरेंत मेघमल्हाराच्या सर्व मींडा आर्त होअून अुठोत. आणि बकुळमालाहि तिच्या वेणीच्या प्रत्येक वळणोवळणींची शोभा वाढवीत कृतार्थ होवो.

जेव्हां झिल्लींच्या (रातकिडयांच्या) झंकारामुळें वेळूवनांतील अंधःकार थरारूं लागतो, जेव्हां पावसाळी हवेनें दीपशिखा हेलावून हेलावून मालवली जाते, त्यावेळीं ती आपलें जवळिकेचें जग सोडून ओलसर गवताच्या सुगंधित वनपथावरून, माझ्या निभृत हृदयाच्या निशीथ रात्रीमधें येवो.

## निरूपण — मेघदूत

आपल्या या नव्य-मेघदूताच्या प्रारंभीं वंगकवीनें आपलें प्रेम-विषयक तत्त्वज्ञान थोडक्यांत मांडलें आहे. लग्नापूर्वीं प्रेयसी ही केवळ ध्यानमूर्ति असते. आपण पृथ्वीवर आणि ती स्वर्गांत, अज्ञेय आणि अप्राप्य. पुढें साधना किंवा आराधना पूर्ण झाल्यानंतर वरप्रसाद म्हणून जेव्हां तिची प्राप्ति होते तेव्हां जी अज्ञात होती ती पूर्ण परिचित होते. जी अप्राप्त होती ती स्वतःशीं अेकजीव होअून जाते. प्रणयाराधनेच्या दिवसांत तिचें सुदूर रूप जें परिचित होतें तें मीलनासरशीं अेकाअेकीं लुप्त होतें आणि यामुळें प्रेमदर्शन अेकांगी होअून खालीं अुतरतें. मीलनाच्या अुन्मादांत कळतहि नाही कीं अेका स्वर्गीय दर्शनाला आपण मुकलों आहोंत. देवमंदिरांत ज्याप्रमाणें अुपासना-मूर्ति आणि अुत्सवमूर्ति अशा भिन्न भिन्न दोन मूर्ति असतात त्याचप्रमाणें प्रेममंदिरांतहि अेक ध्यानमूर्ति आणि दूसरी मीलनमूर्ति अशा दोन मूर्ति असतात. मीलन-मूर्तीची प्राणप्रतिष्ठा होतांच ध्यानमूर्तीचें विसर्जन होतें, हा अेक मोठा दोष आहे. आणि म्हणूनच पूर्ण साक्षात्कारासाठीं अीश्वराकडून विरहाचें नवें वरदान मिळतें आणि मग संस्कारगभीर हृदयाला कळूं लागतें कीं मीलन-मूर्ति प्राकृत होती —— पार्थिव होती. खरी दिव्यता ध्यानमूर्तीचीच. अत्यंत निकट असलेल्या मीलनमूर्तीमुळें खरी ध्यानमूर्ति दुरावली होती. ध्यानमूर्तीच्या सांनिध्यासाठी मीलनमूर्ति बाजूला सारावयास मनुष्य सहसा तयार होत नाहीं आणि प्रेमाचा पूर्ण साक्षात्कार करवल्यावांचून अीश्वराला कृतकृत्यता वाटत नाहीं. म्हणूनच तो कठोरपणें अेवढी कृपा करतो.

कवीनें पाहिलें कीं ध्यानमूर्ति स्वर्गातून अुतरून जेव्हां मीलनमूर्ति झाली तेव्हां प्रजापतीच्या संभवाच्या त्या क्षणीं विवाहाची सनअी साक्षी होती. तिच्याच सुरांनीं त्या वेळच्या संगीताला जर आळवलें तर ती अवश्य आपल्या हृदयाला त्या ध्यानमूर्तीकडे पुनः घेअून जाअील. मीलन आणि विरह या दोन दलांनींच प्रेमबीज संपूर्ण होतें —— सचेतन होतें.

प्राचीन कवींनीं शृंगाराचे दोन भाग कल्पले आहेत. अेक संभोग शृंगार, दुसरा विप्रलंभ शृंगार. (विप्रलंभ = विरह). पहिला भोग-प्रधान असतो, दुसरा भावनाप्रधान असतो. पहिला पार्थिव तर दुसरा स्वर्गीय. विवाहाच्या प्रारंभीं ज्याप्रमाणें पृथ्वीचें आणि स्वर्गाचें मीलन होतें, त्याचप्रमाणें विरहानंतरच्या स्मरणकालीहि झालें पाहिजे. अेवढ्याचसाठीं मेघदूत आणि गानदूत यांना जोडीनें पाठवण्याचें आणि हृदयाचा संदेशवाहक होण्याचें येथें योजलें आहे.

प्रिय पत्नी दिवंगत झाल्यानंतर सतरा वर्षांनीं जर तिचें स्मरण करावयाचें तर केवळ सतराच वर्षें मागें जाअून अंतिम दिवसाचें स्मरण काय म्हणून करावें? तितकींच वर्षें आणखी मागें जाअून प्रथम मील-नाच्या दिवसाचा अपूर्व अनुभवच कां ताजा करूं नये?

विवाहाचा प्रथम दिवस जीवनांत खरोखरच अद्वितीय असतो. जी मुलगी स्वतःला कुमारी म्हणवून मिरवत होती तीच मंत्राक्षता डोक्यावर पडल्याबरोबर अेकाअेकीं गृहिणी होते. त्या क्षणापासून पुढें कधीहि ती स्वतःला कुमारी म्हणवून घेअूं शकत नाहीं. कुमाराचेंहि असेंच असतें. ज्या दिवशीं त्यानें प्रथम गृहस्थाश्रमांत प्रवेश केला त्या दिवशीं त्याच्या जीवनांत आमूलाग्र फरक झाला.

आणि आपल्या देशांतील विवाह म्हणजे खरोखरच अेक रोमांचकारी आश्चर्य असतें. जगांत जर कमींत कमी कोणाशीं परिचय असेल तर तो पतीचा पत्नीशीं, आणि पत्नीचा पतीशीं. अेकमेकाशीं बोलण्याची देखील चोरी, अेकामेकाकडे पाहिलें तर तें ओझरतें आणि चोरूनच. आपल्या मनोराज्यांत दोघांनीं अेकमेकाविषयीं हव्या तशा कल्पना कराव्यात. पण ती सृष्टि स्वनिर्मितच. अुभय सामान्य अशी वास्तव सृष्टि ती नव्हे. या कल्पनासृष्टीमुळें अुभयांचें मीलन सोपें होण्याच्या अैवजीं कांहीं अंशीं कठीणच होत असलें पाहिजे. स्वतः निर्माण केलेली सृष्टि अेका क्षणांत सोडावी लागणार आणि तिच्या अैवजीं अज्ञात, अपरिचित, अननुभूत अशा नव्याच सृष्टीचा अेकाअेकीं स्वीकार करावा लागणार. जगांत अितर लोकांशीं जो परिचय होतो तो बेताबेताचाच असतो आणि तोहि हळू हळू, क्रमानें होत आणि वाढत असतो. येथें मंत्रसामर्थ्यावर विश्वास

ठेवून, वडिलांच्या आशीर्वादाची बळकटी घेऊन, प्रेमदेवाच्या प्रेरणेनुरूप अेकदमच संपूर्ण स्वीकार करावयाचा असतो, संपूर्ण आत्मार्पण करावयाचें असतें. असा क्षण म्हणजे खरोखर श्रद्धेची आणि आस्तिकतेची परिसीमाच होय.

* * *

वियोगाचा वेग शांत झाल्यानंतर आणि दीर्घकालानें स्वाभाविक झालेलें सान्त्वन पचनीं पडल्यानंतर जर प्रियजनांचें स्मरण करायचें तर जीवनांतील या अेकमात्र दिव्य, अद्वितीय क्षणाचेंच केलें पाहिजे. किडयांतून ज्या क्षणीं फुलपांखरूं तयार होतें, अंडयांतून ज्या क्षणीं पक्ष्याचें पिल्लू बाहेर पडतें, त्या क्षणीं त्यांना जो अनुभव होत असेल त्याहून हा प्रथम मीलनाचा अनुभव कांहीं कमी चमत्कृतिजनक नसतो. प्रेमाच्या अुत्कर्षाचें पवित्रपणें जर स्मरण करावयाचें तर या पवित्र क्षणापासूनच प्रारंभ करणें चांगलें.

सतरा वर्षांच्या विरहान्तीं अेकाकी जीवनामध्यें 'आषाढस्य प्रशम* दिवसे' सांद्र मेघांनीं येअून जें काहूर माजविलें, त्याची परिणति म्हणून त्याच मेघाला प्रेमसंदेशाचें गायन बरोबर देअून पाठवावयाचें, तर त्याचेकडून चौतीस वर्षांची स्मरणयात्रा करविणें हेंच अपरिहार्य आणि सर्वप्रकारें यथायोग्य आहे.

आकाश आणि पृथ्वीचें मीलन प्रत्येक पावसाळयांत होत असतें. कुठें हें विस्तीर्ण आकाश आणि कुठें आपण लहानशी पृथ्वी असें तिला वाटूं नये आणि प्रेमाची दीक्षा देत घेत असतांना लहान मोठा असा भेद अुरूं नये यासाठीं आकाश मेघांची मर्यादा स्वीकारून, ताऱ्यांचें वैभव बाजूस सारून, अनन्त नीलिमेवर श्याम वर्णाचें आच्छादन घालून, सजल नेत्रांतून प्रेमाची अुत्कंठा व्यक्त करीत पृथ्वीला भेटावयास येत असतें. आणि वैभवानें, चातुर्यानें, वयानें आणि अनुभवानें स्वतःला अगदीच नगण्य समजणारी नम्रमधुर पृथ्वी जेव्हां आपली अल्पता पुढें करते आणि मीलनाचा संकोच दाखवते तेव्हां आकाशाला तो संकोच

---

* प्रशम = चांगलासा, शुभ

आपल्या मीलनोत्सुक भाषेनें दूर करावा लागतो. आकाश खरोखरच आपल्यांतलें आणि पृथ्वींतलें अपरिमेय अंतर दूर करून पृथ्वीला आपलेसें करतें. सर्व देशांतील सर्व युगांतील कवींनीं द्यावा-पृथ्वीचा हा मीलनोत्सव गायिला आहे. कवीला जर स्वत:च्या प्रथम मीलनाचें स्मरण अशा प्रसंगीं झालें असेल तर त्यांत आश्चर्य तें कोणतें ?

कालिदासाच्या यक्षाचा विरह वर्ष-भोग्यच होता, आणि त्याच्या मेघाला रामगिरीपासून हिमालयापर्यन्तच जावयाचें होतें. आपला कवि या नवमेघाला कालाच्या गर्भात — भूतकालाच्या दिशेनें चौतीस वर्षांचें अंतर कापावयास सांगत आहे आणि हा विरह कालमर्यादित नसून चिरविरह आहे. दुष्यन्ताला त्याची शकुंतला स्वर्गभूमीमध्यें मरीचि ऋषीच्या आश्रमांत सदेह आणि सपुत्र लाभली. कवीला येथें त्याची प्रेयसी स्मरणाच्या पुण्य-क्षेत्रांत, आत्म्याच्या चैतन्यमय वातावरणांत, हृदयचक्षूंनीं प्रत्यक्ष करावयाची आहे. मेघाला कालिदासानंतर असें महत्कार्य करण्याचा हा पहिलाच प्रसंग मिळाला असेल. अितक्या वर्षांमधें अिन्द्राचा हा प्रकृतिपुरुष पटुकरण झाला असेलच, पण त्याचें वृद्धत्व ध्यानांत घेअून कवींनीं त्याच्या मदतीस स्वत:चें हृदय गानाच्या मिषानें दिलें आहे. स्वत:च्या प्रतिभेवर अितका विश्वास असणें प्रौढ कवीला कठीण कां असणार ? आणि ज्या अर्थीं गायन ही आत्म्याची भाषा आहे त्या अर्थीं तो संदेश पोचला असल्याविषयीं मनांत शंका येण्याचें कारणच नाहीं.

(मेघदूताच्या प्रवचनांत अेके ठिकाणीं 'नव्य-मेघदूत' हा शब्द वापरला आहे. षड्दर्शनांपैकीं न्याय-दर्शनावर सर्वप्रथम बंगाल्यांनीं म्हणे नवीन पद्धतीनें भाष्य केलें व त्याला 'नव्य-न्याय' असे नांव दिलें. त्याचप्रमाणें वंगकवीची ही मेघदूत आवृत्ति 'नव्य-मेघदूत' होय.)

# सनअी

## १

सनअीची वाणी चिरकाळाची वाणी ! शिवाच्या जटेंतून निघालेली गंगेची धारा — दररोजच्या मातीच्या जगाच्या वक्ष:स्थलावरून वहात आहे. जणूं अमरावतींतील अर्भक या मर्त्यलोकींच्या धुळीमध्यें स्वर्ग-स्वर्ग खेळण्यांसाठीं म्हणून अुतरून आलें आहे.

रस्त्याच्या कडेला अुभे राहून सनअी अैकतों तेव्हां हृदयांत काय होतें त्याचा ठाव लागत नाहीं. नित्याच्या परिचित सुख-दु:खांबरोबर त्या हुरहुरीचा ताळा घालूं जातां मेळ बसत नाहीं. दिसून येतें कीं परिचित हास्यापेक्षां ती अधिक अुज्ज्वल आहे आणि परिचित अश्रूंपेक्षां ती कितीतरी सखोल आहे.

आणखी सारखें वाटूं लागतें कीं ओळखलेलें खरें नव्हें. न ओळखलेलेंच खरें. मनांत असला मुलखावेगळा भाव येतोच कसा ? शब्द याचें कांहींच अुत्तर देअूं शकत नाहींत.

## २.

आज सकाळीं अुठल्यापासून अैकतों आहें, लग्न-घरीं सनअी वाजत आहे.

विवाहाच्या या प्रथम दिवसाच्या सुराशीं नंतरच्या नेहमींच्या दिवसांच्या सुरांचा मेळ कुठें असतो ! अव्यक्त अतृप्ति, खोल निराशा, अवहेलना, अपमान, अवसाद, तुच्छ कामनेचें कार्पण्य, ओंगळ नीरसतेनें चालविलेला कलह, क्षमाहीन क्षुद्रतेचा संघात, सरावलेल्या जीवन-यात्रेचें धूलिलिप्त दारिद्रय — सनअीच्या दैवी वाणीमध्यें या गोष्टींचा आभास तरी सांपडतो का ?

संसारावर पडलेला या सर्वपरिचित गोष्टींचा पडदा गाण्याच्या सुरांनीं, अेका झटक्यासरशीं फाडून फेंकून दिला.

जन्मजन्मान्तरींच्या जोडप्याची शुभदृष्टि कोणत्या रक्तवस्त्राच्या सलज्ज अवगुंठनांतून होत आहे तें या सनओीच्या प्रत्येक तानेतानेंतून जाणवूं लागलें.

जेव्हां तिकडे जन्मजन्मान्तरींच्या वरवधूंच्या माळांच्या अदलाबदलीच्या वेळची तान सनओीनें छेडली तेव्हां येथील जगांतल्या नवऱ्या मुलीकडे मीं पाहिलें—तिच्या गळयांत सोन्याचा हार, पायीं पैंजणाची जोडी; जणूं ती अश्रूंच्या सरोवरांतून अुगवलेल्या आनंद पद्मावरच अुभी आहे.

सुरांच्या अंतरांत शिरून बघतां ती या जगांतलाच अेक प्राणी आहे असें या अुप्पर ओळखतांहि येओीना. अेका परिचित घरची कन्या अेका अपरिचित घरची सून झालेली दिसली.

सनओी म्हणत होती, हेंच सत्य होय.

## निरूपण — 'बांशी'

सनअी किती साधें वाद्य. लाकडाची अेक नळी भोकें पाडलेली आणि तिच्या तोंडांत ताडपत्राच्या तुकडयांची दिलेली जीभ. पण हें अितकें सोपें साधें वाद्य थोड्याश्या वाऱ्याच्या मदतीनें स्वर्गीय संगीत पृथ्वीवर अवतरून देतें. सतारीचे सूर, वीणेचा झंकार यांचा प्रभाव निराळा असतो. तो ध्वनि कोरीव असतो, घडीव असतो, खणखणीत वाजतो. पण सनअीचे सूर रेशमानें विणलेले असतात. अेखाद्या कांरज्यांतून पाण्याचे फुवारे अुडावे त्याप्रमाणें सनअींतून आर्द्र सूर बाहेर पडतात आणि हृदयाला जाअून भिडतात. त्याला भिजवून टाकतात. सतारीचे सूर कापतात आणि घाव करतात. सनअीचे सूर गुदगुल्या करतात, आणि जिवाला कावरेंबावरें करून सोडतात. पापडखारानें भांडीं धुवून काढली म्हणजे जशी कोरीकरकरीत होतात तसे सूर निघतात सतारींतून. लाकडाच्या किंवा दगडाच्या भांडयांना थोडासा तेलाचा हात लावला म्हणजे तीं जशीं गुळगुळीत होतात, थोडेसें लोणी लावलें म्हणजे असले पदार्थ जसे सुळसुळीत होतात तसे सूर असतात सनअीचे. अगदीं लहानपणापासून आपण देवळांतील किंवा राजवाड्यांतील सनअीचे सूर अैकलेले असतात. पहांटे लोकांची चाहूल सुरू होण्यापूर्वींच सनअी वाजूं लागते, आणि आपल्यामधें नवीन स्फूर्ति, नवें चैतन्य अुत्पन्न करते. आजचा सगळा दिवस मजेंत जाणार आहे अशी अपेक्षा अुत्पन्न करते. त्यानंतरच्या प्रहरी सनअी वाजते तेंव्हां वाटतें कीं ती हृदयाला न्हाअूंच घालीत आहे. दहा अकरा वाजतांना सनअीला पुन्हां भरतें येतें. त्यावेळी ठरविणें मुश्किल होतें कीं ही काहूर भुकेची आहे कीं सनअीच्या सुरांची. भुकेचीच काहूर कां असेना, पण तिच्यामधें अितकें अलौकिक माधुर्य अुत्पन्न केलें या सनअीनेंच. दोनप्रहरची सनअी किती झोंपाळू असते; पण ती असते द्वाड. डोळाभर निजूं देत नाहीं आणि खडबडून जागें होअून कामाला लागावें तर तसेंहि करूं देत नाहीं. अेखादी गोड गोष्ट अैकत असावें आणि झोंपहि येत

असावी. त्यावेळीं ज्याप्रमाणें निद्रारस आणि कथारस याची फुलगुंथणी होते तशीच वेणी घालण्याचें काम ही सनअी करीत असते.

संध्याकाळच्या सनअीचे सूर जसे डोक्यांत शिरतात, तसेच पायांतहि शिरतात आणि मनुष्याला घरांतून खेंचून काढून देवदर्शनाला घेअून जातात. सूर्यास्ताचे रंग, वाढता अंधार, सुगंधी धूपाचा धूर आणि प्रेमळ स्तोत्रें यांच्या वातावरणांत सनअीचे सूर असे कांहीं मिळून जातात कीं ते आपली स्वतःची अशी अेक नवीनच सृष्टि अुत्पन्न करतात.

आणि शेवटीं रात्रीं — अुत्तर रात्रीं — देवाला आळवायला बसावें. सगळचा दिवसाचा आढावा काढावा आणि गंभीर व्हावें. तेव्हां सनअी म्हणते — मलाहि गंभीर होतां येतें. अंतर्मुख होण्यांत माझा अुपयोग कमी नाहीं.

सनअीचे सूर बाळपणापासून अैकलेले आहेत. तेंच तेंच सूर पुनः पुनः कानीं पडतात आणि आपली ती चिरपरिचित पण लोक-विलक्षण अशी सृष्टि खडी करतात. स्वर्गालाच पृथ्वीवर आणण्याचें काम हे सूर करीत असतात. या वर्णनांत यत्किंचितहि अतिशयोक्ति नाहीं. तेंच तेंच चिरपरिचित जग सनअीच्या सुरांत न्हाअून निघालें कीं निराळेंच दिसूं लागतें. बागेंतील झाडांवर संध्याकाळच्या सूर्याचे सोनेरी किरण पडल्याबरोबर झाडें जशीं निराळींच होतात आणि वाटूं लागतें कीं येथली नेहमींचीं झाडें पळून गेलीं आहेत आणि त्यांची जागा घेण्यासाठीं नंदनवनांतील दिव्य वृक्ष येथें येअून अुभे आहेत; त्याचप्रमाणें हे सनअीचे सूर आसपासच्या सगळचा सृष्टीला नवीनच अोप देतात किंवा मीना चाळवतात.

या नव्या जगाचा प्रभाव हृदयाच्या ठाअीं अितका कांहीं खोलवर पोंचतो कीं नेहमींचें गद्यजगत् खोटें आहे आणि सनअीच्या सुरांनीं रंगवलेली ही संगीत सृष्टीच खरी आहे असा हृदयाला प्रत्यय येतो.

मंदिरामधें आतां पूर्वीप्रमाणें चौघडे आणि सनया वाजत नाहींत. राजप्रासाद अिंग्रजी राज्य झाल्यापासून माणसांतून अुठून शहराबाहेर बसले आहेत. आणि तेथेंहि चौघडया सनयांचें स्थान परदेशी बँडला

मिळूं लागलें आहे. अेखाद्या सणाच्या दिवशीं सनअी वाजते खरी. पण ती चिरपरिचित गंधर्व सृष्टि अुत्पन्न करण्याच्या अैवजीं आपल्याच गतवैभवाचा विलाप करीत असते. तेव्हां आजकाल सनअी अैकूं यावयाची ती लग्नसराअींतच. आजकाल लग्नप्रसंगींची सनअी कधीं अैकूं आली म्हणजे मनांत विचार येतो कीं अेखाद्या वेलीचें कोंवळें रोपटें अेका बगीच्यांतून काढून दुसऱ्या बगीच्यांत लावलें जात आहे किंवा अेखादी फांदी कलम केली जात आहे आणि त्या आवश्यक आणि अिष्ट क्रियेंतील दुःख झांकून टाकण्याचा हा प्रयास चालला आहे.

पतिगृहीं जाणारी नववधू सनअीचे सूर अैकून ज्या नव्या आयुष्याची कल्पना करते तेंच आयुष्य तिच्या अनुभवास येतें का? अुटणी आणि अभ्यंग स्नान, मिष्टान्न आणि सुंदर कपडे, मानपान आणि विनोद, मंत्र आणि होमहवन या सगळ्यांच्या वातावरणामुळें जीवनाविषयीं जी कांहीं प्रसन्न, पवित्र आणि सर्वमंगल कल्पना रचली जाते तीच पुढें अनुभवास येते काय?

पुढें जेव्हां सासूचा कांच आणि पतीची अनास्था, माहेरच्या प्रियजनांची लाचारी आणि त्यांतून अुत्पन्न होणारी त्यांची अुपेक्षा, हृदयांत अुठणाऱ्या नव्यानव्या अुमेदी आणि त्यांचा होणारा कोंडमारा, यांचा कठोर अनुभव येअूं लागतो तेव्हां ती किशोरी म्हणत असेल कीं सनअीचे सूर बन्द पडले म्हणूनच हें असें झालें आहे. सनअी जर पुनः वाजूं लागेल तर सर्व कांहीं आपोआप सरळ होअील. कांट्यांना फुलें येतील, चिमटे चुंबनाअितके गोड होतील, आणि अुपालंभनें विनोदाप्रमाणें गुदगुल्या करूं लागतील. ही सनअी कां बंद पडली? तिला पुनः बोलावण्यासाठीं ,कुणाला पाठवितां येअील?

अनुभवी जग म्हणतें कीं दुःख सत्य आहे, सुख मिथ्या आहे— केवळ माया आहे. श्रद्धा म्हणते, सनअीची सृष्टीच सत्य होय. निःस्वन जग — कोलाहलाचें जग — अंधकाराअितकें भीषण असलें तरी अंधकाराअितकेंच असत्य असणार. त्याचा पाडाव करण्यासाठीं शस्त्रास्त्रे

घेऊन सज्ज होण्याची जरूरी नाहीं. फक्त अेका सनअीला परोपरीनें विनवून, समजावून आणली आणि तिच्या बोलत्या सुरांचा प्रकाश केला कीं बस. सर्व कांहीं सरळ आणि सुरळीत झालेंच पाहिजे. या अनाथ जगाला सनाथ करण्याचें सामर्थ्य अेका सनअींतच आहे. ब्रह्मदेवानें सृष्टि अुत्पन्न केली आणि सनअीनें येअून ती सुन्दर आणि श्रवण-सुभग बनवली. यासाठीं जीवनसाधनेंत सनअीच्या आराधनेलाच प्राधान्य दिलें पाहिजे. सनअी हीच खरी जीवनदेवता आहे.

# संध्या आणि प्रभात

## १

येथें सायंकाळ झाली. हे सूर्यनारायणा, कोणत्या प्रदेशांत, कोणत्या समुद्राच्या पैलतीरीं यावेळीं तुमची पहांट होत असेल?

येथें अंधारांत रातराणी शहारली, शेज-घराच्या अुंबरठ्यापाशीं आलेल्या अवगुंठिता नववधूप्रमाणें. याचवेळीं पहांटे अुमलणारा सोनचांफा कुठें बरें फुलला असेल?

कुणाला जाग आली. कुणी संध्याकाळीं पेटवलेला दिवा मालवला, आणि रात्री गुंफलेली शेवंतीच्या फुलांची माळ फेंकून दिली.

येथें अेकामागून अेक दारांना अडसर पडले, तेथें खिडक्या अुघडल्या गेल्या. येथें होडी घाटाला लागली, नावाडी झोंपी गेला; तेथें शिडांत वारा भरला.

तेथें सगळ्यांनीं सराअी सोडली आणि पूर्वाभिमुख होअून ते चालूं लागले. त्यांच्या भालप्रदेशीं सकाळचें अून पडलें आहे. त्यांची यात्रेची पुंजी अजून संपली नाहीं. त्यांच्यासाठीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या खिडक्या खिडक्यांमधून काळ्याभोर नेत्रांतून करुण कामना अनिमेष ओसंडत आहे; रस्त्यानेंहि त्यांच्या समोर आपली लाल निमंत्रणपत्रिका जणूं अुघडून धरली आहे आणि म्हणत आहे, 'सगळी सांगता सिद्ध झाली आहे तुमच्यासाठी.' त्यांच्या हृदयांत रक्ताच्या ताला तालांतून जयभेरी वाजूं लागली.

येथें सर्वजण सायंकाळच्या मंद प्रकाशांत त्या दिवशींची शेवटची तरी गांठून पार झाले.

सराअीच्या अंगणांत त्यांनीं आपली वाकळ पसरली. कुणी अेकटे आहेत, तर कुणाचे सोबती थकले भागले आहेत. समोरच्या

रस्त्यावर काय काय आहे हें अंधारामुळें कळायला मार्ग नाहीं. मागें टाकलेल्या रस्त्यावर जें जें घडलें होतें त्याविषयीं आपापसांत बोलणें चालतें. पुढें बोलतां बोलतां ते अेकेरीवर येतात. शेवटीं चुप बसतात. त्यानंतर अंगणांतूनच वर बघतात तों आकाशांत सप्तर्षि अुगवले आहेत.

हे सूर्यनारायणा, तुमच्या डावीकडची ही संध्या, तुमच्या अुजवीकडची ती प्रभात या दोघींना तुम्ही अेकत्र आणाना! हिची छाया तिच्या प्रकाशाला अेकदां मांडीवर घेअून त्याचें चुंबन घेओ, हिचा पूर्वी राग तिच्या बिभासाला आशीर्वाद देअून जावो.

## निरूपण — संध्या ओ प्रभात

अुषःकाल आणि संध्याकाळ यांच्यांत केवढें महदन्तर! अेकांत अुत्साह आहे तर दुसऱ्यांत अनुभव आहे. अेकांत प्रवृत्तीचा पराक्रम आहे तर दुसऱ्यांत निवृत्तीची समृद्ध शान्ति. अेकामधें आहे पेरणी तर दुसऱ्यामधें लणणी (सुगी). प्रभात सामाजिक आहे, संध्या कौटुम्बिक आहे. प्रभातकाळीं पुरुषार्थी लोक घरांतील प्रियजनांना अुत्कंठेंत टाकून प्रवासाला निघतात. संध्याकाळी तेच देशदेशान्तरींची समृद्धि आणि अनुभूति घरीं आणून अिष्ट जनांसह तिचा अुपभोग घेतात. हें सर्व कसें घडतें? सूर्यनारायणाच्या आगमनानें टवटवीत लालबुंद प्रभात फुलतें तर त्यांच्या गमनानें संध्याकाळ पुंजाळते.

सूर्य तर सनातन यात्री. त्याच्या पुढें पुढें प्रभात धांवत असते आणि मागें मागें संध्या अुतरत असते. वडिलांनीं आपल्या दोन मुलांना अुंदीर मांजर खेळण्यासाठी दोन हातांत धरावें त्याप्रमाणें प्रभात आणि संध्या यांच्या घिरट्या चालूंच असतात.

जीवनामधें वार्धक्याच्या मांडीवर शैशव जसें येअून बसतें, वृद्ध हिंवाळ्याचे बोट धरावयास जसा बालवसंत येतो, त्याप्रमाणें संध्येच्या मांडीवर बसावयास आणि तिच्या चुंबनाच्या आशीर्वादाची धन्यता अनुभवावयास प्रभातकाळानें जवळ कां येअूं नये?

खरें आहे, पण दीर्घ दिवस आणि दीर्घ रात्री दोहोंच्या मधें पडल्या आहेत ना! या दोहोंपैकी कुणा अेकाचा जरी संकोच होअूं शकेल तरच पूर्वी रागाच्या सुरांतून बिभासाचे सूर फुटूं लागतील. कवि सूर्यदेवांना प्रार्थना करतो कीं विश्वंभरा अेवढें दृश्य दाखवाना, सूर्यदेव म्हणतात — अवश्य अवश्य. जरा अुत्तर ध्रुवाच्या बाजूला या म्हणजे तुमची कल्पना सहज तृप्त होअील.

[ 'दिवस बोलतो अुठा अुठा, रात्र विसावा घ्या म्हणते' ही केशवसुतांची कविता येथें आठवल्यावांचून रहाणार नाहीं. शेक्स्पीअरची

देखील अशीच अेक कविता आहे. गूढवादी ब्लेकचीहि अशाच प्रकारची कविता असावी. पण येथें तर वंगकवीनीं दिवस आणि रात्रीला बाजूस सारून अुभय संध्यांना अेकत्र येण्याचें आमंत्रण दिलें आहे.

हिरव्यागार पृथ्वीवर लांबवर पसरलेला लाल धुळीचा रस्ता म्हणजे प्रवाश्यांना रोज सकाळी मिळणारें आमंत्रण-पत्रच होय. अंधकार कमी झाला म्हणजे कुंकुमवर्णाच्या आमंत्रणाची सुरळी नजरेसमोर अुघडूं लागते आणि मग 'चरित्रां'*ना असल्याजागी थांबवत नाहीं. तीं चालूंच लागतात.]

२

निरूपण म्हणून नव्हे, पण 'संध्या ओ प्रभात' ही लिपिका वाचतांच ताजें झालेलें लहानपणचें अेक संस्मरण येथें द्यावेसें वाटतें.

लहानपणीं जेव्हां शाळेंत शिकलों कीं पृथ्वी वाटोळी आहे तेव्हां पहिला विचार मनांत आला तो हा कीं या क्षणीं येथें संध्याकाळ होत आहे, अंधार पडत आहे, त्याचवेळीं दुसरीकडे कुठें तरी पहांट होत असेल आणि अंधार तेथून हटत असेल. आपण सूर्याचें बिंब अस्ताला जातांना पाहून म्हणत आहोंत — 'गेला, गेला. सूर्य अस्ताला चालला, बुडाला. आतां कांहीं तो दिसत नाहीं.' तिकडची मुलें पूर्वेकडे तोंड करून म्हणत असतील — 'हें पहा तांबडें फुटलें. आतां सूर्य अुगवेल. आला, आला. सोन्याचें तळें छलछल करीत असावें तशी त्याची फक्त रेघ दिसते; आतां मंदिराच्या घुमटासारखा फुगून वर निघाला. आतां अगदीं चेंडूप्रमाणें पूर्ण वाटोळा होअून आकाशांत वर आला.'

आपण येथें परवचा म्हणत आहोंत. तेथील मुलें भूपाळ्या म्हणत असतील. अेकच सूर्य तिथें पहांट करतो, अिथें अंधार पाडतो. किती विचित्र ! हाच सूर्य अुद्यां तिथें संध्याकाळ पाडील आणि येथें पहांट घेअून येअील. आमचा विष्णु आम्हा दोघा भावांना

* 'पायमळणीची वाट', निरूपण पहावें.

दोन हातांत धरून गरगर फिरवीत असे. या खेळाला आम्ही अुंदीर मांजर म्हणत असूं. आम्ही अेकमेकांना धरण्याचा प्रयत्न करीत गरगर धांवावें आणि विष्णूनें आम्हांला दूर धरून भेटूं देअूं नये. त्यावेळीं आम्हांला भोंवळ येण्यापूर्वींच विष्णूला भोंवळ येअी. आणि खेळ खलास होअी. विष्णु आम्हां दोघांमध्यें अुभा असे. येथें सूर्य पृथ्वीच्या बाहेर राहून स्वतःहि प्रदक्षिणा करतो आणि सकाळ संध्याकाळकडून अुंदीर मांजराचा खेळहि खेळून घेतो. कसें विचित्र दिसतें!

पुढें केशूनें सांगितलें, 'अरे तसें नाहीं. सूर्य पृथ्वी-प्रदक्षिणा करीत नसतो. अुलट पृथ्वीच सूर्याची प्रदक्षिणा करीत असते.' 'तर मग ही पृथ्वीच विष्णूप्रमाणें सकाळ-संध्याकाळला हातांत गरगर फिरवित असली पाहिजे आणि त्यांचें अुंदीर मांजर चालत असलें पाहिजे.' माझी कल्पनाशक्ति पाहून विष्णु खुश झाला आणि शाबासकी देण्याच्या अिराद्यानें त्यानें मला चांगलें धोपटून काढलें, पुरे पुरे म्हणतां पुरेवाट झाली. त्यानंतर वाटूं लागलें की सकाळ आणि संध्याकाळ हीं कधींच भेटूं शकत नाहींत याला काय करावें? पुष्कळ विचार केला. दोन अुपाय सुचले. पण दोन्ही अुपायांनीं मन निराशच झालें. सूर्यच जर नाहींसा होअील तर पहांट आणि संध्याकाळ अेक होतील खऱ्या पण मग सर्वत्र, सगळीकडे गुडुप अंधार होअील, हें कांहीं बरें नव्हें. दोन सूर्य जर पृथ्वीभोंवती अुंदीर मांजर करतील तर सकाळ-संध्याकाळ दोन्ही मरून जातील. हेंहि कांहीं चांगलें होणार नाहीं.

पण जर पृथ्वी लहान लहान होअूं लागली तर मात्र सकाळ-संध्याकाळ अगदीं जवळ जवळ येअूं लागतील. शेवटीं केव्हांतरी त्या मिसळूनहि जातील. पण तसें झालें तर या पृथ्वीवर अुभें रहायला आपल्याला जागाच अुरणार नाहीं. शून्य पृथ्वीवर चालणाऱ्या शून्य शाळेंतील आम्ही शून्य मुलें होअूं. आणि मग पहांट आणि संध्याकाळ हीं देखील शून्य होतील. अुंदीर मांजराचा खेळहि शून्य होअील. गम्मत होअील. पण असली गम्मत आम्हांला नको. सकाळची दशमी आणि संध्याकाळची प्रमोदी याहि शून्य झाल्या तर घ्या काय?

लहानपणीं कल्पनाशक्ति खूप धांवत असे. पण ती काव्याच्या क्षेत्रांत न शिरतां विज्ञानाच्या क्षेत्रांत पोंचत असे. आतां वाटतें कीं जर त्यावेळीं अेखाद्या प्रतिभावान कवीचा संपर्क लाभला असता तर काव्य आणि विज्ञान दोहींचा सारखाच विकास होअून त्यांतून तत्त्वज्ञान परिणत झालें असतें.

लहानपणीं देखील पोर-विज्ञानांतून वेडेवांकडें तत्त्वज्ञान निघत नव्हतें असें नाहीं. जेव्हां केशूकडून समजलें कीं सूर्य फिरत नसून पृथ्वीच फिरत असते तेव्हां कुठेंतरी अैकलेली म्हण मी अेकसारखा घोकूं लागलों, 'दिसतें तसें नसतें, दिसतें तसें नसतें.' आमच्या विष्णूचा स्वभाव टवाळ. तो मला वेडावत म्हणूं लागला, 'असतें तसें दिसत नसतें.' पुढें तर "आगगाडी कशासाठीं कशासाठी, अिंग्रजांच्या पोटासाठीं पोटासाठीं. भिअूं नका, भिअूं नका. खंडाळ्याच्या घाटासाठीं घाटासाठीं." या आमच्या आगगाडीच्या लोकगीताप्रमाणें आमच्या या दोन म्हणी वापरूं लागलों. दोन्ही म्हणींचे ताल निर-निराळे असत.

पुढें जेव्हां पृथ्वी लहान झाली तर काय होअील याची कल्पना करीत असतां सुचलें कीं जिला आपण संध्या म्हणतो तिलाच शेजा-रच्या गांवचे लोक पहांट म्हणू लागतील आणि मग अेकाच वेळेला पहांट म्हणावें कीं संध्याकाळ म्हणावें याचीं भांडणें लागतील. आणि शेवटीं तोड काढावी लागेल कीं पहांट तीच संध्याकाळ, संध्याकाळ तीच पहांट.

याची चर्चा करतां करतां आणखी अेक विचार सुचला, कीं आमचें तुळशी वृन्दावन माझ्या पूर्वेला आहे आणि केशूच्या पश्चिमेला आहे, (आम्ही दोघे वृन्दावनाच्या निरनिराळ्या बाजूनें अुभे होतों) मग वृन्दावनाला पूर्व म्हणावें कीं पश्चिम? शेवटीं आम्ही ठरविलें कीं पूर्व आणि पश्चिम हीं नांवें आहेत. खरी पूर्व आणि पश्चिम कुठेंच नाहींत. या सर्व घोटाळ्यांतून अेवढा बोध आम्ही घेतला कीं 'विचार करून देखील कांहीं निर्णय होअूं शकत नाहीं.'

त्याच दिवसांत जेव्हां माया हा शब्द कुठेसा अैकला तेव्हां माझ्या मनाशीं मीं ठरविलें कीं पूर्व पश्चिम ही माया आहे. सकाळ संध्याकाळ माया आहे. सूर्य व पृथ्वी यांचें फिरणें माया आहे. ज्याला आपण 'कर्ता' म्हणतों तो तसा नसतो. तेव्हां कर्ता, कर्म आणि क्रियापद हीं देखील मायाच आहेत. मग विचार न करतांच मी बोलूं लागलों — आपण मोठे होतों ही माया आहे. शाळेंत शिकतों ही माया आहे. भूक लागते हीहि मायाच आहे.

प्राचीन काळचें तत्त्वज्ञान अशाच छांदिष्ट वृत्तींतून तयार झालेलें तर नसेल ना? मनाला येअील तसें बोलावें. त्यांतून शेवटीं जें खरें ठरेल त्याला धरून ठेवावें.

# जुनाट वाडा

१

कोणी पिढीजाद श्रीमंत हळू हळू गरीब झाला आहे, त्याचा हा वाडा. दिवसेंदिवस त्याचेवर कठोर काळाचे ओरखडे ओढले जात आहेत.

भिंतीवरचा चुना झरून पडतो आहे, गिलावावर्जित जमिनीला नखानें खोदून खोदून निघालेल्या धुळींत चिमण्या पंख फडफडवीत आहेत, चण्डी-मण्डपांत कबुतरें विच्छिन्न श्यामल मेघांच्या खंडांप्रमाणें थव्या-थव्यांनी नांदत आहेत.

वरच्या मजल्यावरील अुत्तरेकडील दाराचें अेक कवाड केव्हांसें मोडून पडलें होतें याची कुणी दखलहि घेतली नव्हती. अुरलेलें दुसरें कवाड — शोकातुर विधवेप्रमाणें – वाऱ्यानें क्षणोक्षणीं ढळून पडे, तिकडे कुणी ढुंकूनहि बघत नसे.

चांगला तीन मजली वाडा; पण त्याच्या कायत्या पांचच खोल्या आज माणसांच्या वापरांत आहेत. बाकीच्या सगळ्या बंद. जणूं या पंच्या-अेंशी वर्षांच्या म्हाताऱ्याच्या, अुभ्या जीवनांतल्या सर्वच गोष्टींना घेरून राहिलेल्या गत काळच्या कुलुप-बंद स्मृतीच. फक्त अेका भागांतच चालूं काळचें चालणें फिरणें; अुठणें बसणें.

गिलावा झरलेला, विटा निघालेला तो वाडा, ठिगळांची गोधडी पांघरलेल्या अुदासीन वेड्याप्रमाणें रस्त्याच्या कडेला अुभा आहे.

तो स्वत:कडेहि बघत नाही कीं दुसऱ्यांकडेहि.

२

अेके दिवशीं भल्या पहांटे तिकडून बायकांच्या रडण्याचा स्वर अेकूं आला. कळलें कीं, त्या घरचा वंश-वेल असा अेकुलता अेक मुलगा —जो फिरत्या ग्राम-नाटक मंडळींत राधिकेचा पार्ट करून कांहींसा मिळवता झाला होता — आज अठरा वर्षांचा होअून वारला.

चार दिवस बाया रडल्या, त्यानंतर त्यांचेंहि काय झालें तें कांहींच कळलें नाहीं.

त्यानंतर साऱ्याच दारांना कुलुपें पडली.

पण तें अुत्तरेकडील अेकमात्र अनाथ दार मोडूनहि पडत नाहीं कीं बंदहि होत नाहीं. व्यथित हृत्पिंडाप्रमाणें वाऱ्यानें स्वतःला धडाधड आपटून घेत आहे.

३

अेके दिवशीं संध्याकाळीं त्याच वाड्यांतून संध्याकाळच्या सुमारास मुलांचा गलका अैकूं आला.

पहातों तों, व्हरांड्याच्या कठड्यावरून अेक लाल किनारीचें लुगडें लोंबकळत वाळत आहे.

बऱ्याच दिवसानंतर वाड्याच्या अेका भागांत भाडेकरी रहायला आले आहेत. त्याचें अुपार्जन जेमतेम, पण मुलामुलींची संख्या मात्र भरपूर.

थकली भागलेली आअी कांतावून त्यांना चोप देते; मुलें जमिनी-वर लोळण घेतात, रडतात, किंचाळतात.

अेक म्हातारीशी मोलकरीण सबंध दिवसभर राबते, आणि मालकिणीशीं भांडते. ‘ही चाललें’ म्हणून धाक घालते, पण जात मात्र नाहीं.

४

वाड्याच्या या भागाची रोज थोडीथोडी डागडुजी चालते.

फुटक्या तावदानांच्या जागीं कागद चिकटवण्यांत आले; व्हरां-ड्याच्या कठड्याला पडलेल्या फटी बांबूच्या खपाट्यांनीं भरण्यांत आल्या. झोंपण्याच्या खोलींतल्या मोडक्या खिडक्यांना विटांचे टेके लावण्यांत आले. भिंतींना नांवाची सफेदी करण्यांत आली, पण जुन्या काळ्या डागांचें अस्तित्व मात्र त्यांतूनहि दिसून येअी.

गच्चीवरील कुंडींतून अेके दिवशीं सहसा अेक मरतुकडेसें पाता-बहाराचें (croton) रोपटें, लावण्यांत येतांच आकाशाला बघून बिचारें गोरेमोरें झालें. जवळच भिंत भेदून फोफावलेला पिंपळ सरळ ताठ अुभा होता. त्याची या पाता-बहाराकडे दृष्टि जातांच त्याच्या पानापानांतून हास्याचा सळसळाट निघाला.

विपुल धनाचें विपुल दारिद्र्य. त्याला गरीबड्या हाताच्या तुट-पुंज्या कौशल्यांनीं झाकूं जातां अुलट त्याची अब्रू चव्हाट्यावर आली.

अुत्तरेकडील त्या वैराण भागाकडे मात्र कुणीच ढुंकूनहि बघितलें नाहीं. त्याच्या त्या जोडी नसलेल्या कवाडाची आजहि वाऱ्यानें—हतभाग्याच्या अूर बडविण्याप्रमाणें सारखी आदळ आपट चालत आहे.

## निरूपण --पुरोनो बाडी

सकृत्‌दर्शनी वाटतें कीं या शब्दचित्रांत निष्कारण बारीक सारीक तपशील दिला आहे. पण जरा न्याहाळून पाहतांच खात्री होते कीं लेखणीच्या पांच दहा फटकाऱ्यांनीं अेक सबंध अुठावदार चित्र येथें रेखाटलें आहे आणि स्पष्ट न सांगितलेल्या कितीतरी महत्त्वाच्या गोष्टी हें चित्र मूकपणें सूचित करीत आहे.

अेखाद्‌या नवलकथेचें हें प्रारंभिक प्रकरण असावें असेंहि वाटल्यावांचून रहात नाहीं.

जुन्या काळीं जागेची कधी कमतरता नसे. मालमसालाहि मुबलक मिळे. त्यामुळें अुंच अुंच भिंतींचे जंगी वाडे लोक बांधत. पण मजल्यावर मजला चढवण्याचें त्यांना सुचत नसे. चांगलेंच श्रीमंत आणि पराक्रमी घराणें असेल तरच घरावर माडी दिसावयाची. तीनमजली घर म्हणजे तर वैभवाची सीमा झाली. असला वाडा बांधणारे लोक चांगलेच पराक्रमी असले पाहिजेत. आठ आठ, दहा दहा कर्ते भाअू आसपासच्या प्रदेशावर आपला वचक ठेअून मोठ्या अितमामानें घराणें चालवत असले पाहिजेत. अशा घराण्याला अुतरती कळा कां लागली? 'घरे बाहिरे' या कादंबरींत रविबाबूंनीं सांगितलें आहे कीं घरांतील पुरुषांना व्यसन नसणें म्हणज़े खानदानीचा अैब मानला जात असे. पुरुषांनीं व्यसनांत गर्क असावें, बरीचशी आशा दाखवून अेकाअेकीं अिहलोक सोडून जावें आणि स्मारक रूपानें कुलीन घराण्यांतील रूपवती विधवा घरांत ठेवून जावें. तसेंच येथें झालें असेल काय? अैशआरामाला वाहिलेल्या कुटुंबानें विद्‌या, कला, कारभार आणि कर्तबगारीकडे दुर्लक्ष केलें असल्यास नवल काय! घरांतील संपत्तीबरोबर मनुष्यबळहि कमी झालें. अकाल मृत्यु नेहमींचा होअून बसला. श्रीमंती होती तोंवर देखण्या मुली कैंक पिढ्या घरांत आणल्यामुळें रूपसंपत्ति मात्र घरांतून गेली नव्हती. धन गेलें, प्रतिष्ठा गेली, शेवटचा आधार म्हणून राखून ठेवलेले दाग-दागिनेहि गेले. कुलपरंपरेची चाडहि नाहीं होय म्हणतां शेवटीं अुठून गेली. सर्वच बाजूनें शून्य अशा घरांत कुलदीपक म्हणून अेकच लहान मुलगा

अुरलेला. चरितार्थासाठीं त्यानें काय करावें? नाजुकपणा खेरीज त्याचे जवळ कांहींच नव्हतें. खेडोखेडीं राधाकृष्णाचे खेळ करून दाखविणाऱ्या (शखेर यात्रा–मनोरंजक नाटकमंडळी) भटक्या नाटक कंपनीनें दया दाखवून त्या कोंवळ्या मुलाला आपल्या ताब्यांत घेतलें. अनियमितपणें कां होअीना चार पैसे घरीं येअूं लागले. घरांतील बायांनीं तेवढ्यांतच संतोष मानून दिवस चालविण्याचें ठरविलें. भोळा कर्तृत्वशून्य नाजुक मुलगा. नाच्यापोराचें काम करीत गांवोगांव हिंडला असेल. अठरा वर्षाचा देखील झाला नसेल अितक्यांत मृत्यूनें त्याला गांठलें. हा केवळ अपमृत्युच होता कीं त्याच्या मागें दया किंवा किळस वाटण्याजोगें विचित्र जीवन होतें?

घरच्या बाया रडल्या. दुसरें काय करणार? घर सांभाळणेंहि कठीण. घरचा मिणमिणता दिवाहि अठराविश्वे दारिद्र्य मागें ठेअून मालवला. आतां त्या घरांत दिवा तरी कुठून लावावयाचा? वाड्याला भाडेंहि मिळेना. आजकालचें आटोपशीर घर असतें तर गोष्ट निराळी. वाडा विकला जात नाहीं. भाडेंकरू कुणी मिळत नाहीं अशा स्थितीत अेका अडलेल्या मनुष्यानें स्वस्तांत मिळतो म्हणून मोडका वाडा भाड्यानें घेतला असेल.

घरच्या अनाथ असहाय बायांनींच तो वाडा भाड्याला दिला कीं सावकारानें कर्जापायीं वाडा ताब्यांत घेअून बायांना तो खाली करावयास लावला आणि त्यांच्या वतीनें हे नवे भाडेंकरू येअून राहिले हें कोण सांगूं शकेल? सावकार असले तरी त्यांना देखील वाड्याची डागडुजी करण्याची अैपत नसावी. किंवा आवश्यकता वाटत नसावी. येथवर पाळी आली तरी पडका वाडा आपली शान सांभाळून होता. वीर पुरुष घायाळ होअून रणांगणावर मातींत लोळत असला किंवा लोकांच्या पायाखालीं तुडवला जात असला तरीहि त्याची अब्रत कमी होत नाहीं. पण त्याचें शव झांकण्यासाठीं जर कुणी तीन दमडीचें फाटकें अुपरणें पसरलें तर मात्र सर्व कांहीं विश्री दिसूं लागतें. त्याचप्रमाणें आपल्या कवींना त्या वाड्याची ती डागडुजी सहन होअीना. मोठ्या खानदानीचा क्षय झाला. वाडा जीर्ण होअून

भुताटकीच्या लायक झाला तरीहि तें सर्व कवींना सहन होत होतें. पण वाड्याच्या अिभ्रतीला न शोभणारी ही डागडुजी पाहून मात्र त्यांचें काळीज कळवळलें आणि त्यांनीं या शब्दचित्राच्या रूपानें येथें अश्रु ढाळले. येथें त्यांनीं दिलेल्या सर्व अुपमा देखील या कारुण्याला पोषकच आहेत. हें सर्व वर्णन वाचून आपलेंहि हृदय कळवळून अुठतें.

केव्हां केव्हां कांहीं थोर संस्कृतींचेंहि असेंच होतें. असीरिया, सीरिया, ग्रीस, खाल्डिया वगैरे संस्कृतीच्या आजच्या वारसांचे हाल पाहिले म्हणजे वाटतें कीं यापेक्षां अमेरिकेंतील माया संस्कृतीचा जो लोप झाला, मध्य अेशियांतील संस्कृति वाळूच्या लाटांखालीं दडपली गेली आणि कांबोडियामधील अंकोरथॉम येथील प्रचंड संस्कृति वनस्पतींनें घेरून गिळंकृत केली ही त्यांचेवर अीश्वराची दयाच होय.

२

पोलीस खात्यांत अेकाप्रकारची परीक्षा असते. अेका पोस्टकार्ड-वर अेखाद्या घटनेचें चित्र काढलेलें असतें. तें पोस्टकार्ड अुमेदवाराच्या हातांत न्याहाळून पहाण्यासाठीं फक्त तीनच मिनिटें ठेवतात. आणि मग तें काढून घेअून त्यांतील घटनेसंबंधानें तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न विचार-तात. चित्रांतील ट्रामचा नंबर काय ? ती कोणत्या दिशेनें जात आहे ? सायकलवाला रस्त्याच्या योग्य दिशेनें चालला आहे किंवा नाहीं, म्युनिसिपालिटीच्या कंदिलाच्या छायेवरून किती वाजले असतील याची कल्पना वगैरे वगैरे अनेक प्रश्न विचारतात. निरीक्षणशक्ति आणि अनुमानशक्ति दोहोंची चांगलीच कसोटी होते. शर्लॉक होम्सचे प्रताप ज्यांनीं वाचले असतील त्यांना याची कल्पना येअील.

आपल्या येथें जर घरावरून लग्नाची अेखादी वरात गेली तर दारा आडून ओझरतें पाहून देखील कित्येक स्त्रिया वरातींत कोण कोण बायका होत्या, कोणी काय काय दागिने घातले होते, कुणाच्या साडीच्या रंगाशीं चोळीचा रंग मिसळत नव्हता वगैरे सर्व कांहीं तपशील अगदीं फोटो घेतल्या प्रमाणें बिनचूक आणि सविस्तर सांगतात.

असें दिसून आलें आहे कीं, कित्येक अिंग्रज देखील अेखादें दृश्य पहातांक्षणींच त्यांतील सर्व गोष्टी फोटो खेचल्या प्रमाणें डोळयांत भरून घेतात.

जसें पाहिलें तसें डोळ्यांच्या प्लेटवर पूर्ण दृश्य अुमटवून घेण्याची ही शक्ति झाली. कित्येक लोक — अर्थात् ते स्वभावानें कवि असतात — या सर्व तपशिलाबरोबर पाहिलेल्या दृश्याचें हार्दहि ताबडतोब पकडतात. आणि संबंध दृश्याच्या आत्म्याशीं अेकजीव होतात. त्यांनीं अेखाद्या देखाव्याचें, प्रसंगाचें, किंवा घटनेचें शब्दचित्र जर खेंचलें तर तें चित्र जणूं काय आपण प्रत्यक्ष डोळ्यानें पहात आहोंत असा भास तर होतोच. पण याहून पुढें जाअून जणूं काय तें दृश्य आपल्या सहानुभूतीचा विश्वास बाळगून स्वतःचें हृदयाविष्करणहि करीत आहे असें वाटतें. चित्र आणि त्यांतील भाव दोन्ही अेकदमच व्यक्त करण्याची शक्ति असाधारण शक्तिशाली लेखकांतच दिसून येते. सारें वर्णन चित्रमय चमत्कृतिजनक आणि पारदर्शक भाववाही असतें. 'जुनाट वाडा' हें अशाच प्रकारचें अेक शब्दचित्र आहे. वाचकाची कल्पनाशक्ति कमावण्याला असलीं चित्रें अुत्तम साधनरूप असतात.

ज्यांचें अैश्वर्य अलोट होतें त्यांचें दारिद्र्यहि तितकेंच भयाण असतें. तें दारिद्र्य आहे तसेंच अुभें ठेवलें तर निदान सात्विक सहानुभूति अुत्पन्न करतें. पण जर तेंच दारिद्र्य दुर्बळ साधनांनीं कसें बसें झांकण्याचा अर्धवट बावळट प्रयत्न केला तर तें दारिद्र्य झांकलें तर जात नाहीच पण अधिकच विश्री आणि भिकार दिसूं लागतें. आणि मग सौजन्यसहज सहानुभूतिहि आटून जाते. हा अेक सिद्धान्त या वास्तव चित्रांत अुठून दिसतो. पण त्यांत कांहीं चित्राचें हार्द सामावलेलें नाहीं.

(अनुभवी लेखकांनीं असलीं दृश्यें स्वतः लिहिण्याचा प्रयत्न करून पहावा. या बाबतींत सफळता मिळणें किती कठीण आहे याचा अनुभव झाल्यानंतरच असल्या कृतीच्या मुळाशीं केवढें सामर्थ्य असावें लागतें हें ते समजूं शकतील.)

# गल्ली

आमची ही चिरेबंदी गल्ली किती तरी वळणांनीं, कधीं अुजवीला तर कधीं डावीला वळत अेकदां केव्हांशीं कांहींतरी शोधायला म्हणून निघाली होती. पण जिकडे वळते तिकडे तोंडघशी पडते. अिकडे घर, तिकडे घर, समोरहि घर.

वर जिथवर तिची नजर पोंचते तिथवर तिला आकाशाची अेक रेषा काय ती दिसते, अगदी तिचेसारखीच सडपातळ, तिचेसारखीच नागमोडीची. आकाशाच्या या कात्रणाला पाहून गल्ली विचारते, 'आक्का, तूं कोणत्या नील नगरीची गल्ली ग?'

दुपारच्या वेळीं अंमळ तिला सूर्य दिसतो नि ती आपल्याशीच म्हणते, 'कांहींच कळलं नाहीं.'

पावसाळी मेघांची छाया गल्लीच्या दुतर्फा घरांमध्यें घन होअून पडे तेव्हां वाटे कीं गल्लीच्या पानावरील प्रकाशावर कुणी जणूं पेन्सिली रेषेनें काट मारला आहे. पावसाचा लोंढा चिऱ्यांवरून जेव्हां वाहूं लागे तेव्हां वाटे की गारुडी पाअूस डमरू वाजवीत सापाचा खेळच जणूं करीत आहे. निसरडें होतें, चालणाऱ्या माणसांच्या छत्र्यांच्या टकरा होतात. मधेंच गच्चीवरचें पाणी नळांतून छत्र्यांवर झांप घेतें नि चालणाऱ्यांना चमकावून सोडतें.

गल्ली वैतागून म्हणते, 'आजवर कशी कोरडी ठणठणीत होत्ये मी, कसलीच पीडा नव्हती. मग कशाला आला हा फुकाचा धारावाही अुत्पात.'

फाल्गुनांतले दक्षिणेकडचे वारेहि या गल्लींत भिकारड्यागत लागतात. जिकडे तिकडे कागदाचे चिटोरे आणि धूळ चकळ वकळ अुडत असते. गांगरलेली गल्ली हतबुद्ध होअून म्हणते, 'कोणत्या पिसाट देवाचे हे वेडेचार असावेत बरें.'

तिथ्या कडेकडेनें रोज रोज जो कचरा सांचतो — माशांचे खवले, चुलींतली राख, फळभाज्यांचीं सालपटें, मेलेले अुंदीर — या सगळ्यांनाच ती सत्यसृष्टि मानते. तिला चुकूनहि कधीं वाटत नाहीं की, 'हें सगळं कां नि कशासाठीं?'

पुढें शरद ऋतूंतलें तिरपें अून घरांच्या वरच्या मजल्यांवरील व्हरांड्यांत शिरतें आणि मंदिरांतला पुजेचा चौघडा भैरवीचे सूर आळवूं लागतो, तेव्हां क्षणभर गल्लीला वाटूं लागतें कीं, 'या चिरेबंदी मर्यादे-बाहेर भव्य असें कांहींतरी असावें खरें.'

अिकडे दिवस सारखा वाढतच जातो. कामाच्या धांदलीत अस-लेल्या गृहिणीच्या पदराप्रमाणें आसपासच्या घरांच्या खांद्यावरील अून खालीं रस्त्यावर सरून पडतें. घड्याळांत नअू वाजतात. मोलकरीण कडेवर बाजाराची टोपली घेअून येते. स्वयंपाकाच्या गंधानें आणि धुरानें गल्ली भरून निघते. ज्यांना ऑफिसला जावयाचें असतें, ते घाअी करूं लागतात.

तेव्हां गल्लीचें विचारचक्र पुनः चालूं लागतें. ती म्हणते, 'या चिरेबंदी मर्यादेमध्येंच काय तें सगळें सत्य आहे. आणि ज्याला आपण भव्य असें कांहींतरी मानलें होतें तें अेक भव्य असें स्वप्नच मात्र होतें.'

## निरूपण — गली

संकुचित जीवनाची कल्पना देण्यासाठीं जुने लोक अुंबरांतील किडयांची अुपमा देत असत. अंजिराचें दुर्बळ अनुकरण करणारीं अुंबराचीं फळें अुघडून पहा. बहुतकरून त्यांत बारीक बारीक किडे सांपडावयाचेच. या फळांत हे किडे कोठून आले याचें आपल्याला आश्चर्य वाटतें. त्या किडयांनाहि आश्चर्य वाटत असलें पाहिजे कीं, 'अेवढी विशाल सृष्टि अेकाअेकीं आली कुठून? आपण मानत होतों कीं सगळी सृष्टि आपल्या या अुंबराच्या आंतल्या घुमटाअेवढीच आहे. पण बाहेरची सृष्टि आपल्या अुंबराकाशापेक्षां अनंतपट मोठी आहे.' अेवढी मोठी सृष्टि पहातांच अुंबरांतील किडे छाती फुटून मरून जात असले पाहिजेत. किंवा आपण ज्याप्रमाणें आकाशांतील ज्योतींचें गोंधळलेल्या डोळयांनीं निरीक्षण करून खऱ्या खोटया कल्पना बांधतों त्याप्रमाणे हे किडेहि या विशाल जगाची कांहीं कल्पना करीत असतील. या किडयांना काय वाटत असलें पाहिजे याची कल्पना करणें मोठें मौजेचें होअील.

प्राचीन काळचे लोक अशा कल्पना खऱ्या मानीत. आजचे कवि अशा कल्पना करतात, पण त्यांना खऱ्या न मानतां मजेदार कल्पना म्हणून साहित्याच्या हवेंत फेंकून देतात. ज्यांना कल्पना खऱ्या वाटतात त्यांना आपण भोळे किंवा वेडे म्हणतों. ज्यांना या कल्पना सुचतात पण जे त्यांना कल्पना म्हणून ओळखतात त्यांना आपण प्रतिभावान कवि म्हणतों. कवीला स्वतःचें मन असतें आणि तो दुसऱ्याच्या मनांत देखील शिरूं शकतो. पर-काया-प्रवेश विद्या खरोखर होती असें म्हणवत नाहीं. पण पर-चित्त-प्रवेश विद्या तर प्रत्येक कवीमध्यें दिसून येते. आणि ही विद्या किंवा कला ज्या मानानें अधिक त्या मानानें तो कवि समर्थ किंवा प्रतिभावान् मानला जातो.

पण कवि याच्याहि पुढें अेक पाअूल जाअून ज्यांना मन नाहीं त्यांचेवर मनाचें आरोपण करतात आणि त्यांची परिस्थिति पाहतां त्यांना कशा प्रकारचें मन असलें पाहिजे हें नेमकें ठरवून टाकतात. आणि त्या मनाचा व्यापार आपल्या कल्पनाशक्तीनें शोधून काढून

त्याचा विस्तार शब्दबद्ध करतात. अशा रीतीनें भावारोपण करणें ह्या कवींचा अेक आवडता खेळ आहे. ही शक्ति वाढण्यासाठीं कवीं-मधें भेदक प्रौढपण आणि कल्पक पोरपण दोन्ही अेकाचवेळीं असावीं लागतात. बालोचित कल्पनांची भरारी आणि तत्त्वज्ञाचा पोंच दोन्हींचा जेव्हां अेकमेकांशीं खेळ चालतो तेव्हां कवि चमत्कृतिजनक नवीन नवीन प्रौढ खेळणीं तयार करून आपल्याला देतो. 'गली' हें शब्दचित्र अशाच प्रकारचें अेक प्रौढ खेळणें आहे. जी गल्ली आपल्याला सामान्य-पणें कंटाळवाणी आणि अप्रसन्न वाटते, मनुष्यवस्तीचा जिला आपण शाप मानतों, तिच्यावर देखील भावारोपण करून कवींनें तिला व्यक्तित्व दिलें आहे. आणि तिचीहि अेक छोटीशी पिंडसृष्टि असते असें आपल्या मनावर ठसविलें आहे.

येथील वर्णन यथादृष्ट आणि चमत्कृतिजनक तर आहेच; पण त्याखेरीज गल्लीचें मानस कसें असतें, आपल्या संकुचित वक्र अनुभवा-वरून अज्ञातसृष्टीविषयीं ती कशा वेड्यावांकड्या कल्पना बांधते हेंहि थोडक्यांत दाखवून, अल्पज्ञ मनुष्याचें तत्त्वज्ञान कसें संकुचित असतें आणि विचित्र अनुमानें काढून देतें हेंहि जातां जातां येथें सूचित केलें आहे.

आजारी मनुष्याला घराच्या बाहेर जेव्हां हिंडतां येत नाहीं तेव्हां तो पडल्या पडल्या तऱ्हेतऱ्हेच्या कल्पना करतो. शरीर अडकून पडलें अेवढ्यामुळेंच कल्पनाशक्तीला मनसोक्त भटकावेंसें वाटतें. त्याचप्रमाणें गल्लीला देखील दोन घरांच्या अरुंद जागेंत अडचणीनें रहावें लागत असल्यामुळें तिलाहि आकाशासंबंधानें, पावसासंबंधानें आणि अुन्हासंबंधानें कल्पना कराव्याशा वाटतात. मंदिरांतील चौघडा, सनअी अैकूं येतात पण मंदिर पहावयास मिळत नाहीं. अून, जरासें दर्शन देअून पळून जातें. पण डोळे दिपवणारा हा सूर्य येतो कुठून आणि जातो कुठें आणि येतोच कशासाठीं याचीहि तिला कल्पना नसते. आणि आकाशांतील मेघ जे आपल्याला अितके काव्यमय वाटतात ते दुष्टतेनें भरलेली अेक ब्याद किंवा पीडाच आहेत असें ती ठरवते.

आणि आपण, जे गल्लीहि पाहतों आणि गल्लीबाहेरील जगहि पाहतों व जाणतों त्यांना गल्लीचें मानस अैकून गंमत वाटते.

# अेक ओझरता कटाक्ष

आगगाडींत चढतांना तिनें आपली मान हळूंच वळवून मजकडे पाहिलें आणि निरोपाचा अेक ओझरता शेवटचा कटाक्ष मला सोंपवला.

या अफाट विश्वांत त्या अिवल्याशाला मी जपून ठेवूं तरी कुठें ?

पल-विपल-मुहूर्त यांची पावलें प्रत्यहीं जेथें पडणार नाहींत अशी चिमुकली जागा मला मिळावी तरी कुठें ?

मेघांवरील सगळी स्वर्णिमा ज्या संध्येंत विलीन होते त्याच संध्येंत हा कटाक्षहि विलीन होअून जाअील का ? ज्या वृष्टीनें नाग-केशराचे सगळे सोनेरी रेणु धुअून जातात त्याच वृष्टीनें हाहि धुअून जाअील का ?

विश्वांतील हजारो वस्तूंप्रमाणेंच हजारो गोष्टींच्या रगड्यांत हजारो वेदनांच्या स्तूपांतलाच अेक बनून तो राहील तरी कसा ?

तिचें तें ओझरतें दान, जें जगांतील अितर सर्वांना वगळून माझ्याच वाट्याला आलें त्याला मी गाण्यांत गुंफून, छंदांत बांधून ठेवीन. सौंदर्याच्या अमरावतीमध्यें मी त्याची स्थापना करीन.

पृथ्वीवरील राजराजेश्वरांचे प्रताप आणि श्रीमंतांचें अैश्वर्य शेवटीं नष्ट होण्यासाठींच असतें. पण डोळ्यांतील अश्रुजलीं का तें अमृत नाहीं कीं जें त्या ओझरत्या क्षणिक कटाक्षाला चिरकालपर्यन्त जिवन्त ठेअूं शकेल ?

गायनाचे सूर म्हणाले, 'ठीक आहे. त्याला आमच्या स्वाधीन करा. आम्ही राजराजेश्वरांच्या प्रतापाला कस्पटासमान लेखतों. श्रीमं-तांच्या अैश्वर्याचीहि आम्हांला पर्वा नसते. पण त्या तसल्या चिमुकल्या वस्तूच आमचा कायमचा ठेवा होय आणि तसल्या वस्तूंनींच आम्ही असीमाच्या गळ्यांतला हार गुंफत असतों.'

## निरूपण -- अेकटि चाअुनि

ती कोण होती? तिच्या त्या अंतिम नजरेमध्यें अशी कोणती जादू होती जी जीवनाचें सर्व रहस्य अुद्दीपित करूं शकेल? आणि राजांचे प्रताप आणि श्रीमंतांचें अैश्वर्य यांना फिके पाडील? तिच्या नजरेमध्यें असें कोणतें सौन्दर्य होतें कीं जें संध्येच्या सुवर्णाहूनहि अधिक आल्हादक वाटावें? त्या नजरेमध्यें असा कोणता सुगंध भरला होता कीं ती नागकेशराच्या परागाहून अधिक अुन्मादक वाटावी? विश्वरहस्य अुकलणाऱ्या ऋषींची जीवनदृष्टि या प्रेमिक प्रश्नाचें अुत्तर देअू शकेल काय?

लहानशा पारिजातकासारखें हें नाजुक शब्दचित्र कवीनें केवळ कल्पनेनें लिहिलें आहे कां अेखाद्या कषायमधुर स्मृतीलाच त्यांनीं येथें शब्दबद्ध केलें आहे, हें कोण सांगूं शकेल? सतरा वर्षांच्या दांपत्य-जीवनानंतर त्यांच्या पत्नीनें स्वर्गवास गांठला. त्या गोष्टीला सतरा वर्षे झाल्यानंतर कवीला आपल्या दांपत्य जीवनाचें सिंहावलोकन करावेंसें वाटलें. त्याच काळची ही 'लिपिका' आहे. पत्नीच्या विरहाची तीव्र वेदना कवीनें ज्या काव्यांत व्यक्त केली तीं त्यांनीं 'स्मरण' नांवाच्या संग्रहांत प्रकाशित केलीं आहेत. त्यानंतर सतरा वर्षांच्या प्रेमपरिपाकाचें फळ या 'लिपिकें'त कोठें कोठें सांपडतें. तेव्हां विदाय समयींच्या प्रेमोत्कट दृष्टीचें हें स्मरण पत्नीविषयींच असावें असें वाटतें. पण हें अितकें कांहीं सात्विक आणि अपार्थिव आहे कीं हें स्मरण त्यांच्या अेखाद्या भावजयीविषयीं, बहिणीविषयीं, मेहुणीविषयीं अथवा पुतणीविषयींहि असूं शकेल. कसेंहि असो, प्रेमी हृदयाला प्रेमाच्या अेका नजरेचें देखील केवढें मूल्य असतें ते यांत आपणाला पहावयास मिळतें.

लांबच्या किंवा पुष्कळ दिवसांच्या प्रवासाला जातांना निरोप घेणाऱ्या आणि निरोप देणाऱ्या सर्वांचेंच हृदय भरून येत असतें. बोलायचें बोलून घेतलें, सांगायचें पुनः पुनः सांगितलें, प्रेम परोपरीनें व्यक्त केलें, जाण्याचा क्षण जितका दूर सारतां येअील तितका सारला. पण शेवटीं तो क्षण आलाच. अशा वेळीं प्रेमळ लोक प्रेमी जनांकडे

पाहतात, डोळाभर पाहतात. त्या ओल्या नजरेमधें अर्धवट तयार झालेलीं आंसवें लुकलुकतात आणि त्याबरोबर प्रेमाला जें कांहीं म्हणावयाचें असतें, जें कांहीं विचारावयाचें असतें आणि विशेषत: जें कांहीं द्यावयाचें असतें तें सर्व अेकवटतें.

अेखाद्या खाणीमधें हजारो फूट अुतरून, मैलचे मैल आंत खोदकाम करून खंडोगणती धोंडेमाती बाहेर काढतात. ते धोंडे बारीक कुटून त्यांतील सोन्याचे कण गोळा करतात आणि ते सर्व आटवून त्यांतून सोन्याची अेक वीट तयार करतात. पृथ्वीच्या पोटांतून काढलेल्या धोंड्यांच्या चूर्णाच्या प्रचंड टेकड्या समोर दिसतात आणि त्यांतून काढलेली लाख दीड लाखाची सोन्याची वीट आपण हातीं घेअून अुभे असतों. त्यावेळीं हाच विचार मनांत येतो कीं या अेवढ्या मोठ्या भुकटीच्या पहाडाचें सार या लहानशा विटेमधें आहे. निरोप घ्यायच्या वेळीं नजरानजरेची जी देवघेव होते ती देखील अशीच जीवनाच्या सुवर्णासारखी असते. हजारो आणि लाखो फुलांतून गुलाब-जळ तयार करतात. त्यांतून अत्तर काढतात. त्यांत जसा सुगंध कोंबून कोंबून भरलेला असतो त्याचप्रमाणें प्रेमाचें माधुर्य आणि प्रेमाचा सुगंध यांचा अर्कच जणूं त्या शेवटच्या दृष्टादृष्टींत असतो. त्या कटाक्षामधें अमरतेचीं सर्व तत्त्वें असतात. त्याचाच महिमा कवीनें येथें अगदीं नव्या पद्धतीनें मांडला आहे. धनसंपत्तीच्या मुळाशीं लोभाचा चीक असतो. राजाच्या पराक्रम आणि अैश्वर्याच्या मुळाशीं प्रभुत्वाचा अुग्र दर्प असतो. प्रेमाच्या नजरेमधें असलें कांहीं नसतें. तेथें फक्त प्रेमाची आणि प्रेमस्मृतीची कल्याणकारिताच असते. खरोखर तिलाच कवितेचा आणि गायनाचा विषय होण्याचा हक्क आहे.

कविता आणि गायन म्हणजे अिहलोकींचा गंधर्वलोक आणि स्वर्गलोक. तेथें फक्त प्रेमस्मृतीलाच प्रवेश असला पाहिजे. सूर्याचे संध्याकाळचे रंग क्षणजीवी असोत, पुष्पपरागांचा दरवळणारा सुगंधहि अल्पजीवी असो. पण प्रेम-स्मृतीचें आयुष्य अितकें क्षणभंगुर होण्यासाठीं नसतें. म्हणूनच काव्य आणि संगीत आपुलकीनें त्याला जवळ करतात आणि गाअून गाअून त्याला अमर करतात.

# अेक दुपार

चांगली आठवते ती दुपार. अधून मधून पावसाची सर थकल्यागत ओसरायची. मधेंच पुनः वाऱ्याचा अेखादा झोत येअून तिला चेव आणायचा.

आंत अंधार होता. कामांत मन लागत नव्हतें. मीं आपलें वाद्य अुचललें नि वर्षणाच्या तालाबरोबर मल्हाराचे सूर छेडूं लागलों.

शेजारच्याच खोलीतून ती अेकदां आपल्या दारापर्यन्त आली आणि पुनः परत गेली. पुनः अेकदां आली आणि दाराबाहेरच अुभी राहिली. त्यानंतर हळूं हळूं आंत येअून बसली. तिच्या हातांत कसलेंतरी विणकाम होतें. मान खालीं घालून तिचें आपलें विणणें चालूंच होतें. कांहीं वेळानें विणकाम बन्द करून खिडकींतून दिसणाऱ्या अस्पष्ट झाडाझुडपांकडे ती पहात राहिली.

पावसानें झोड अुठवली. माझें गायन थांबलें. ती अुठली आणि वेणीफणी करायला निघून गेली.

अेवढेंच. या खेरीज आणखी कांहीं नाहीं. वृष्टीनें, संगीतानें, रिकामपणानें, अंधारानें भरून गेलेली ती दुपार. अेक केवळ दुपार.

अितिहासांत राजेमहाराजांच्या गोष्टी, लढाया, युद्धांचीं वर्णनें अगदी सवंग झाल्यासारखीं भरमसाट विखुरलेलीं असतात. परंतु अेका दुपारचा अेक छोटेखानी प्रसंग मात्र कालाच्या करंडकांत दुर्लभ रत्नाप्रमाणें दडलेलाच राहिला. फक्त दोन व्यक्तींनाच काय ती त्याची जाणीव असणार.

## निरूपण -- अेकटि दिन

परस्पर प्रेम आणि विश्वास, अत्युत्कट सहजीवन, सर्व प्रकारची मोकळीक; यामुळें प्रेममय जीवनांत तृप्ति आणि शांति आलेली; पण परस्पर आकर्षण आणि अुत्कटता यत्किंचितहि कमी झालेली नाहीं. आकाश भरून आलें, काम सुचत नसलें म्हणजे हृदयहि भरून येतें. पण तृप्त सहजीवनांत व्याकुळतेला अवकाश नसतो. गानाचे सूर कानीं पडतांच तिला वाटलें जवळ जाअून बसावें. अितक्यांत तिला शंका आली कीं कदाचित त्याच्या गाण्याच्या अेकतानतेमधें विघ्न येअील. कशाला विघ्न करा. आहोंत तेथूनच गाणें अैकण्यांत काय कमी आनंद आहे असें वाटून ती परत गेली. पुनः मनांत विचार आला -- मी थोडीच परकी आहें कीं मी खोलींत आल्याबरोबर माझेकडे लक्ष दिलें पाहिजे, आणि हातांतील सतार बाजूस सारली पाहिजे किंवा गाणें बंद केलें पाहिजे! आम्ही अुभयतां अेकमेकांना वातावरणासारखीं आहोंत. खोलींत आल्यानें किंवा गेल्यानें कसलाच फरक पडण्याचें कारण नाही. रिकामी येअून बसलें तर कदाचित् ध्यान जाअील. पण हातांत अेखादें कसलेंहि काम असलें तर मग मुळींच ध्यान द्यावयास नको. तुम्ही तुमचे गाणें गा, मी माझें शिवण शिवीन. तुमच्या खोलींत येअून बसलें म्हणून काय बिघडलें?

येथें गायन चालूंच होतें. आकाश घेरलेले होतें. खोलींतील प्रकाशहि मंदावला होता. मेघमल्हाराचे सूर हृदयांत कोंदाटत होते. त्यांतच प्रियजनांचा विश्वस्त सहवास! गायनांत कोण जाणें कुठून अेक नवेंच माधुर्य येअून शिरलें. कोहाळयाच्या पाकांत जणूं गुलाबाचा सुगंध. आलापामधें कोमल आणि प्रेमळ भावांची भरती आली. त्या भरतीनें अेकाच नाहीं पण दोन हृदयांमध्यें गोडशी बेचैनी अुत्पन्न केली. हातांतल्या कामांत लक्ष लागेना. कांहींतरी फेरफार केलाच पाहिजे. पाअूस खूप पडत आहे. कशा सरींवर सरी येत आहेत. झाडें प्रथम धुवून निघालीं, आतां तीं झोडपलीं जात आहेत.

त्यांना जरा डोळे भरून पाहून घ्यावे. मन शान्त होईल. थंड वारा, पावसाचे सीकर बिन्दु आणि हिरवीगार पानें मनाला शांति देतीलच

सुख वाटलें. शांति मिळाली किंवा नाही कोण जाणे! पण पाऊस जोराने सुरू झाला. गाणाऱ्याला स्वतःच्या संगीतापेक्षां खिडकीच्या चौकटींत मढविलेलें, बगीच्याचा पृष्ठभाग असलेलें, मनोहर आकृतीचें तें छायाचित्रच अधिक आकर्षक वाटलें. हृदय अस्वस्थ झालें. गाणेंच चालेना. तंत्री वाजेना.

तिला वाटलें आपण हें काय केलें! जेथें हृदयाचें अैक्य आहे तेथें अेकमेकांच्या मनांत काय चाललें आहे हें समजणें थोडेंच कठीण असतें! ती भानावर आली. तिला आठवण झाली कीं आंघोळी-नंतर मोकळे सोडलेले केस आतापर्यंत वाळले आहेत. आतां मोकळ्या केसांनीं खिडकींत अुभे राहिल्यास तुषारांनीं ते पुनः दमट होतील. आंबाडा घालण्यासाठीं म्हणून ती सहज निघून गेली.

याचें नांव विश्रब्ध प्रेम आणि सहवास.

बहुतेक सर्व नाटकांत आणि कादंबऱ्यांत विवाह होण्यापूर्वीच्या अतृप्त प्रेमाचें वर्णन असतें. भवभूतीच्या अुत्तररामचरित्रांत विवाहोत्तर प्रेम किती शांतगंभीर असू शकते आणि प्रसंगवशात् कसें अुत्कट होतें हें दाखविलें आहे. प्रकृतिवर्णनांत ललित आणि भव्य असे प्रसंग रेखाटणें सोपें आहे. प्रचंड तुफान, भीषण वावटळी, भयानक प्रपात, कडाडणाऱ्या विजा अित्यादिकांचें वर्णन वाचून अंगावर शहारे येतात. पण सहज फिरावयास गेलें असतां अेखाद्या ओढ्याच्या कांठीं, अेखादा सुंदर कोपरा अगदी साधा असून देखील केव्हां केव्हां जिवाला चुट-पुट लावून सोडतो. अशा स्थानाचें वर्णन अगदीं साधेंच होणार. पण त्यांतून काव्यरस कांही थोडाथोडका मिळत नसतो. कांहीं कांहीं स्थानें तर चित्तामधें अशीं कांहीं कोरलीं जातात कीं त्यांचें स्मरण होणें हाहि अेक असाधारण आनंदाचा विषय होतो.

अभ्यासांत अेखाद्या विषयांत कांहीं बाबी अत्यंत महत्त्वाच्या असून देखील त्याविषयीं प्रश्न विचारणें सोपें नसतें. परीक्षेच्या दृष्टीनें ती बाब

महत्त्वाची नसली तरी त्या विषयाच्या आणि अुपयोगितेच्या दृष्टीनें तिचें मूल्य थोडेंथोडकें नसतें. प्रश्नाच्या चौकटींत ती बसूं शकत नाहीं अेवढीच काय ती अुणीव. अितिहासामधें युद्धें, झगडे, निरनिराळ्या पक्षांच्या आणि राष्ट्रांच्या कारवाया यांची रेलचेल असते, त्यांतील गुंतागुंतीचें वर्णन करणेंहि सोपें असतें, आणि आपण वाचकांना कांही असाधारण कळविलें, समजावलें असा संतोषहि वाटूं शकतो. पण जीवनांत ज्या गोष्टींना खरेंखुरें महत्त्व असतें, युद्धें आणि कारवाया संपल्यानंतर जें अुपभोगावयाचें असतें तें जीवनांत जवळ जवळ स्वर्गीय आनंद देणारें असलें, दयित रसानें थबथबलेलें असलें तरी शब्दांत त्याचें महत्त्व वाढवून मांगतां येत नाहीं.

लग्नापूर्वींचा अनुनय आणि लग्नानंतरचा पहिला मधुमास यांचा अनुभव कितीहि अुन्मादक असला तरी तो जन्मभर पुरणारा नसतो. पतिपत्नींना अेकमेकांच्या सहवासांत जो सात्विक आनंद अखंड मिळत असतो आणि ज्याला जीवनांतील अमृत म्हणून संबोधतां येअील त्याचें वर्णन कितीसे करतां येणार? त्यांत असाधारण, अद्भुत, लोक-विलक्षण किंवा अंगावर शहारे आणून सोडणारें असें कांहींच नसतें. अेखादी आअी आपल्या अर्भकाला मांडीवर घेअून खेळवते आणि तें अर्भक नव-विकसमान जीवनाचा आनंद घेतें, याचें वर्णन अिकडून तिकडून प्रयत्न करून कवि थोडेसें सजवील खरा. पण त्या बाळाला होणारा आनंद आणि त्या आनंदानें मातेच्या हृदयांत अुसळणाऱ्या—अुसळणाऱ्या नव्हे पण अगदी सहजपणें हेलावणाऱ्या अूर्मि यांचा आनंद फुलविणें फारसे सोपें नाही. आणि, चमचमीत आणि भगभगीत आहार खाण्याची संवय ज्यांना लागली आहे, त्यांना ज्याप्रमाणें साध्या वन्य फळांत किंवा ताज्या भाजीत जो पौष्टिक रस मिळूं शकतो त्याचा जसा आनंद घेतां येत नाहीं, त्याचप्रमाणें या साध्या पण समृद्ध, सात्विक पण अुत्कट नित्यानंदाचें वर्णन वाचूनहि कित्येक वाचकांच्या हृदयाची तार छेडली जात नाही.

तसाच कोणी समर्थ आणि लब्धप्रतिष्ठित कवि आपल्या सिद्ध-हस्त शैलीनें अशा साध्या प्रसंगाचें साधेंच वर्णन करून वाचकांपुढें मांडतो, तेव्हां मात्र या साधेपणांत त्याच्या अनपेक्षित साधेपणाचीच

चमत्कृति अुत्पन्न होते आणि मग खरोखरच हा प्रसंग किती दयित-कोमल आहे, किती रसप्रद आहे असें म्हणून मनुष्य आपलें रसग्राही हृदयपद्म अुघडतो, आणि जीवनांत पहिल्याच प्रथम अगदीं साधारण प्रसंगांतून सर्वसाधारण, पण दिव्य सुख अनुभवण्याची योग्यता प्राप्त करतो. अशा सुखांत जीवनमूल्य भरपूर भरलेलें असलें तरी त्याला वर्णनमूल्य नसतें. पण हा कांहीं त्याचा दोष नव्हे. हिन्दीत म्हण आहे 'आम खानें या पेड गिनने' ती येथें बरोबर लागू पडते.

विलासरसिक प्रौढ दुष्यन्ताच्या अेका प्रेम प्रसंगाचें वर्णन कालिदासानें केलें आहे. तेथें त्यानें अेखादी विलास-चतुर, कला-निपुण प्रौढा आणून ठेवली नाहीं. तर आश्रमांतील नित्यकर्मे करणाऱ्या, वल्कलें नेसणाऱ्या अबोध ऋषि-कन्यकेलाच आणून बसवली आहे आणि नागर-विलासांत प्रवीण असलेल्या दुष्यन्ताच्या तोंडून वदवलें आहे :— दूरीकृताः खलु गुणैः अुद्यानलता वनलताभिः। खरोखर हर तऱ्हेची जोपासना करून काळजीनें वाढविलेल्या मनोहर अुद्यानलतेला या रानटी लतेनें मागें टाकलें आहे. पुढें जेव्हां शकुंतला आपल्या रत्नासारख्या अर्भकाला घेअून पतिगृहीं जाते आणि तेथें दुष्यन्त तिला न ओळखण्याचा बहाणा करतो— अथवा नाटकाच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे ऋषिशापामुळें त्याला कांही केल्या शकुंतलेचें स्मरण होत नाही — तेव्हां त्याला आठवण देण्यासाठीं शकुंतला आपल्या भोळ्या हृदयांतच सांठवून ठेवलेल्या प्रेमानुभूतीपैकीं अेक प्रसंग — तिच्या दृष्टीनें हृदयाला कायमची चटक लावणारा प्रसंग — ती अगदी साधेपणानें दुष्यन्ताला सांगते.

— आपण अेकदां अेका लतामंडपांत बसलों होतों. तेथें अेक हरिणशावक जवळ आलें. तें तहानेलें आहे हें ओळखून तूं अेक कमळाचें पान तोडलेंस आणि त्याच्या द्रोणांत पाणी भरून तो हरिणबालकापुढें धरलास. तहानलें असूनसुद्धा तें हरिणशावक तुजजवळ येअीना. तेव्हां तुझ्या हातून तो द्रोण मी घेअून त्याचेपुढें केला. तेव्हां तें चटकन पुढें आलें आणि पाणी पिअूं लागलें. तेव्हां तूं हसून म्हणालास — "अुभावपि बर्बरौ" — दोघेहि जंगली. म्हणूनच यांची दोस्ती जमते. हें सर्व तूं

विसरलास काय? — भोळी शकुंतला! तिला — तिच्या शुद्ध सात्विक हृदयाला — हा प्रसंग प्रेमरसाच्या सरोवरासारखा वाटला होता. समर्थ कवि कालिदासानें असल्या भोळ्या प्रसंगाचें महत्त्व ओळखूनच तो येथें अशा आणीबाणीच्या वेळीं पुरावा म्हणून वापरला आहे. आणि शकुंतलेची असाधारण सूक्ष्मवेदिता त्यानें येथें व्यक्त केली आहे. पण राजाला त्याचें काय? त्याला जाणून बुजूनच गंभीरवेदी (Thick-skinned) व्हावयाचें होतें. अशा अुत्कट रहस्य प्रसंगाची आठवण देअून देखील जेव्हां राजा जागा होअीना तेव्हां शकुंतलेच्या हृदयाला मोठाच धक्का बसला.

आतां काय करावें असें तर तिला झालें असेलच, पण याला ओळखण्यांत आपण चूक केली, याची रसिकता खरी रसिकता नसून केवळ शिकून आणलेलें नैपुण्यच तर नव्हतें ना अशीहि शंका मनांत आली असल्यास नवल नाहीं.

तिला तर आकाश कोसळल्यासारखें वाटलें आणि तशा स्थितींत त्या भोळ्या विश्रब्ध प्रेम-प्रसंगाचें दिव्य प्रतीक असें आपलें लहान मूल पाहून तिच्या हृदयाची कशी कालवाकालव झाली असेल ती तर अेखादें स्त्री-हृदयच ओळखूं शकेल.

शाकुंतलामध्यें कालिदासानें शकुंतलेच्या तोंडीं राजाला आठवण देण्यासाठीं असा साधा प्रसंग घालून साधारण प्रसंगांतील असाधारण आनंद आणि प्रेमरस व्यक्त केला आहे हेहि त्या प्रेम-कवीचे जीवनावर अुपकारच आहेत.

पावसाळी हवेनें कवीच्या हृदयाची तार हलवली. हृदयानें हातांना अस्वस्थ करून दिलरुब्याची तार छेडली. त्या वाद्यानें जीवनसंगिनीच्या हृदयाची तार छेडली आणि तिला अनेक रीतीनें नाचविलें. तिच्या हृदयांतील भावोर्मींनीं कवीचें हृदय सुखलुलित केलें. दोघांनाहि नीरव संभाषणाचें सुख लाधलें आणि त्यांतून हृदयाच्या अैक्याची तृप्ति मिळून दोघेंहि शान्त झालीं. वीणाहि निस्तब्ध झाली. फक्त बाहेरच्या पावसानें आपला घन-मधुर ताल चालूं ठेवला.

# कृतघ्न शोक

पहांटे पहांटे तिनें निरोप घेतला.

माझें मन मला सांत्वना देत म्हणालें, 'अरे, ही सगळी माया आहे रे!'

मी रागानें उसळून म्हणालों, 'टेबलावर तिचा तो शिवणकामाचा डबा, गच्चीवरची फुलझाडाची ती कुंडी, पलंगावर पडलेला, तिचें नांव असलेला तो पंखा -- हें सगळंच तर सत्य आहे!'

मन म्हणालें, 'तरीपण विचार करणें --'

मी म्हणालों, 'थांब रे बाबा. बघ ना तें गोष्टींचें पुस्तक नि त्यांत मधेंच ठेवलेला वेणींतला आंकडा. पुस्तक पुरें वाचूनहि झालेलें नाहीं. ही सगळीच जर माया, तर ती या सर्वांहूनहि अधिक मोठी माया झाली तरी कशी?'

मन गप बसलें. जिवलग मित्र येऊन म्हणाला, 'चांगलें तें सत्य; तें कुठेंच जात नसतें. सगळें जग त्याला रत्नासारखें हृदयांतील हारांत गुंफून ठेवतें.'

मी त्यावर चिडून म्हणालों, 'तुला रे हें कसें कळलें? देह का चांगला नव्हें. मग तो गेला तरी कुठें?'

लहान मुलें रागानें जशीं आईलाच मारतात, तसेंच जगांत जें जें म्हणून कांहीं मला आधारासारखें होतें, त्या सर्वांनाच मी मारूं लागलों. म्हणालों, 'जग आहेच विश्वासघातकी.'

अेकाअेकीं मी चमकलों. वाटलें कीं कुणीसें बोललें -- 'अकृतज्ञ!'

खिडकीच्या बाहेर पाहिलें तो सुरूच्या झाडाआड तृतीयेचा चंद्र अुगवला आहे. जी मला सोडून गेली होती तिच्याच हास्याचा जणूं हा लपंडाव. त्या तारे शिंपडलेल्या अंधःकारांतून अेक भर्त्सना आली, 'मी आले होतें -- तुमच्या जीवनांत गुंफले गेले होतें तेवढेंच का मिथ्या. नी आतां ही जी वेगळीक आली आहे तीवर अेवढा दृढ भरंवसा ना?'

## निरूपण -- कृतघ्न शोक

प्रेमाचा आश्रय अेकाअेकीं नष्ट झाला म्हणजे मनुष्य अस्वस्थ होतो -- तो आपल्यांत राहिलेला नसतो. प्रत्येक गोष्टीकडे पहाण्याची त्याची दृष्टीच विकृत होते. जी गोष्ट जगांत व्हावयाचीच ती तशी घडलीच कां, अशी त्याची सर्व जगाविरुद्ध तक्रार असते. सर्व जगच आपल्या वाअिटावर आहे, आपल्या विरुद्ध झालें आहे असें त्याला वाटूं लागतें. दिवंगत व्यक्तीच्या विरहानें वेडावून जाअून मागें असलेल्या जिवंत लोकांना अन्याय करावयालाहि त्याचें मन तयार होतें.

पण हृदयांत अेकच मन नसतें. वैतागलेलें मन अेका दिशेनें विचार करतें, तर शान्त समजूतदार मन त्या गोष्टीचा प्रतिवाद करतें. पण कोणताहि विचार मनांत स्थिर होअूं शकत नाहीं.

हृदयाला आघात झाला असतां तीव्र शोक होणें स्वाभाविक आहे. पण त्या शोकानें स्वतःची दृष्टि कलुषित करून घेअून कृतघ्न-पणानें जगाशी वांकडें काय म्हणून बाळगावें?

जिच्यामुळें ही अशी अवस्था झाली तिनेंच जर कांही विचाराची गोष्ट सुचविली तर ती डोक्यांत शिरणार. बाकी जग तर विश्वासघातकी आहे हें त्यानें ठरवूनच टाकलें आहे.

शेवटीं तिच्याकडूनच समजूतदारपणाचें खाद्य मिळतें. जर जीवन मिथ्या असें ठरत असेल तर मृत्यूलाच सत्य समजून अितकें वेडे काय म्हणून व्हावें! आणि जगाशीं रुसून बसावें! मृत्युहि मायाच आहे आणि आपली प्रिया कुठें गेलीच नाहीं असें मानणें कां जड जावें!

मायावाद खरोखरच आध्यात्मिक सत्य आहे? जीवनाचें रहस्य आहे? कां हात टेकलेल्या बुद्धीचा हताश निश्वास आहे?

तत्त्वज्ञान म्हणजे जीवनाचें रहस्य. जीवन जितकें गूढ आहे तितकेंच तेंहि गूढ असणार. या रहस्याला सोपें करण्याचा मोह तत्त्वज्ञान्याला पुष्कळदां अनावर होतो आणि म्हणून तत्त्वज्ञान अेकांगी बनतें.

तत्त्वज्ञान्याला जगाच्या अस्तित्वाविषयीं तटस्थपणें, तिऱ्हाइता-सारखा विचार करावयाचा नसतो. या जगांत आपणहि आहोंत, आपला याचा संबंध आहे. हें जग आपलें जसें युद्धक्षत्र आहे, कर्मक्षेत्र आहे तसेंच तें प्रेमक्षेत्रहि आहे ही गोष्ट तत्त्वज्ञान्यानें विसरून जातां कामा नये. जग नश्वर असेल—तसा अनुभव नित्य येतोच—म्हणून काय प्रेमालाहि नश्वर समजायचें? अेका अनुभूतीनें दुसरी अनुभूति कलुषित काय म्हणून करावी? तत्त्वज्ञान डोळे अुघडून पाहूं लागलें म्हणजे म्हणतें सर्व कांहीं मिथ्या आहे. येथें कांहीच खरें नाहीं. व्यवहार त्याला म्हणतो, तू चुकत आहेस. या जगांत कांही गोष्टी सत्य आहेत, कांहीं गोष्टी मिथ्या आहेत. तत्वज्ञान पुनः विचार करूं लागतें. आतां नुसतें डोळे न अुघडतां हृदयहि अुघडून पहातें आणि आतां म्हणूं लागतें —चुकले चुकलें, सर्व कांहीं खरें आहे, सर्वच सत्य आहे. मिथ्याला कोठें अवकाशच नाहीं.

तत्त्वज्ञानाचे हे परस्पर विरोधी सनातन अुद्गार आहेत. जगांतील सर्व तत्त्वज्ञान या दोन अंतिम बिंदूंच्यामधें हेलकावे खात असतें.

कवीनें आपल्याला विशेष सांगितलें तें हें कीं अंतिम तत्त्व काय? हें जर समजून घ्यावयाचें असेल तर तें प्रेमाला विचारा. प्रेम हें केवळ अंतिम तत्त्व नसून सर्व तत्त्वांची कसोटीहि आहे. प्रेमानें जें मान्य केलें तेंच सत्य अेवढें सूत्र जर स्वीकारलें तर सर्वत्र प्रकाशच प्रकाश होअील. जीवनाला प्रकाशमय करण्याची शक्ति फक्त प्रेमाचीच आहे. मनानें, बुद्धीनें आपला कारभार सुखानें चालवावा. पण दृष्टि मात्र घ्यावी प्रेमापासूनच.

# सतरा वर्षें

तिचा माझा सतरा वर्षांचा सहवास.

जेव्हां तेव्हां जाणें येणें, वारंवार पहाणें पुसणें, खूपखूप बोलणें चालणें.

त्याच्याच अंवती भंवती कितीतरी सुखस्वप्नें, कितीतरी अनुमानें, कितीतरी अिंगितें. या शिवाय पहांटेच्या झोंपमोडीनंतरचें शुक्राचें चांदणें, कधीं आषाढांतल्या अैन सायंकाळीं चमेलीच्या फुलांचा दरवळणारा सुगंध, तर कधीं वसंतांतल्या शेष प्रहरीच्या क्लान्त वाजंत्रींनें काढलेले पीलू बारोयांचे सुर — हीं सतरा वर्षे सतत अशाच प्रसंगांनीं तिच्या मनामध्यें सांठविलेलीं होतीं.

आणि या सर्वांच्या सोबत चालें तिचें माझ्या नांवानें हांक मारणें. त्या हांकेला जी व्यक्ति ओ देत असे तिची घडण केवळ अेकट्या विधात्याच्या हातची नव्हती; ती व्यक्ति तिच्याच सतरा वर्षांच्या परिचयांतून घडलेली होती. कधीं आदरानें तर कधीं अनादरानें; कधी कामांतून तर कधीं रिकामपणांतून; कधीं चारचौघांसमोर तर कधीं रहस्य अेकांतीं, अेकाच व्यक्तीच्या मनोमन परिचयांतून घडलेला तो मनुष्य होता.

त्यानंतर आणखी सतरा वर्षे वाहून गेली. परंतु या सतरा वर्षांतले सगळे दिवस आणि सगळ्या रात्री त्या सतरा वर्षांतल्या नामोच्चाराच्या प्रेम-सूत्रानें बांधल्या सारख्या तर वाटत नाहींत — कशा वेगळ्या वेगळ्या वाटतात.

म्हणून हे दिवस आणि या रात्री रोज मला विचारतात, 'आमची काय वाट ? आम्हांला प्रेमानें बोलावून जवळ घेअून आपलेसे कोण करील ?'

मी त्यांना कांहींच अुत्तर देअूं शकत नाहीं. चूप बसतों, आणि विचारांत पडतों. आणि तेहि वाऱ्याबरोबर अुडत जात म्हणतात, 'चाललों आम्ही शोधायला.'

'कुणाला ?'

कुणाला तें त्यांना ठाअूक नसतें. म्हणून ते कधीं अिकडे धांवतात तर कधीं तिकडे पळतात, संध्याकाळच्या बंधनहीन मेघांप्रमाणें अंधःकारांत सुळकांडी मारतात आणि पुनः मुळींच नजरेस पडत नाहींत.

## निरूपण –– सतेरो बछर

सांगितलेंच आहे कीं कवीला पत्नीसुख अेकंदर १७ वर्षें लाभलें. त्या प्रेमोत्कट अवधीच्या शेवटीं झालेलें वियोगदुःख त्यांनीं 'स्मरण' नांवाच्या काव्यसंग्रहांत ग्रथित करून ठेवलें आहे. त्यानंतर सतरा वर्षें गेलीं आणि 'लिपिका' नांवाचीं रेखाचित्रें किंवा साहित्यकुसुमें फुलवितेवेळीं कवीला पत्नीचें पुनः अुत्कटतेनें स्मरण झालें. सहवासाचीं तीं सतरा वर्षें आणि त्यानंतर विधुरावस्थेंत घालविलेलीं हीं सतरा वर्षें यांतील वैषम्य ध्यानांत येतांच मनांत जो विषाद भरला, तोच प्रस्तुत रेखाचित्रांत अत्यंत नाजुक हातानें व्यक्त केला आहे. स्मरणकाव्यांत दुःखाचा आवेग असणें स्वाभाविक आहे. पुढील सतरा वर्षांमधें तो आवेग ओसरला आहे, म्हणून दुःख कांहीं कमी झालें नाहीं. दुःख सहन करण्याची संवय झाल्यामुळें शोकानें शान्तीचे रूप धारण केलें आहे. पण त्यांतील विषादाचा तुरटपणा गेला नाहीं. म्हणूनच प्रस्तुत स्मरणांजलि अितकी कषायमधुर झाली आहे.

खमंग रव्यामधें तूपसाखरेचें स्निग्धमधुर व्यंजन असतें म्हणूनच लाडू चांगला बांधला जातो. हें व्यंजन नसलें किंवा कमी पडलें तर तेच रव्याचे कण समुद्रकांठच्या वाळूसारखे फसफसीत होतात. कवि म्हणतो कीं पहिलीं सतरा वर्षें पत्नीनें तिच्या स्निग्धरसिक सहवासानें आपलें आयुष्य कृतार्थ केलें होतें आणि बांधून अेकरूप केलें होतें. आतां तें रसायण अुरलें नाहीं, त्यामुळें आतांचे हे दिवस पोकळ आणि सुटे झाले आहेत. स्मरणांतहि टिकत नाहींत, निसटून जातात; कुठें जातात तेंहि समजत नाही.

या लहानशा स्मरण-संहितेंत कवीनें आपल्या पत्नीला जी श्रद्धांजलि वाहिली आहे ती कोणाहि नारीला धन्यता वाटण्यास पुरेशी आहे. कवि म्हणतात, 'या सतरा वर्षांत मी जो कांहीं बनलों, माझें जें कांहीं जीवन-संगठन दृढ आणि समृद्ध होअूं शकलें तें सर्व केवळ

ब्रह्मदेवाची किंवा त्याच्या सृष्टिक्रमाची घटना नव्हे. माझ्या प्रेमचतुर पत्नीनें मला परोपरीनें हाताशीं धरून अेखाद्या कुशल कारागिराप्रमाणें मला आकार दिला. माझ्या त्या जीवनांत मूल्य भरलें त्याचाच तो प्रताप होता.

आणि म्हणूनच पुढचीं हीं सतरा वर्षें कशीं अुपासमारीसारखीं वाटतात.'

## प्रथम शोक

रानाच्या छायेंतून जो रस्ता जात होता तो आज गवतानें झांकला गेला आहे.

अशा निवांत जागीं अेकाअेकीं कोणसें मागून बोललें, 'मला ओळखत नाहींस का ?'

मी मागें वळून न्याहाळून पाहिलें आणि म्हणालों, 'ओळख पटते, पण नांव कांहीं बरोबर आठवत नाहीं.'

ती व्यक्ति म्हणाली, 'मी आहें तुमचा तोच जुना पंचवीशीं-तील शोक.'

त्या व्यक्तीच्या डोळ्यांच्या कोपऱ्यांत पाणी चमकलें. जणुं जलाशयावर चमकणारी चंद्राची कोर.

मी अवाक् होअून अुभाच राहिलों. नंतर म्हणालों, 'त्या दिवशीं दिसत होतीस श्रावणांतल्या मेघांप्रमाणें काळी सांवळी आणि आज पहातों तों दिसतेस जणुं आश्विनांतली सुवर्णाची प्रतिमा. त्या काळचें डोळ्यांतलें सगळें पाणी हरवलें होय ?'

चकार शब्द न बोलतां ती थोडीशी हंसली. समजलों कीं त्या हास्यांतच सर्व कांहीं सामावलें आहे. वर्षाऋतूंतील मेघांनीं शरद-ऋतूंत पारिजातांचें हास्यच जणुं शिकून घेतलें आहे.

मीं विचारलें, 'माझें तें पंचवीशींतलें यौवन अजूनहि तूं जपून ठेवलें आहेस होय ?'

ती म्हणाली, 'हा पहाना माझ्या गळ्यांतील हार.'

खरंच, त्या दिवशींच्या वसंताच्या माळेंतील अेक पाकळी देखील गळून पडलेली नव्हती.

मी म्हणालों, 'माझें अितर सर्व कांहीं जीर्ण शीर्ण झालें आहे. पण तुझ्या गळ्यांतील माझें तें पंचवीशींतलें यौवन मात्र आज देखील मलूल झालेलें नाहीं!'

तिनें ती माला हळूं हळूं आपल्या गळ्यांतून काढून माझ्या गळ्यांत घातली आणि म्हणाली, "आठवतं का, त्या दिवशीं म्हणाला होतास, 'मला सांत्वना नको शोकच हवा आहे.'"

लज्जित होअून म्हणालों, 'म्हणालों होतों खरा, पण नंतर बरेच दिवस लोटले नि केव्हांचासा विसरून गेलों.'

ती मूर्ति म्हणाली, 'ज्या अंतरात्म्याचा तो वर होता तो स्वतः कसा विसरणार? तेव्हांपासूनच मी छायेंत बसून आहें, आतां मला आपलेसें करून घे.'

मी तिचा हात आपल्या हातांत घेत म्हणालों, 'कोण ही तुझी अपरूप मूर्ति!'

ती म्हणाली, 'जो होता शोक तोच आज बनला आहे शांति.'

## निरूपण — प्रथम शोक

१

शोकाचें दुःख जेव्हां अगदीं ताजें असतें तेव्हां शोक कमी व्हावा असें आपल्याला मुळींच वाटत नसतें. वाटतें कीं शोक कमी होणें म्हणजे प्रियजनांची किंमत कमी करणें होय. शोकाचा विसर पडावा अशी अिच्छा करणें म्हणजे प्रियजनांशीं कृतघ्न होण्यासारखें आहे.

पण शोक अुराशीं बाळगून बाळगला जात नाहीं. जीवन—जिवंत जीवन—मृताचें स्मरण कितीसें अुराशीं बाळगून बसणार? प्रत्येक गेलेली रात्र शोकमय स्मरणांला शिळें करीत असते. आणि शोकानें पिळून गेलेलें हृदय विस्मृतीच्या जलामधें बुडून निघतांच पुनः ताजेंतवानें होअूं लागतें.

पुढें जेव्हां कोणत्याहि कारणानें जुन्या गोष्टी आठवतात, तेव्हां भूतकाळ अगदीं ताजा होतो. ते सर्व जुने दिवस आठवतात आणि त्या दिवसांचें आपलें यौवन आणि आजचें वार्धक्य यांची नकळत तुलना होअूं लागतें.

अेखादें वादळ शांत झालें म्हणजे ज्याप्रमाणें आकाश धुवून निघतें, सर्व वनस्पति ताज्या तरारूं लागतात, रानांतील वाटादेखील गवतानें झांकून जातात आणि जेथें पहावें तेथें समृद्ध शान्ति पसरलेली दिसते, त्याचप्रमाणें शोकाचा काळ ओसरला म्हणजे तो शोकहि संयमपूत होअून अेक प्रकारचें माधुर्य धारण करतो. त्यांतून नवाच सुगंध, सुवास सुटूं लागतो. आणि जो अेके काळीं शोक होता तो आतां शान्तीच्या रूपानें जीवनाला नवीनच ओप चढवितो.

२

जेवण तयार नसतें तेव्हां मुलांनीं त्रास देअूं नये म्हणून आअी त्यांचे हातावर कांहींतरी थोडेंसें ठेअून त्यांना वाटेस लावते. गुळाचा खडा असो किंवा अेखादा बत्तासा. मुलांची ती फक्त फसवणूक असते. पुढें जेवण तयार झालें म्हणजे मुलांना खेळांतून धरून आणून आअी

त्यांना जेवावयास बसविते आणि पोटभर जेऊं घालते. हें नंतरचें अन्न फसवणूक नसून पोषण असतें.

जगांतील सुख हें हातावर ठेवलेल्या त्या प्रमोदीसारखें असतें. ती फसवणूक असते. प्रमोदी चटका लावते, किंचित भुरळ घालते, वेळ मारून नेते,. पण तिनें कांहीं पोट भरत नाहीं, शरीर वाढीस लागत नाहीं. पुढें जेव्हां बरोबर वेळ होते तेव्हां मनुष्याच्या वांट्याला त्याचा खरा आहार—पौष्टिक दुःख त्याला दिलें जातें, पोटभर दिलें जातें. तें जीवनांत खोलवर अुतरतें आणि जीवनाच्या व्यक्तित्वाला वाढीस लावतें. अीश्वराची खरी देणगी ती हीच.

आतां गोष्ट अशी आहे की अीश्वर जेव्हां मनुष्याला अेखादी देणगी देतो तेव्हां त्याच क्रियेनें तो त्या देणगीलाहि मनुष्य देतो. मनुष्यानें देणगी स्वीकारावयाची असते आणि ती सांभाळून ठेवावयाची असते, योग्य प्रकारें वापरावयाची असते. हें मनुष्याचें कर्तव्य झालें. अुलटपक्षीं देणगीनें मनुष्याचा स्वीकार करावयाचा असतो, त्याला सांभाळायचें असतें, त्याला वाढीस लावावयाचें असतें. ही जबाबदारी त्या देणगीला ओळखावी लागते. अीश्वरानें मनुष्याला शोक दिला. त्याला सांभाळणें, त्याचा अुपयोग करून घेणें हें मनुष्याचें काम. पुष्कळ वेळां मनुष्य हें कर्तव्य थोडक्यांत आटोपतो. मनुष्य प्रमादी आहे. पोरच तो! पण शोक आपली जबाबदारी कसा विसरेल? तो थोर आहे. तो अखंड जागृत राहून मनुष्याची सेवा करीतच राहतो. आणि शेवटीं प्रगाढ शान्तीचें रूप धारण करून त्याचें जीवन सुवासित करतो.

# कुठा'य ?

## १

स्मशानांतून बाप परत फिरला.

त्यावेळीं सात वर्षांचा त्याचा मुलगा—अुघडाबंब, गळ्यांत सोन्याचा ताअीत—गल्लीकडील गच्चीवरील खिडकींत अेकटा अुभा आहे.

त्याच्या मनांत काय काय चाललें आहे तें त्याचें त्यालाच ठाअूक नव्हतें.

सकाळचें अून समोरच्या घराच्या अंगणांतील निंबाच्या शेंड्या-वर झळकूं लागलें.

कैऱ्या विकणारा आळींत शिरून चारदोनदां पुकारून परत गेला.

बापानें घरीं येतांच बाळाला आपल्या मांडीवर घेतलें, बाळानें विचारलें, 'बाबा, आअी कुठा'य ? '

बापानें आकाशाकडे पहात म्हटलें, 'स्वर्गांत.'

## २

त्या रात्रीं शोकानें क्लान्त बाप पेंगत पेंगतहि मधून मधून हुंदके देअून अुठे.

दारांत मिणमिणता दिवा आणि जवळच्याच भिंतीवर दोन पाली.

समोरच गच्ची होती. केव्हांसें तें मूल तेथें येअून अुभें राहिलें.

चहूंकडे दिवे मालवलेलीं घरें जणुं दैत्यपुरींतले पहारेवालेच, अुभ्या अुभ्या पेंगताहेत.

दिगंबर मुलगा आकाशाकडे टक लावून पहात राहिला आहे. त्याचें गोंधळलेलें मन कुणालासें विचारीत होतें—'स्वर्गाचा रस्ता कुठा'य ? '

पण आकाशांतून कसलाच साद अुमटला नाहीं.

फक्त ताऱ्यांताऱ्यांतून मूक अंधःकाराचे अश्रु तरळत होते.

## निरूपण — प्रश्न

बाल्यकाळचें काव्य म्हणजे गोंधळलेलें तत्त्वज्ञान.

बापानें स्मशानांत जाऊन आपल्या जीवनसंगिनीचें विसर्जन केलें आणि जिनें जन्मभर साथ दिली आणि सेवा केली तिचीच राख झालेली ओल्या डोळ्यांनीं पाहून तो घरीं परतला. जिवंतपणीं जी संगिनी होती ती मरणाच्या दिव्य स्पर्शानें आणि प्रेम-स्मरणाच्या किमयेनें देवी झाली. घरीं येऊन पहातो तों तिनें दिलेला छकुला आपली वाट पहात आहे. चार दिवसांचें घरचें गांभीर्य मुलाला कांहीं केल्या समजेना. आपल्या आओीला हे सगळे कां, कुठें घेऊन गेले हेंहि त्याच्या ध्यानांत येओीना. मुलानें बापाला विचारलें —'आओी कुठें आहे?' बापाच्या हृदयांत तिची नवी आवृत्ति नुकतीच तयार झाली होती. तिचा हा नवा पत्ता त्यानें मुलाला दिला.

रात्री बाप आणि मुलगा आपापल्या अंथरुणांत निजले. आज बापाला दुःखदायक स्मृतीचाच काय तो सहवास होता आणि मुलाच्या अंथरुणांत आओीच्या अैवजीं केवळ शून्य पोकळी होती. मुलगा अुठला. त्याला आओीकडे जावयाचें होतें, पण तिकडील वाट त्याला ठाअूक नव्हती. कुणाला विचारणार? तो गच्चीवर गेला, त्यानें आकाशाला, आकाशांतील अंधाराला आणि त्या अंधाराची लांबी, रुंदी, खोली मापणाऱ्या ताऱ्यांना प्रश्न केला. स्वर्गाचा रस्ता कुठून आहे? मी तिकडे कसा जाअूं? अंधार म्हणजे अज्ञान, अंधार म्हणजे पोकळी. गोंधळलेल्या मनाला या पोकळींतून जबाब तो काय मिळावयाचा?

स्वर्गाचा आभास करून देणारे, पण स्वतःच स्वर्गाच्या शोधांत असलेले तारेहि स्वतः गोंधळलेले असल्यामुळें त्यांनीं स्वतःचे अूनअून अश्रु थंड करून मुलापर्यन्त पोंचविण्यासाठीं रात्रीच्या हातीं दिले. भोळ्या बालकाला त्यांनीं श्रद्धेची दीक्षा दिली असेल काय?

बापानें आपल्या दांपत्य-जीवनांतून अेक प्रौढ स्वर्ग तयार केला होता. विश्वासू बालकानें बापाच्या त्या अुत्तरांतून आणि विरून गेलेल्या

कापराच्या तुकड्याचा सुवास जसा मागें रहावा, तशाच प्रकारें त्याला घेरून राहिलेल्या आओीच्या वात्सल्यांतून आपला अेक मुग्ध स्वर्ग तयार केला होता आणि हे दोन्ही स्वर्ग अर्धवट झोंपेंत शेजारीं शेजारीं वाढीस लागले होते.

कवीनें आपल्या सहृदयतेनें त्या दोन्ही स्वर्गांचीं सूचनें आपल्यापुढें मांडून त्यांचे द्वारा प्रेमाचा स्वर्ग कसा असतो याचें ओझरतें दर्शन येथें घडवलें आहे.

## गोष्ट

### १

मुलाला वाचा फुटते न फुटते तोंच तें बोलूं लागलें, "गोष्ट सांगा."

आजीबाअींनीं सुरुवात केली, "अेक होता राजाचा मुलगा, अेक होता कोतवालाचा मुलगा, अेक होता सौदागराचा मुलगा" —

गुरुजी खडसावून बोलले, "तीन चोक बाराऽऽ."

पण त्याचवेळीं त्यांच्यापेक्षांहि जोरानें गरजला राक्षस — "हाअूं -माअूं – खाअूं — —" अुजळणीची आरडा ओरड मुलाच्या कांनीं कांहीं केल्या शिरेना.

जे हितचिंतक होते, ते मुलाला घरांत डांबून गंभीर आवाजांत म्हणाले, "तीन चोक बारा" हेंच काय तें खरें, आणि राजाचा मुलगा, कोतवालाचा मुलगा, सौदागराचा मुलगा — हें सगळें मिथ्या; म्हणून —

मुलाचें मन त्या क्षणी मानस-चित्रांतला तो समुद्र पार करून गेलें आहे, ज्याचा मान-चित्रामध्यें (नकाशांत) मागमूस मिळत नाहीं. 'तीन चोक बारा' त्याच्या मागोमाग आपलें हांकारतें, परंतु अंकलिपीच्या सुकाणूला तेथलें पाणी कांहीं आवरत नाहीं.

हितचिंतकांना वाटतें, शुद्ध अुनाडपणा आहे हा सगळा; जो वेतांच्या वळांनीं वळणावर आणायला हवा.

गुरुजींची चर्या बघून आजीबाअी चूप झाल्या.

पण विपत्ति टाळल्या टळत नाहींत, अेक जाते तर दुसरी येते. आतां पुराणिकबोवांनीं येअून आपलें आसन जमविलें आणि त्यांनीं सुरू केली अेका राजपुत्राच्या वनवासाची कथा.

तेथें राक्षसीचें नाक कापणें चाललें आहे, तर येथें हितचिंतक चालवितात, "अितिहासीं याला प्रमाण नाहीं. घरीं, दारीं, हाट-बाजारीं ज्याला प्रमाण आहे तें म्हणजे 'तीन चोक बारा'."

अेवढ्या वेळांत हनुमानानें अुड्डाण केलें होतें आकाशांत, अितकें अितकें अुंच कीं अितिहासाला तसलें अुड्डाण कांहीं केल्या जुळेना.

पाठशाळांतून विद्यालयांत, विद्यालयांतून कॉलेजांत, या क्रमानें भट्टींत घालून पुटपाक चढवून मुलाच्या मनाचें शोधन करणें चालूं लागलें. परंतु कितीहि गाळणी वर गाळणी (distillation) करा, ते दोन शब्द कांहीं केल्या गळत नाहींत, "गोष्ट सांगा."

२

यावरून दिसून येतें कीं, केवळ बाळपणींच नव्हे तर सर्वच वयांत मनुष्य आहे गोष्ट-पोष्य जीव. म्हणूनच जगभर माणसाच्या घरोघरीं, युगानुयुगीं, जिभे जिभेवर, लिखाणा लिखाणांतून गोष्टींचा जो ढिगारा माजला आहे, त्यानें माणसाच्या सगळ्या संचयाला मागें टाकलें आहे.

हितचिंतक अेका गोष्टीचा नीट विचार करून बघत नाहींत, कीं कथा-कहाण्या रचण्याचें वेडच सृष्टिकर्त्याचें अखेरचें वेड होय; त्याला शुद्धीवर आणल्याशिवाय मनुष्याला सुधारण्याची आशाच नको.

अेके काळीं विधाता आपल्या कारखान्यांत आगीपासून पाणी, आणि पाण्यापासून भूमि घडविण्यांत गढला होता. सृष्टि तेव्हां गलद्धर्म, बाष्पभाराकुल. धातूंचे–दगडांचे पिंडचे पिंड अेकावर अेक चिणले जात होते; जिकडे पहावें तिकडे विखुरलेला आहे मालमसाला आणि चालली आहे धमाधम पिटणी. त्या दिवशींच्या विधात्याला बघून कांहीं केल्या वाटलें नसतें कीं, त्याच्यांत कुठेंहि कसलाहि पोरपणा आहे. तेव्हांचा तो सगळा खटाटोप बघून वाटलें, हेंच काय तें खरें "सारपूर्ण".

त्यानंतर केव्हांचासा प्राणाचा पाया घातला गेला, नि फुटलें गवत, अुठले तरु, सुटले पशु, अुडले पक्षी. कोणी कोणी स्वत:ला जमिनीशींच बांधले राखून आकाशाकडे अंजलि पसरून अुभे राहिले; कोणी कोणी मोकळीक मिळतांच पृथ्वीवर विविधरूपानें आपला विस्तार करूं लागले; कोणी कोणी पाण्याच्या बुरख्याआड नि:शब्द नृत्यानें

पृथ्वीप्रदक्षिणा करण्यांत दंग झाले, तर कोणी कोणी आकाशांत पंख पसरून सूर्यलोकाच्या वेदीपुढें गायनाच्या अर्घ्यरचनेंत मग्न झाले.

अेव्हांपासूनच विधात्याच्या मनाचें चांचल्य ध्यानांत येअूं लागलें.

अशा रीतीनें बरींच युगें निघून गेलीं. सहसा अेकदा सृष्टि-कर्त्याला काय लहर लागली, त्यानें अेकोणपन्नास वायूंना आपल्या कारखान्यांत आणण्याचा हुकूम केला. त्या सर्वांचाच अुपयोग करून त्यानें मनुष्य घडविला. आतां अितक्या दिवसांनंतर सुरूं झाली गोष्टींची लीला. त्याचा बराच काळ लोटला होता विज्ञानांत, शिल्पकलेंत; आतां सुरूं झालें साहित्याचें राज्य.

आतां त्यानें गोष्टी गोष्टीतून मनुष्याचा विकास चालविला. आहार, निद्रा, संतानपालन झालें पशुपक्ष्याचें जीवन; आणि कहाण्या झालें माणसाचें जीवन. कितीतरी वेदना, कितीतरी घटना; सुख, दुःख, राग, विराग, भलें, बुरें यांचे कितीतरी आघात प्रत्याघात. अिच्छेचा अिच्छेशीं, अेकाचा दहांशीं, साधनेचा स्वभावाशीं, कामनेचा घटनेशीं, अशीं संघातांचीं कितीतरी आवर्तनें चाललीं. नदी जलौघाचा प्रवाह, तसाच मनुष्य गोष्टींचा प्रवाह. म्हणून अेकमेक सामोरे येतांच प्रश्नांची सरबत्ती सुरूं होते, "कसं काय?" "काय बातमी? अन् मग?" असें "अन् मग" आणि "अन् मग" सारखें विणलें जाअून पृथ्वीभरून माणसांची कहाणी गुंफली जाते. यालाच म्हणतात जीवनाची कहाणी, यालाच म्हणतात मानवाचा अितिहास.

विधात्यानें रचलेला अितिहास आणि मानवानें रचलेली कहाणी या दोन गोष्टी मिळून जें बनतें तें मनुष्याचें जग. मानवाच्या बाबतींत केवळ अशोकाची गोष्ट, अकबराची गोष्टच सत्य असें नाहीं; जो राजपुत्र साती समुद्र पार होअून सात सात राजांच्या धनरत्नांच्या शोधांत जातो तोहि सत्यच; आणि त्या भक्तिविमुग्ध हनुमानाच्या साध्या भोळ्या सरळ वीरत्वाची कथाहि सत्य, कीं ज्या हनुमानानें गंधमादन पर्वताला अुपटून आणण्यांत मनांत कसलाहि किन्तु बाळगला नाहीं. मनुष्याच्या मतें जितका औरंगजेब सत्य, तितकाच दुर्योधनहि

सत्य. कोणाचें प्रमाण अधिक नि कोणाचें कमी असल्या हिशेबानें नव्हे, तर केवळ कथा या नात्यानें जी कसाला अुतरेल तीच त्याच्या दृष्टीनें सर्वाधिक सत्य होय.

मनुष्य विधात्याच्या साहित्य-लोकींचा प्राणी. तो नव्हे वस्तूचा घडलेला, नव्हे तत्त्वांचा. नाना प्रयत्नांनींहि हितचिंतक कांहीं केल्या माणसाला याचा विसर पाडवूं शकले नाहीत. शेवटीं लाचार होअून त्यांनीं हितोपदेश आणि कहाण्या यांच्या तडजोडीचा प्रयत्न करून पाहिला. पण सनातन स्वभाव-दोषामुळें कांहीं केल्या ते त्यांची तोंड-मिळवणी करूं शकले नाहीं. अशानें कहाणीहि जाते नासून आणि हितोपदेशहि जातो मरून, आणि मागें अुरतो काय तो कचऱ्याचा ढीग.

## निरूपण — गल्प

१

पंचतंत्राच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे कीं अेका राजानें आपल्या राजपुत्रांना विद्या शिकवून कुशल करण्याची पराकाष्ठा केली. पण मठ्ठ मुलांनीं बापाला सर्व बाजूंनीं निराश केलें. अशा वेळीं विष्णुशर्मा नांवाचा अेक ब्राह्मण पंडित राजाचे दरबारी आला आणि त्यानें सहा महिन्यांत त्या निर्बुद्ध राजपुत्रांना तयार करण्याचा विडा अुचलला. असे विडे अुचलणारे पुष्कळ लोक राजदरबारांत येत असतात. कधी कधीं त्यांना स्वतःचें डोकेंहि द्यावें लागतें. पण विष्णुशर्म्यानें आपला पण खरा करून दाखविला आणि युगानुयुगें आपलें नांव अजरामर करून ठेविलें.

विष्णुशर्म्यानें शिक्षणाची कोणती पद्धति अवलंबिली होती हें समजून घ्यावयाचें असेल तर पंचतंत्र पाहिलें पाहिजे किंवा त्याचेंच प्रतिबिंब हितोपदेश. लहान मुलांना गोष्टी आवडतात. माणसांच्या गोष्टीं-पेक्षां कुत्र्यामांजरांच्या आणि पशुपक्ष्यांच्या गोष्टी मुलांना जास्त आवडतात. तशा गोष्टींपासून प्रारंभ करून त्या ब्राह्मणानें राजपुत्रांना सर्व राजकारण शिकविलें.

विष्णुशर्म्याचें अुदाहरण पाहून आजकाल कितीतरी शिक्षणशास्त्री गोष्टींच्या रूपानें अितिहास भूगोल शिकवितात. गणित आणि अर्थशास्त्रहि तसेंच शिकवूं पहातात. अशा लोकांनीं रविबाबूंचा गोष्टीवरील हा निबंध अवश्य वाचावा.

लहान मुलांना साखर आवडते असें पाहून वैद्य लोकांनीं आंबट, खारट, तिखट, तुरट आणि कडू औषधें साखरेंत घोळून देण्यास सुरुवात केली. मुलांनीं ही युक्ति ओळखली. आतां औषध टाकून साखर कशी मटकावतां येअील हेंच तीं पहात असतात, आणि तसें न साधलें तर 'तुमची ती साखरहि नको आणि त्यांत लपविलेलें औषधहि आम्हाला नको' असें म्हणून रुसून बसतात.

आजचे जीवनशास्त्री रविबाबूंप्रमाणें म्हणतात, साखर नुसती गोडच नाहीं, पण पौष्टिक पदार्थहि आहे, विशेषतः बाळपणीं शरीराच्या वाढीला पुष्कळशी साखर हवी असते. मिष्ट पदार्थांची अुपासमार केल्यानेंच मुलें प्रमाणाबाहेर साखर खाअून आजारी पडतात. औषधाच्या मदतीला म्हणून नव्हे पण नित्याचा आहार म्हणून त्यांना पुरेशी साखर द्या आणि परिणाम पहा! साखर शुद्ध आहार आहे. गोड फळें, गूळ, खडीसाखर, मध, सुधारस, काकवी कोणत्याहि रूपानें द्या. पण असें समजून द्या कीं हा प्रत्यक्ष पौष्टिक आहार आहे. केवळ औषधाचा मदतनीस म्हणून नव्हे.

२

खऱ्याखुऱ्या घटना खऱ्या असल्या तरी त्या सगळ्याच कांहीं जीवनाचें सत्य होअूं शकत नाहींत. आणि कल्पना जरी बोलून चालून काल्पनिक असल्या तरी त्या सत्याचा द्रोहच करतात असेंहि नाही. या दोन गोष्टींचा मनुष्याला जेव्हां शोध लागला तेव्हां त्याची दृष्टि निवळली आणि त्याला अन्तर्बाह्य जगाकडे पहाण्याची नवी दृष्टि मिळाली. लहान मुलांच्या गोष्टी असोत, मागासलेल्या लोकांच्या लोककथा असोत, किंवा पुराणांतील अद्भुत कथा असोत, त्यांमध्यें जीवनाचें शुद्ध प्रतिबिंब पडलेलें असतें, जीवनरहस्य सुवाच्य आणि सुबोध रूपांत ग्रथित केलेलें असतें आणि म्हणून गोष्टींना शिक्षणामध्यें स्वतंत्र आणि महत्त्वाचें स्थान असलें पाहिजे असा टॉल्स्टायप्रमाणें रविबाबूंचाहि आग्रह आहे. अेवढ्यासाठींच त्यांनीं हा निबंध लिहिला आहे. अेवढ्याशा लहानशा आणि सोप्या निबंधांत त्यांनीं अनेक मुद्दे आणलेले आहेत आणि म्हणूनच या निबंधांत वाक्यावाक्यांत वातावरण बदलत जातें. अर्थातच हा लघुनिबंध नसून अत्यंत संक्षिप्त मीमांसा ग्रंथ आहे असें म्हणावें लागतें.

३

मनुष्य अनेक विषयांचें अध्ययन करतो, पण मनुष्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा विषय म्हणजे मनुष्यच होय. 'अैतिहासिक मनुष्य', 'धार्मिक मनुष्य', 'श्रीमंत मनुष्य' किंवा 'जादुगार मनुष्य' नव्हें.

हे सर्व अेकांगी मनुष्य आहेत. मनुष्याच्या अध्ययनाचा खरा विषय म्हणजे 'केवळ' मनुष्यच होय, साधा आणि संपूर्ण मनुष्य. आणि म्हणूनच अितिहास, पुराणें, खलपुरुषांचीं चरित्रें आणि आत्मकथा यांचा जन्म होण्यापूर्वीं कहाण्यांचा जन्म झाला, कुटाळक्यांचा जन्म झाला आणि शिळोप्याच्या गप्पांचा जन्म झाला. हवा आणि पाणी सर्वत्र मिळत असल्यामुळें ज्याप्रमाणें त्यांचें महत्त्व मनुष्य विसरतो आणि दुर्मिळ वस्तूंच्या मागें लागतो, त्याप्रमाणें शिक्षणशास्त्रानें कथाकहाण्यांचा अनादर करून अितर पुष्कळ विषय पुढे केले; पण जीवनाचा द्रोह करून शिक्षणशास्त्र प्रगति कशी करणार? रविबाबू म्हणतात, "देवानेंच मनुष्याला गोष्टीच्या बरोबर जन्म दिला, आणि त्यानें म्हटलें, 'या आहारावर परिपुष्ट व्हा. यांतूनच तुम्हांला जीवन रहस्य मिळेल'." (गोष्टीची योग्यता सनातन यज्ञाहून कमी नाहीं असें रविबाबूंनी परंपरेनें सुचविलें आहे.—

सहवार्ताः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः।
अनया प्रसविष्यध्वं अेषा वोऽस्त्विष्टकामधुक् ॥

रविबाबूंनीं विकासवादाचा Evolution चा अभ्यास केला आहे आणि त्यांतून मिळालेला बोध ते आपल्या काव्यमय भाषेंत अनेक परींनीं लोकांपुढें मांडत असतात. प्रथम भौतिक सृष्टि निर्माण झाली. त्यावेळीं अीश्वर गणिती आणि वैज्ञानिक होता. पुढें अीश्वरामध्यें जीवनरस अुत्पन्न झाला आणि त्यानें वनस्पति, कृमि-कीट, जलचर, भूचर, खेचर सर्व तयार केलें. सृष्टीचें रूप पालटलें. अेवढेंच नव्हे देवाच्या स्वभावांतहि परिवर्तन झालें. पुढें देवामध्यें कल्पनेचा अुदय झाला. (देवाला म्हातारचळ लागला म्हणा वाटल्यास.) त्यानें कल्पना-तरंगी मनुष्य अुत्पन्न केला. सृष्टीचें स्वरूप पुनः बदललें. सृष्टीला केवळ हर्षवायूच झाला नाहीं, तर साती साती अेकुणपन्नास प्रकारच्या वायूंनीं तिला पछाडले आणि या सर्व भूतांचा भूतनाथ प्रत्यक्ष अीश्वर त्यांत सामील झाला आणि त्यानें माणूस तयार केला. मनुष्यानें आपलें जीवनरहस्य ओळखून साहित्य निर्माण केलें. आतां या साहित्याला

तुम्ही दूर कसें करणार? साहित्याचे प्रकार अनेक आहेत. पण या सर्व प्रकारांचा शिरोमणि म्हणजे कथा-वार्ता, गोष्ट. जीवनाचें पूर्ण प्रतिबिंब गोष्टींतच पडत असतें. गोष्टीचा अवतार झाला नाहीं अशी तसूभर देखील जमीन या जगांत सांपडणार नाहीं आणि गोष्टीच्या गोडीनें मनुष्य वेडावला नाहीं असा अेकहि काळ, अेकहि युग मिळणार नाहीं. गोष्ट खरोखरच सार्वभौम आणि चिरजीवी आहे. हिनेंच तर अश्वत्थामा आदि सात जणांना चिरंजीवपद दिलें आणि हीच कांहींहि वाहन नसतां सृष्टीच्या आरंभापासून सर्वत्र संचार करीत असते. (हें शेवटचें विधान केलें खरें. पण सूतशौनक आदि ऋषींपासून नारदापर्यंत सर्व संचार-पटूंनीं माझे विरुद्ध गोष्टीच्या दरबारांत फिर्याद नोंदल्याचें ताजें वर्तमान कानीं आलें आहे.)

# मीनु

## १

मीनु पश्चिमेकडे * वाढलेली होती. लहानपणीं विहिरीजवळच्या तूतीच्या झाडावरून चोरून तूती पाडायला जात असे; तुरीच्या शेतांत जो म्हातारा माळी गवताचे निंदण करी त्याच्याशीं तिची चांगलीच गट्टी होती.

मोठी झाल्यावर तिचें जौनपुरीं लग्न झालें. तिला अेक मूल झालें, नि वारलें. डॉक्टर म्हणाले, 'हीहि वांचते किंवा नाहीं कुणास ठाअूक.'

नंतर तिला कलकत्त्याला आणण्यांत आलें.

कोवळें होतें तिचें वय. कच्च्या फळाप्रमाणें तिचे कोमल प्राण पृथ्वीचा देंठ मजबूत धरून होते. जें कांहीं कच्चें-कोवळें भासें, जें कांहीं हिरवेंकंच दिसे, जें कांहीं सजीव वाटे त्या सर्वांचाच होता तिला भारी लळा.

तिचें होतें आठदहा हातांचेंच काय तें अंगण. आणि तेवढ्यांतच होती तिची चिमुकली बाग.

ही बाग म्हणजे तिच्या मांडीवरचें मूलच जणुं. बागेच्या कुंपणावर तिनें झुम्मक लतेचा ( Passion Flora ) वेल चढविला होता. त्या वेलीवर कळ्या धरतात न धरतात तोंच तिला निघून यावें लागलें होतें. आळींतल्या पाळीव आणि बिनपाळीव सगळ्याच कुत्र्यांना तिचेकडे अन्न मिळे, प्रेम मिळे. त्यांतल्या ज्या कुत्र्यावर ती सर्वाधिक प्रेम करी तो होता नाकानें नकटा नि त्याचें नांव होतें भोता.

* पश्चिमदेश — बंगाली समाजांत बंगालच्या पश्चिमेला असलेल्या सर्व प्रदेशाला पश्चिम म्हणतात. आतां त्याचा अर्थ जवळ जवळ बंगाल शिवायचे सर्व प्रान्त असा झाला आहे.

त्याच्याच गळ्याला शोभविण्यासाठीं म्हणून मीनु रंगित मण्यांची माळ ओवीत होती. ती अपुरीच राहिली होती. तें ज्याचें कुत्रें होतें तो म्हणाला, 'वहिनी, याला तुम्हीच बरोबर घेअून जाना.'

मीनूचा पति म्हणाला, 'नको ही नसती ब्याद.'

२

कलकत्त्याच्या घरीं दुसऱ्या मजल्यावरच्या खोलींत मीनु पडून असते. जवळ बसल्या बसल्या हिन्दुस्तानी दाअीची सारखी वटवट चालू असते. त्यांतलें मीनु कांहीं अैकते, कांहीं अैकत नसते.

अेके दिवशीं मीनूचा रात्रभर डोळा लागला नव्हता. पहांटेचा अंधार विरळ होतांच तिला दिसलें की तिच्या खिडकीखालचें गोलक चांफ्याचें झाड फुलानें बहरून निघालें आहे. त्याच्या मृदु सुगंधाच्या लहानशा झुळुकीनें मीनूच्या खिडकीशेजारीं येअून जणुं विचारलें, 'बरी आहेस ना?'

त्यांचें घर आणि शेजारचें घर यामधील अरुंद बोळांतलें तें प्रकाशाचें भुकेलेलें झाड, विश्वप्रकृतीचें तें भाबडें मूल, आपण कसे काय येथें येअून पडलों याच्या विवंचनेनें गोंधळल्यागत तेथें अुभें होतें.

शिणलेली मीनु अुशिरा अुठायची आणि अुठल्याबरोबर ती त्या झाडाकडे बघायची. पण त्या दिवसासारखीं त्याच्यावर आतां फुलें दिसत ना. ती दाअीला म्हणायची, 'अग, दाअीग, तुला माझ्या गळ्याची शपथ. या झाडाला आळं खणून त्याला रोज पाणी देत जा.'

या झाडावर हल्लीं कांहीं दिवस फुलें कां दिसत नव्हतीं तें लवकरच कळून आलें.

पहांटेचा प्रकाश अर्ध्या अुमललेल्या कमळाअितका अुमलायला आला होता. अशा वेळीं परडी हातांत घेअून पुजारी भटजीबोवा झाडाला जोरजोरानें हिसडे देअूं लागला. जणुं चौथ वसूलीकरितां आलेला बारगीर शिपाअी.

मीनु दाअीला म्हणाली, 'धांवत जा दाअी आणि त्या भटजी-बोवांना बोलावून आण अेकदांची.'

भटजी येतांच मीनु त्यांना प्रणाम करून म्हणाली, 'महाराज, फुलें कोणासाठीं घेअून जातां?'

भटजी म्हणाला, 'देवाकरितां.'

मीनु म्हणाली, 'देवानें तर तीं फुलें आपण होअूनच मजकरतां पाठविली आहेत.'

'तुझ्याकरतां?'

'होय. माझ्याच करतां. देवानें जें दिलें आहे तें कांहीं परत घेण्यासाठीं म्हणून दिलें नाहीं.'

भटजीबोवा चिडून चालते झाले.

दुसरे दिवशीं पहांटे परत भटजीबोवांनीं जेव्हां झाडाला हिसडे द्यायला सुरुवात केली, तेव्हां मीनु दाअीला म्हणाली, 'अग दाअी, माझ्यानं कांहीं हें अुघडचा डोळचांनीं बघवत नाहीं. शेजारच्या खोलींत खिडकीजवळ माझें अंथरूण घालून दे.'

३

शेजारच्या खोलीच्या खिडकीसमोर राय चौधरींचा चौसोपी वाडा होता. मीनु आपल्या पतीला हांक मारून म्हणाली, 'पहा, पहा. किती सुंदर आहे त्यांचा तो मुलगा. त्याला आणून अंमळ माझ्या मांडीवर बसवाना.'

पति म्हणाला, 'गरिबांच्या घरीं ते आपलं मूल कसले पाठवणार?'

मीनु म्हणाली, 'भलतंच कांहींतरी. अहो लहान मुलांच्या लेखीं श्रीमंत गरिबाचा का भेद असतो? सर्वांच्याच मांडीवर असतें त्यांचें राजसिंहासन.'

पति परत येअून सांगूं लागला, "दरवान म्हणाला, 'बाबूंशीं आतां भेट होअूं शकणार नाहीं.'"

दूसरे दिवशीं सायंकाळीं मीनु दाओीला हांक मारून म्हणाली, 'बघ कसा, बागेंत अेकटाच खेळतोय. धांवत जा आणि देअून ये हा संदेश* त्याच्या हातांत.'

संध्याकाळीं पति तिजजवळ येअून म्हणाला, 'ते लोक भारी रागावले आहेत अं.'

'कां बाओी, काय झालंय.'

'ते म्हणतात, दाओीनें जर पुन्हा त्यांच्या बागेंत पाअूल ठेवलें तर ते तिला पोलीसच्या स्वाधीन करतील.'

क्षणांत मीनूच्या दोन्ही डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटला. ती म्हणाली, 'मी पाहिलंय, सगळं पाहिलंय. त्यांनीं त्याच्या हातांतला संदेश हिसकावून घेतला आणि नंतर त्याला चांगलाच चोप दिला. अिथें कांहीं मी जगायची नाहीं. मला येथून घेअून चला.'

---

* संदेश—अेक प्रकारची मिठाओी.

## निरूपण — मीनु

ही लघुकथा नाहीं. अेका कोमल हृदयाचें अेक लहानसें नाजुक चित्र आहे. लोक गरिबांच्या अन्नवस्त्राविषयीं 'कळकळ दाखवितात. गरिबांना खायला, प्यायला, आणि ल्यायला जर कांहीं न मिळालें तर त्यांनीं वांचावें कसें? अशा प्रकारची आस्था पशूंसाठीं देखील असली पाहिजे. घरच्या बैलाला खायला पोटभर मिळालें कीं नाहीं, स्वच्छ पाणी पोटभर' प्यायला मिळालें कीं नाहीं आणि कडाक्याची थंडी पडते तेव्हां त्याच्या पाठीवर झूल आहे किंवा नाहीं, अेवढेंतरी निदान मनुष्यानें पाहिलेंच पाहिजे. पण पशु देखील जर त्यांच्या पाठीवरून हात फिरवला, पाणी पितांना शीळ घातली तरच चांगले अंग धरतात. मग मनुष्याला नुसतें अन्नवस्त्र देअून कसें भागावें! मनुष्याला देखील जगण्यासाठीं प्रेम हवें असतें. तें जर न मिळालें तर मनुष्य झुरणीस लागतो.

पण जगाचा व्यवहार अितका समजूतदार नसतो. त्यामुळें जवळ जवळ प्रत्येकाला वेळीच व्यवहार समजून कोडगें व्हावें लागतें. पण सगळींच माणसें अशीं कोडगीं होअूं शकत नाहींत. त्यांना जगण्यासाठीं प्रेम हवें असतें. दुसऱ्याचें प्रिय-पात्र व्हावें अेवढाच प्रेमाचा अर्थ नाहीं. मुबलक प्रेम करायला अनुकूल पात्र सांपडावें ही सुद्धा तितकीच जोरदार आणि दुर्दमनीय भूक असतें. असें प्रेम स्वार्थी असतें असेंहि नाहीं. पशु, पक्षी, मासे, साप, माशा, मुंग्या, फळझाडें, फुलझाडें, आकाशांतील तारें, मेघांना विस्कटणारे वारे, कड्यावरून पडणारे प्रपात, आणि आकाशांत अुडणारे कारंजे सर्वच त्यांच्या प्रेमाचा विषय असतो. याला केवळ कलाभिरुचि म्हणतां यावयाचें नाहीं. येथें प्रेमाचा — हृदयाचा प्रवाह निष्काम भावानें सेवेसाठीं वहात असतो. श्रीमंतांच्या कुटुंबियांपैकी अेखाद्याची अशा प्रकारची लहर लागली तर त्याचें कितीतरी कौतुक होतें. गरिबांना आत्माच नसतो. त्यांनीं फारतर

लाभ-हानीच्या भरीव व्यवहाराचें जीवन चालवावें. प्रेमासाठीं देखील कसलाच नाजुकपणा दाखवूं नये अशी अपेक्षा असते जगाची.

आणि केव्हां केव्हां केवळ दृष्टीच्या अभावी, नाजुकपणाच्यां अभावीं दुसऱ्याच्या हृदयाची भूक आणि वेदना पुष्कळांच्या ध्यानांतच येत नाहींत. अशा लोकांचें हृदय जागृत करण्यासाठीं असलीं शब्दचित्रें फार अुपयोगी पडावीं.

रविबाबूंनीं 'डाकघर' लिहिलें आहे. त्यांत अितर गोष्टींबरोबर हेंहि कार्य — जनतेचें हृदय कमावून तें मअू व सूक्ष्मवेदी करण्याचें कार्य — त्यांनीं अुत्तम रीतीनें केलें आहे. येथेंहि तसेंच आहे.

मीनूची स्थिति दयनीय आहे. पण त्याचें कारण काय? कारण अेवढेंच कीं तिला प्रेम करायला कोणी पात्रच मिळूं देत नाहींत. शारीरिक अुपासमार कोणी होअूं देत नाहीं हें खरें. पण ती सहन करतां येअील. परंतु ही हृदयाची अुपासमार प्राणालाच असह्य होतें. मीनूनें शेवटीं सांगितलें कीं या वातावरणांत मला जगणेंच शक्य नाहीं.

गोष्ट अैकतांना अशा प्रसंगीं तिच्या मनोवृत्ति सांभाळण्याची आपली मानसिक तयारी होते. पण व्यवहारांत तसें क्वचितच घडतें.

शेवटीं अुद्विग्न मन अुद्गार काढतें, 'अशा कोमल वृत्तीच्या माणसांना मरूं देणें हीच काय ती खरी कृपा आहे. या वास्तववादी कठोर जगामधें त्यांनीं राहूंच नये.'

मीनूला कुत्रें आवडलें तें कांहीं तें सुंदर होतें म्हणून नव्हे. पण तें प्रेमाचें भुकेलें होतें म्हणून. त्या कुत्र्याचा मालक ती ब्याद काढून टाकायला अेका पायावर तयार होता. लहानपणीं देखील मीनूला थकल्या-भागल्या म्हाताऱ्याचेंच प्रेम वाटे, यांतहि तीच वृत्ति होती. फुलझाडांचीं मुलें जन्माला येतात न येतात तोंच त्यांना लोक खुडून नेतात हेंहि मीनूला असह्य होअी. भ्रूणहत्येचें वृत्त अैकून आपण जसे अस्वस्थ होतों तशीच ती फुलांची विटंबना पाहून होअी. मीनूचें तत्त्वज्ञान आणि तिचा तर्क धर्ममार्तंड ब्राह्मणाला रुचावा कसा? पचण्याची गोष्ट तर दूरच

राहिली. शेजारचें मूल पाहतांच या वत्सविहीन धेनूला प्रेमाचा पान्हा फुटला. तें मूल जर आपल्याकडे आणतां येत नाहीं, त्याला मांडीवर बसवण्याचें सुख जर मिळत नाहीं तर निदान त्याच्या हातीं मिठाओी पोचवून त्याचा प्रसन्न झालेला चेहरातरी डोळाभर पहावा असें मीनूला वाटलें. पण त्यांतून जें प्रकरण निघालें तें तर कल्पनातीत झालें. सहनशक्तीच्या पलीकडचें तें होतें. तिनें म्हटलें — 'मला येथून घेअून जा.'

तिची ही विनंती तिच्या स्वामीनें अैकली कां शेवटीं विश्वस्वामीनें, तें मात्र कवींनीं आपल्याला सांगितलें नाहीं.

त्यांचें हृदय भरून आलें असावें.

# नांवाचा खेळ

कोंवळ्या वयांतच तो कविता करूं लागला.

कवितेच्या वहीच्या पानांच्या कडेला सोनेरी शाअीनें काळजीपूर्वक किनारी काढून त्यावर वेलबुट्टी चित्रित करून मधें लाल शाअीनें तो कविता लिहून ठेवी आणि वहीच्या मुख-पृष्ठावर भपकेबाज रीतीने लिहून ठेवी, श्री केदारनाथ घोष. हळूं हळूं अेकेक लिखाण तो मासिकांकडे पाठवूं लागला, पण तें कुणी छापीना.

मनांतल्या मनांत त्यानें ठरविलें कीं पैसे गोळा होतांच आपण स्वतःचेंच अेक मासिक काढावें.

वडिलांच्या मृत्यूनंतर वडीलधारी माणसें त्याला वारंवार म्हणूं लागलीं, "कसलें तरी काम कर. लेखनाच्या मागेंच वेळ दवडूं नको."

तो बरिक हंसला आणि लिहूं लागला.

अिजा, बिजा, तिजा त्यानें तीन पुस्तकें अेकामागें अेक छापविलीं. यामुळें चांगलाच गाजावाजा होअील अशी त्यानें आशा केली होती. पण झाला नाहीं.

गाजावाजा झाला तो मात्र अेकाच वाचकाच्या मनांत. तो म्हणजे त्याचा लहानगा भाचा.

नुकताच क, ख, शिकला असल्यामुळें जें पुस्तक हातीं लागेल तें घेअून तो जोरजोरानें वाचूं लागे.

अेके दिवशीं अेक पुस्तक हातांत घेअून धापा टाकीत तो मामांकडे धांवत आला. म्हणाला, "मामा, मामा, हें बघा तुमचें नांव."

मामा थोडेसे हंसले आणि प्रेमानें बाळूचा गालगुच्चा त्यांनीं घेतला.

मामा स्वतःची पेटी अुघडून आणखी अेक पुस्तक बाहेर काढून म्हणाले, "वाच बरं हें."

भाच्यानें अेक अेक अक्षर जुळवीत मामांचें नांव वाचलें. पेटीं-तून आणखी अेक पुस्तक बाहेर आलें, वाचून पहातों तो त्यावरहि मामांचेंच नांव.

अेकामागून अेक तीन तीन पुस्तकांवर मामांचें नांव बघितल्यावर त्याचा थोडक्यांत संतोष होअीना. दोन्ही हात पसरून त्यानें विचारलें, "तुमचें नांव पुष्कळ, पुष्कळ, पुष्कळ पुस्तकांवर आहे नाहीं? शंभर, पन्नास, चार पुस्तकांवर?"

मामा डोळे मिचकावून म्हणाले, "हळू हळू बघशीलच."

भाच्याची स्वारी तीं तिन्ही पुस्तकें घेअून अुड्या मारीत मारीत गेली घरच्या म्हाताऱ्या मोलकरणीला दाखवायला.

* * *

दरम्यान मामांनी अेक नाटक लिहिलें. छत्रपति शिवाजी त्या नाटकाचे नायक होते.

मित्रमंडळी म्हणाली, "हें नाटक खात्रीनें स्टेजवर येण्यासारखें आहे."

त्याच्या मनश्चक्षूंसमोर दिसूं लागलें कीं, रस्तोरस्तीं, गल्लोगल्लीं त्याचें आणि त्याच्या नाटकाचें नांव शहराच्या शरीरावर गोंदलें गेलें आहे.

आज रविवार. त्याचे नाट्यप्रिय मित्र नाटक मंडळीकडे अभिप्राय घेण्यासाठीं गेले आहेत. म्हणूनच तो त्यांच्या वाटेकडे डोळे लावून बसला आहे.

रविवार असल्यामुळें त्याच्या भाच्यालाहि सुटी आहे. आज सकाळपासून त्यानें अेक नवीनच खेळ आरंभला आहे. अन्यमनस्क असल्यामुळें मामांचें तिकडे लक्ष गेलें नव्हतें.

त्याच्या शाळेशेजारींच अेक छापखाना आहे. तिथून भाचेबोवांनीं आपल्या नांवाच्या अक्षरांचे खिळे मिळवून आणले आहेत. त्यांतले कांहीं मोठे आहेत. तर कांहीं लहान.

जें जें पुस्तक हातीं येअील त्यावर त्या शिशांच्या अक्षरांना शाअी लावून तो आपलें नांव छापतो आहे. मामांना चकित करून सोडावयाचें आहे ना त्याला.

आणि आश्चर्यचकित केलेंहि खरें. त्याचे मामा मधेंच दिवाण-खान्यांत येअून पाहतात तों बालभाचे अगदीं रंगून गेलेले आहेत.

"काय कान्हा, काय चाललंय?"

भाच्यानें आपण काय करतो आहोंत तें खूप अुत्साहानें मामांना दाखवलें. फक्त तीनच पुस्तकांवर नव्हे तर निदान पंचवीस अेक पुस्तकांवर ठशाच्या अक्षरांत 'कन्हैया' नांव.

हा काय अुपद्व्याप! लिहिण्यावाचण्याचें नांव नाहीं, बेटा नुसता खेळतो. आणि खेळ पण कसला!

मोठ्या कष्टानें मिळविलेले ते कन्हैयाचे खिळे त्यांनीं त्याच्या हातांतून हिसकावून घेतले.

कन्हैया दुःखानें प्रथम भोकांड पसरून रडला, नंतर स्फुंदून स्फुंदून रडला, त्यानंतर सरीवर सरी आल्याप्रमाणें रडला. कांहीं केल्या गप्प होअीना.

म्हातारी मोलकरीण धांवत आली. तिनें विचारलें, "काय झालें बाबा?"

कन्हैया म्हणाला, "माझें नांव!"

आअी येअून म्हणाली, "काय रे कान्हा, काय झालें?"

कन्हैया गहिंवरून म्हणाला, "माझें नांव!"

मोलकरणीनें हळूंच त्याच्या हातावर सबंधच्या सबंध 'मलाअी पुरी' ठेवली, ती जमिनीवर भिरकावून देअून तो म्हणाला, "माझं नांव!"

आअी पुनः म्हणाली, "कान्हा, ही घे तुझी आगगाडी."

कन्हैया आगगाडी लाथाडून देअून म्हणाला, "माझं नांव."

* * *

नाटक मंडळीकडून मित्र परत आले.

मामांनीं दारापर्यंत धांवत जाऊन विचारलें, "काय ठरलें ?"

मित्र म्हणाले, "ते लोक कबूल झाले नाहींत."

बराच वेळ स्तब्ध राहून मामा म्हणाले, "माझें सर्वस्व गेलें तरी बेहत्तर. मीच आपली अेक नाटक मंडळी काढणार."

मित्र म्हणाले, "आज फुटबॉल मॅच पहायला येणार नाहींस का ?"

तो म्हणाला, "नाहीं. तापासारखें वाटत आहे."

संध्याकाळीं त्याची आअी येअून म्हणाली, "वाढलेलें थंड झालें ना."

तो म्हणाला, "भूक नाहीं."

सायंकाळीं त्याची पत्नी येअून म्हणाली, "तुमचें तें नवें लिखाण अैकविता ना ?"

तो म्हणाला, "डोकं दुखतंय."

भाचा येअून म्हणाला, "द्या परत आम्हांला आमच नांव."

मामांनीं ताडकन् त्याच्या गालावर अेक थप्पड लगावून दिली.

*

## निरूपण — नामेर खेला

नांवाचा खेळ जगांत सर्वत्र सदैवच चालूं आहे. प्राचीन काळींहि तो होता आणि आजहि चालू आहे. श्री केदारनाथ घोष यांचाहि तोच खेळ चालूं होता, आणि त्यांच्या लहानग्या भाच्याचाहि तोच खेळ चालूं होता. घोष महाशयांना वाटलें कीं भाच्याचा खेळ पोरखेळ आहे. पण आपल्याला स्पष्ट दिसतें कीं केदारनाथांचा खेळहि तितकाच पोरकट होता.

मानमरातब, पदव्या आणि किताब यासाठीं हपापलेले लोकहि हा खेळ नेहमीं खेळत असतात. प्राचीन काळचे राजे लोक जेव्हां अश्वमेघाचा घोडा सोडीत आणि राजसूय यज्ञ करीत तेव्हां हाच खेळ चालूं असे. अिन्द्रपदासाठीं हपापलेले देव, दानव आणि मानव नांवाचाच खेळ खेळत आले आहेत. वरच्यानें खालच्यास हंसावें, त्यानें त्याच्याहून खालीं असलेल्यांना हंसावें असा हा क्रम चालूंच आहे.

नांवाचा खेळ बंद झाला तर कदाचित् सृष्टींतील तीनचतुर्थांश प्रवृत्तीच बंद होतील. घोड्यांच्या शर्यती नांवाचाच खेळ खेळत असतात. धाडसी प्रवासी पहाडांचीं अुत्तुंग शिखरें गांठतात किंवा अुत्तर-ध्रुवापर्यंत जाअून येतात तो देखील नांवाचाच खेळ आहे.

कवींनीं जर नामाप्रमाणें रूपाच्या खेळावर असेंच अेक शब्दचित्र काढलें असतें तर त्यांत सृष्टीचा सर्व अितिहास येअून गेला असता. तत्त्वज्ञानी तर रोजच सांगतात कीं 'नामरूपात्मकम् जगत्'.

आपलें नांव छापलेलें पाहाण्याची हौस कुणाला झाली नाहीं? आम्ही देखील लहानपणीं पुण्यांत असतांना शाळेच्या वाटेवर असलेल्या शिवाजी छापखान्यांतून र क ल ले का अशीं अक्षरें मिळवून आणलीं होतीं आणि दोरीनें बांधून प्रत्येक पुस्तकावर आम्ही तीं छापत असूं. आज वाटतें कीं नांव हातानें लिहिण्यांत कला आणि प्रतिष्ठा अधिक आहे. त्या काळीं यांत्रिक कृतीचें माहात्म्य विशेष होतें. तें अेक वय असतें.

जेव्हां मी माझा पहिला लेख आणि पहिली कविता मासिकाकडे पाठवली आणि त्यांचा स्वीकार झाला नाहीं तेव्हां मला कितीतरी वाआीट वाटलें होतें. तें असो. पण दोन तीन महिन्यांनीं जेव्हां त्याच मासिकांत तरुण होतकरू लेखकांस सूचना म्हणून लेख पाहिला तेव्हां तर वाचण्यापूर्वीं छाती धडधड होअूं लागली. मनानें घेतलें होतें कीं, संपादकानें मला अुद्देशूनच हा लेख लिहिला असावा.

स्वतःचा छापखाना काढून पुस्तकें छापून घ्यावींत आणि स्वतःचें नाट्यगृह बांधून किंवा स्वतःची नाटक कंपनी काढून आपल्या नाटकाचा प्रसार करावा अशी अिच्छा मनांत आली नाहीं ही अीश्वराची आणि द्रव्याभावाची कृपाच समजली पाहिजे! खरें म्हणावयाचें म्हणजे अितकी महत्त्वाकांक्षाच कधीं पेटली नाहीं.

तरीहि लहानपणच्या त्या अुथळ पण भरीव अनुभवामुळें केद्रारनाथ घोषचा किंवा त्याच्या भाच्याचा अुपहास करावा असें मात्र मनांत आलें नाहीं. हें सर्व शब्दचित्र वाचत असतांना स्वतःचींच बाल्यचित्रें पाहात असल्याचा पुनः-प्रत्यय येअून सहानुभूतिच अुत्पन्न झाली.

हा लेख लिहीत असतांना रविबाबूंना कसें वाटलें असेल? अगदीं लहानपणापासून त्यांनीं लेखणी चालविली होती. त्यांना घरींच रंगभूमिहि मिळाली होती. तरीहि अतिबाल्यकाळीं हा सर्व अनुभव त्यांना मिळाला असल्यास नवल नाहीं. म्हणतात ना, सर्वच साहित्य आत्मकथन-पर असतें. केदारनाथ घोष आपल्या भाच्याच्या ठिकाणीं स्वतःला पाहूं शकले नाहींत या गोष्टीकडे कवींनीं वाचकांचें लक्ष खेंचून त्यांना अंतर्मुख होण्याविषयींचा सल्ला दिला आहे.

# भलत्याच स्वर्गांत

## १

माणूस अगदींच रिकामटेकडा होता.

काम असें त्याला कसलेंच नव्हतें, पण हौशी मात्र अनेक प्रकारच्या होत्या.

लहान लहान लाकडी तक्त्यांवर माती पसरून त्यावर तो छोटया छोटया शिंपल्या सजवीत असे. दुरून बघतां वाटे कीं आहे आपलें अेक पुसटसें चित्र आणि त्यांत पक्ष्यांचे थवे; किंवा वेडेंवांकडें शेत नि त्यांत गुरें चरत आहेत; अथवा अुंचसखल डोंगर नि त्याच्या कडेने वाहणारा तो असेल आपला अेखादा झरा नाहींतर पायवाट.

घरच्या लोकांनीं त्याचा तिरस्कार करण्यांत कसलीच कसर ठेवली नव्हतीं.

मधें मधें तो पण विचार करी कीं सोडावा हा सगळा वेडेपणा, पण वेडेपणा मात्र त्याला कांहीं केल्या सोडीना.

## २

अशींहि कांहीं मुलें असतात जीं सबंध वर्षभर अभ्यासाचें नांव कसें तें घेत नाहींत. पण परीक्षेंत मात्र फुकटम् फाकट पास होतात. याचीहि तीच गत झाली.

सबंध जीवन अकाजींच वेचलें गेलें. पण मृत्युनंतर मात्र त्याला सांगण्यांत आलें कीं त्याचें स्वर्गांत जाणें मंजूर झालें आहे.

परंतु स्वर्गाच्या वाटेवर सुद्धा नियति माणसाचा पिच्छा सोडत नसते. देवदूतांनीं 'छाप' वाचण्यांत चूक करून त्याला कामसू लोकांच्या स्वर्गांत पोंचता केलें.

त्या स्वर्गांत सर्वच कांहीं आहे, पण नाहीं काय तें अेक रिकामपण.

अिथले पुरुष म्हणतात, 'अहो, निःश्वास टाकायलासुद्धा वेळ आहे कुठें?' स्त्रिया म्हणत, 'येतें बाअी, कामं आहेत सगळीं पडून.'

सगळेच म्हणतात, 'अहो, वेळ मोलाचा आहे.' पण कोणीच म्हणत नाहीं, 'वेळ अमोल आहे.' 'आतां अधिक नाहीं सहन होत' असें पुटपुटत सगळेच तक्रार करतात. आणि खूप आनंदहि अनुभवतात. '— अुपसतां अुपसतां नाकीं नव आले,' ही फिर्यादच आहे अिथलें संगीत.

या बिचाऱ्याला नव्हती तिथें कुठें मोकळीक, कीं नव्हता बसत त्याचा कुणाशीं मेळ. रस्त्यावरून आपल्याच तालांत चाले आणि कामांत चूर असलेल्यांचा रस्ता मात्र अडवी. अुपरणें अंथरून जरा कुठेंहि तो आरामानें बसूं पाहतो, तोंच त्याच्या कानीं आदळतें कीं, 'तिथें तर शेत आहे — नि पेरणीहि झाली आहे.' असें सारखें त्याला अठून अुठून जावें लागतें, सरून सरून बसावें लागतें.

३

अेक अतिच कामसू मुलगी दररोज स्वर्गांतल्या झऱ्यावर पाणी भरायला येत असे.

रस्त्यावरील तिची चाल म्हणजे जणुं सतारीवरील द्रुततालाची गतच.

लगबगीनें ती आली आणि तिनें आपला अंबाडाहि पुनः बांधला. तरीहि चारदोन बंडखोर बटा तिच्या डोळ्यांतली काळी बाहुली बघण्यासाठीं म्हणून कपाळावर ओणव्या होअून डोकावूं लागल्या.

आपला हा स्वर्गीय बेकार मनुष्य अेका कडेला अुभा होता, चंचल झऱ्याकांठच्या निश्चल तमाल वृक्षाप्रमाणें.

गवाक्षांतून भिक्षुकाला बघून राजकन्येला जशी दया येते, याला बघून त्या मुलीलाहि तशीच दया आली.

'अरेरे, तुमच्या वाट्याला कांहींच काम नाहीं वाटतं?'

निसासा सोडून बेकार म्हणाला, 'काम करावं तर अवसरच नाहीं मला.'

मुलीला त्याचें बोलणें कांहींच अुमगेना. ती म्हणाली, 'हवंय का मग अेखादं काम तुम्हांला मजकडून?'

बेकार म्हणाला, 'होय, तुजकडूनच काम मागून घ्यावं, म्हणून तर मी हा असा अुभा आहे.'

'काय काम देअूं?'

'तूं जसली घागर कडेवर घेअून पाणी भरायला येतेस तसलीच अेखादी मला देशील का?'

'घागर घेअून काय कराल? पाणी भराल?'

'नाहीं. तिच्यावर चित्रें काढीन मी.'

ती मुलगी कंटाळून म्हणाली, 'मला वेळ नाहीं. मी जातें.'

पण बेकारांबरोबर कामसूंनीं टिकाव धरावा तरी कुठवर? रोजच त्या दोघांची त्या झऱ्याकांठीं गांठ पडते आणि त्याच न त्याच गोष्टी रोज होतात, 'तुझ्या कडेवरची अेक घागर दे. तीवर चित्रें काढीन मी.'

हार स्वीकारावी लागली तिला, नि दिली तिनें घागर.

घागरीच्या सभोंवार बेकार चित्रें काढूं लागला, कितीतरी रंगांचीं वेटोळीं, कितीतरी रेघांचीं घरें.

चित्र काढणें संपलें. मुलीनें घागर घेतली. वळून वळून पाहिली, फिरवून फिरवून न्याहाळली आणि मग भुंवअी अुंचावीत म्हणाली, 'काय याचा अर्थ?'

बेकार म्हणाला, 'कांहींच नाहीं याला अर्थ.' घागर घेअून मुलगी घरीं गेली.

सर्वांच्या नजरा चुकवून तिनें ती घागर नाना दिशांनीं, नाना तऱ्हांनीं वळवून फिरवून पाहिली. रात्रीं राहून राहून, अंथरुणांतून अुठून दिवा पेटवून, चुपचाप बसून त्यावरचीं चित्रें ती पाहूं लागली. तिच्या सबंध आयुष्यांत तिनें हेंच पहिलें वहिलें असलें कांहीं पाहिलें कीं ज्याला कसलाच अर्थ नव्हता.

दुसरे दिवशीं ती पुन: जेव्हां त्या झऱ्याकांठीं आली तेव्हां तिच्या पायांच्या तुरुतुरु गतींत तुटकपणा आला होता. तिचे पाय चालतां चालतां विमनस्क होअून विचारांत पडत — अशा विचारांत कीं ज्यांना कसलाच अर्थ नव्हता.

त्या दिवशींसुद्धा तो बेकार मनुष्य तसाच अेका कडेला अुभा होता.

मुलीनें विचारलें, 'काय हवंय ?'

तो म्हणाला, 'तुझ्याकडून आणखी काम हवंय.'

'कसलं काम देअूं ?'

'तुझी हरकत नसेल तर रंगीत सूत गुंफून तुझ्यासाठीं वेणी बांधायची फीत तयार करावी म्हणतों.'

तऱ्हेतऱ्हेच्या रंगांची, तऱ्हेतऱ्हेच्या विणीची फीत तयार झाली. अेव्हांना आतां आरसा हातांत घेअून वेणी बांधतां त्या मुलीचा पुष्कळ वेळ जाअूं लागला. कामें पडून रहायची नि वेळहि निघून जायची.

४

अिकडे बघतां बघतां कामसू स्वर्गाच्या कामामधें मधून मधून फटा पडूं लागल्या. आणि त्या फटा रुदनानें आणि गायनानें भरून निघूं लागल्या.

स्वर्गांतलीं पोक्त मंडळी मोठ्याच चिंतेंत पडली. त्यांनीं सभा बोलावली आणि ते म्हणाले, 'अिथल्या अितिहासांत असें कधीं घडलें नव्हतें.'

स्वर्गीच्या देवदूतानें येअून आपली चूक कबूल केली. तो म्हणाला, 'मी भलत्याच माणसाला भलत्याच स्वर्गांत घेअून आलों.'

त्या भलत्या माणसाला सभेंत आणण्यांत आलें. त्याचें तें रंगीत पागोटें आणि कमरबन्धाचा थाट बघतांच सर्वांना कळून चुकलें कीं चांगलीच चूक घडली खरी. सभापति त्याला म्हणाला, 'तुला आतां पृथ्वीवर परत जायला हवें.'

आपली ती रंगांची झोळी आणि ती कुंचली कमरेला खोवीत सुटकेचा निसासा टाकीत तो म्हणाला, 'मग येतों आतां.'

मुलगी म्हणाली, 'मीहि येतें मग.'

पोक्त सभापति बिचारा बुचकळ्यांत पडला. त्याच्या जीवनांतली अशी ही पहिलीच घटना होती कीं जिला कसलाच अर्थ नव्हता.

## निरूपण — भूलस्वर्ग

रविबाबूंना लहानपणीं घरचे लोक म्हणत, 'हा मुलगा तरंगी आहे. परीक्षेचा अभ्यास करायचा नाहीं, पास होणार नाहीं. जीवनांत विशेष कांहीं करूं शकणार नाहीं. कविता करून जीवन थोडेंच भरतां येअील?' ते विलायतेला गेले आणि लोकांच्या दृष्टीनें हात हलवीत परत आले. घरचें जमीनदारीचें काम त्यांना सोंपविण्यांत आलें. तेथेंहि त्यांनीं विशेष नांव मिळविलें नाहीं.

रविबाबूंविषयीं जेव्हां कुटुंबी लोक निराश झाले होते तेव्हां खुद्द त्यांना काय वाटत असावें? ते मनांत म्हणत असतील — त्यांचीं आणि माझीं मूल्यें निराळीं. त्यांचें म्हणणें खरें आहे, पण मला तें स्पर्श करूं शकत नाहीं. माझी आत्मनिष्ठा मला जेथें नेअील तेथें मी निःशंकपणें जाणार. मला स्वतःला जोंवर माझें जीवन पोकळ वाटत नाहीं तोंवर मला निराश होण्याचें कारण नाहीं.

तें कसेंहि असो. पण लोक ज्यांना रिकामटेकडे म्हणतात, कुचकामाचे म्हणतात; जीं मुलें शाळेंतील नियमांच्या आणि अभ्यासाच्या चौकटींत बसत नाहींत अशा सर्वांविषयींच त्यांना असाधारण सहानुभूति वाटत होती. ते मनांत म्हणत असतील, These people are more sinned against than sinning. त्यांनीं प्रथम जें काम हातीं घेतलें तें स्वच्छंद विहारी शिक्षणाचें; नियम, अभ्यासक्रम आणि परीक्षा यांच्या काचांतून विद्यार्थ्यांना सोडविणारी शिक्षणसंस्था चालवण्याचें. मुलें हीं नेहमीं फुलें, पक्षी, तारे, ढग, ओढे, संगीत आणि ऋतू-ऋतूंचा अुत्सव यांच्या वातावरणांत असावीं अशा आग्रहानें त्यांनीं संस्था चालवली. परिस्थितीनें त्यांना या बाबतींत किती वांकविलें हा प्रश्न गौण आहे. पण त्यांनीं स्वच्छंद विहाराला मान्यता दिली आणि प्रतिष्ठित केलें, याविषयीं शंका नाहीं.

रविबाबूंच्या सर्व कवितांतून आणि साहित्यांतून हा निसर्गसहज स्वभावसिद्ध स्वच्छंद विहार पुरस्कृत झालेला दिसतो. कर्तव्यकर्में आणि कामांचें ढीग याविषयीं ते म्हणतात — जीवन हें खेळासाठीं आहे.

फुलांनंतर जशीं फळें आपोआप, मागोमाग येतात तशीं सर्व कर्में खेळाच्या पाठोपाठ येतील. किंवा त्यांचीच अुपमा वापरावयाची म्हणजे जीवननौका खेळाची जल-क्रीडा करीत असतांना तिच्यामागें पाण्यांत जी लकेर अुमटतें ( wake of the ship ) तींच तुमचीं कर्तव्य-कर्में होत.

स्वाभाविक जीवनाच्या आनंदाला गाणाऱ्या या कवींनीं आपलें स्वतःचें अेक तत्त्वज्ञान तयार केलें आहे. अनेक रूपकांतून, नाटकांतून, काव्यांतून आणि रूपकथांतून त्यांनीं तें तत्त्वज्ञान परोपरीनें व्यक्त केलें आहे. तपस्या हा शब्द त्यांच्या शब्दकोशांत नाहीं. तपस्येंतून जें प्राप्त होतें तेंच जीवनव्यवहारांतून मिळवतां येअील अशी त्यांची श्रद्धा होती. जीवनाला कोंडल्यानें त्यांतून विकृति अुत्पन्न होते आणि विकृतीशी लढण्यासाठीं तपस्येचा हठयोग अमलांत आणण्याची अिच्छा होते. तेव्हां अेका विकृतीला दूर करण्यासाठी दुसरी विकृति वापरण्यापेक्षां विकृतीलाच जीवनांतून समूळ दूर कां करीत नाहीं? असा त्यांचा संस्कृतीला प्रश्न असावासें वाटतें. कसेंहि असो, कर्म-वीर पाश्चात्यांनीं येअून आपल्याला खडबडून जागें केल्यानंतर आणि आपणहि पराजयाच्या लाजेनें त्यांच्या त्या कर्मप्रचुर जीवनदृष्टीला मान्यता दिल्यानंतर त्या संस्कृतीविषयीं शंका प्रदर्शित करणारा हा पहिला तत्त्वज्ञानी आणि कवि आपल्यामधें अुत्पन्न झालेला दिसतो. चीनच्या लिन युटांगनें The Importance of Living या पुस्तकांत देखील पाश्चात्य संस्कृतीच्या आंधळ्या धांवपळीसंबंधानें 'ततः किम्' हा प्रश्न खडा केला आहे.

हा दृष्टिबिंदु समजल्यानंतरच रविबाबूंच्या अनेक कृतींचें रहस्य अुमजून येणें सोपें जातें.

× × ×

कामसू लोकांचा अेक निराळा स्वर्ग होता. त्यांत अेक बेकाम-वादी चुकून जाअून पोंचला. कामसू जगांत कामाला अितकें महत्त्व असतें कीं जीवनाचा विचार करायचेंच कुणाला सुचतहि नाहीं. अशा जीवनांत दांपत्य जीवनाला अवकाश असेल, पण प्रेमजीवनाला प्रति-

ष्ठेचें स्थान नसल्यास आश्चर्य नाहीं. अुपयोगितेपुढें सुंदरतेला स्थान किंवा ध्यान कुठून मिळणार?

कामसू लोकांमधें हा रिकामटेकड्या जाअून पोंचला. सतारीच्या तारेवर धांवणाऱ्या बोटांप्रमाणें त्वरित गतीनें चालणाऱ्या रमणीसमोर हा तमालवृक्षासारखा स्थिर अुभा राहिला. ती कामांत होती, हा 'रिकामांत' होता. यानें तिला कसें वश करावें? याची कसलीच कला तिथें रुजण्यासारखी नव्हती. पण यानें धीर धरला आणि चिकाटीचा आग्रह चालवला. रिकामाच तो. आग्रह धरून बसायला त्याला हरकत नव्हती. रिकामपणाचा प्रथम विजय झाला. त्याला प्रयोजनविहीन — अुपयोगिताशून्य काम करण्याचा अवकाश मिळाला.

रिकामपणाच्या चंचुप्रवेशानंतर अर्थविहीन कलेचा प्रवेश झाला. आकृति आली, रंग आलें, सौंदर्य आलें, गुंतागुंतींतील शोभा आली. कामसू जगाचा ताल बिघडला. निदान कांहीं माणसें बेताल झालीं. न्यायासनासमोर त्यांची चौकशी सुरूं झाली. रिकामपणाला निर्वासन दंड देण्यांत आला, पण कामाच्या जगांतून दूर होणे हा निग्रह आहे कीं अनुग्रह याविषयीच शंका अुत्पन्न झाली आणि कामसू लोकांच्या किल्ल्याला खिंडार पडलें.

रिकामपण, स्वच्छंद, कला आणि — कवींनीं स्पष्ट शब्दांत सांगितलें नसलें तरी – प्रेम, या सर्वांची कामसू जगांत प्राणप्रतिष्ठा झाली! शान्ति, स्थैर्य, व्यवस्था आणि कृतार्थता यांनीं सर्वतोभद्र असलेल्या जगांत रुदन आणि गायन या दोघांनीं प्रवेश केला. पूर्णता गेली, पण मोहकता आली. कृतार्थतेपेक्षांहि विप्रलंभी व्यर्थताच आकर्षक वाटूं लागली.

कवीनें या परिवर्तनाचा प्रत्यक्ष अथवा अुघड पुरस्कार केला नाहीं. पण त्याचा पक्षपात येथें स्पष्ट दिसतो. कदाचित् पुरस्कार करणें कठीणहि गेलें असतें. म्हणूनच कदाचित् येथें कवीनें कांहींहि न सांगतां त्या रिकामटेकड्याचेंच अनुकरण केलें आहे.

× × ×

भुकेलेला मनुष्य फक्त पोट भरण्याची अिच्छा करतो आणि क्षुधेमुळें अन्नाला जी गोडी येते तिच्यांतच संतोष मानतो. पुढें पुढें पोटभर मिळूं लागले म्हणजे तो गोडीसाठीं खातो आणि मग त्याचे चोंचले

वाढतात. स्वादिष्ट पदार्थ पाहूनच तो पसंत करतो. चवदार आणि बेचव असा अन्नांत भेद करतो आणि खवैया बनतो. [जो मनुष्य खूप खातो, फक्त खाण्याचें परिमाण वाढवतो त्याला खादाड म्हणतात. त्याचे पुढें गोडीचा प्रश्न गौण असतो. पुष्कळ खावें, आकंठ खावें आणि मग तें सर्व पचवून पुनः भूक लागेतोंपर्यन्त जर धीर निघत नसेल तर वांती करून, पोट रिकामे करून पुनः ताबडतोब खाण्यास बसावें, असा त्याचा क्रम असतो. याच्या अुलट खवैया खादाड नसतो, पण त्याला चांगलें सुग्रासच हवें असतें. त्यांतील नाजुकपणा त्यानें परमावधीला पोंचविलेला असतो.] असा मनुष्य प्रसंगीं अुपाशी राहील; पण कसेंबसें अन्न निभावून घेणार नाहीं.

जगाच्या व्यवहारांत जोंवर साधनसंपत्तीची अुणीव आहे, आणि जीवनांत समृद्धि वाढली नाहीं तोंपर्यन्त लोकांचें लक्ष अुपयोगितेकडेच विशेष असते. त्या काळांत सौन्दर्याची दृष्टि मुळींच अुघडलेली नसते असें नाहीं. पण तिला प्राधान्य नसतें. अुपयोगिता वाढविण्याच्या दृष्टीनें देखील नीटनेटकेपणा आणावा लागतो आणि अशा रीतीनें अुपयोगिता आणि सुन्दरता यांचा परस्पर मेळहि अुत्तम बसूं शकतो. पण हें विशिष्ट मर्यादेपर्यन्तच शक्य असतें. कांहीं तत्त्वज्ञ म्हणतात कीं जें अुपयोगीतम आहे तेंच सुन्दर होय. अुपयोगितेहून निराळी अशी सुंदरता आम्ही मानतच नाहीं.

अशा लोकांना आपल्या सिद्धान्ताला चिकटून रहावयाचें असेल तर शेवटीं म्हणावें लागतें कीं सुन्दरता हेंहि जीवनांतील अत्यंत आवश्यक अंग असल्यामुळें त्यालाहि आम्ही अुपयोगी ठरवितों आणि अशा रीतीनें सुंदरतेला अुपयोगितेच्या क्षेत्राच्या बाहेर जाअूं देत नाहीं. [असें करणें म्हणजे परकीयांना देखील आम्ही स्वकीय लेखतों असें म्हणून परराज्य देखील स्वराज्याचाच अेक प्रकार आहे असें मानून कृत्रिम संतोष मानण्यासारखें आहे.] पण जेव्हां सुन्दरतेची दृष्टि पूर्णपणें अुघडते तेव्हां ती अुपयोगितेला गौण करून देखील सुंदरतेला पुढें करते, अुपयोगितेविषयीं अनास्थाहि बाळगते आणि शेवटीं अुपयोगिता आणि सुन्दरता यांच्यामध्यें विरोधी द्वैतहि अुत्पन्न होतें. [या दोहोंमधें पूर्ण अद्वैत कधींच स्थापन

होअू शकत नाहीं, कारण सुन्दरता-निरपेक्ष अुपयोगिता नाहींच असें म्हणण्याची कोणाचीच हिंमत नाहीं. ] अुपयोगिता हें ज्याप्रमाणें जीवन-दृष्टया अेक आवश्यक तत्त्व आहे, त्याचप्रमाणें सुन्दरता देखील जीवनाचें अेक आवश्यक स्वतंत्र तत्त्व आहे. शारीरिक पुष्टि, कामांचें सौकर्य, वेळेचा आणि साधनांचा मितव्यय वगैरे तत्त्वें जशीं जीवनाला महत्त्वाचीं आहेत, त्याचप्रमाणें सुभगत्व, संवादित्व, प्रमाणबद्धता, चमत्कृति, नाविन्य, अवकाश आणि चिरपरिचय अित्यादि सुदरतेचीं घटक तत्त्वेंहि जीवनाच्या पोषणाला, वृद्धीला आणि तृप्तीला आवश्यक आहेत.

अुपयोगिता जीवनाला हितकर आहे आणि सुंदरता नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. दोन्ही आवश्यक आणि पोषक आहेत. आणि तरीहि दोघांचें नेहमीं जुळतेंच असें नाहीं. यामुळें दोघांमध्यें सामंजस्य अुत्पन्न करणें, दोघांना परस्पर पोषक करणें ही जीवनकला व्यक्तीला आणि समाजाला साधावी लागते.

ज्याला संपूर्ण जीवनशास्त्र असें म्हणतां येअील अशी गोष्ट म्हणजे अध्यात्मशास्त्र होय. या अध्यात्माचा पक्षपात अुपयोगितेकडे विशेष आहे का सुदरतेकडे? हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. पण तो या रूपांत सोडवतां यावयाचा नाहीं. या दोहोंपैकीं कोणतें तत्त्व अध्यात्माला विघातक आहे असा प्रश्न विचारतां येअील. अुपयोगिता वाढतां वाढतां बाह्य साधनें, अुपकरणें यांचाच जेव्हां ढीग गोळा होतो तेव्हां आत्म्याची शक्ति क्षीण होते आणि म्हणून अध्यात्म त्याचा विरोध करते. आत्म्याचा खरा आनंद स्वातंत्र्यांत म्हणजे स्वावलंबनांत आहे. शरीराला परावलंबन आवडत असो. आत्मा मात्र तशा वातावरणांत गुदमरून जातो. अुलटपक्षीं सौंदर्यहि, आत्म्याच्या अुपयोगीं असून देखील त्याची मात्रा जर वाढली, तर मोहाला कारणीभूत होतें. आत्म्याचा आनंद ज्ञानांत म्हणजे जागरूकतेंत आहे. शरीराला अज्ञान, प्रमाद यांचें वातावरण मानवतें पण आत्मा मात्र त्यांनीं गुदमरून जातो. म्हणून अध्यात्म नेहमींच प्रमाद आणि मोह यांचा विरोध करतें.

अध्यात्माच्या दृष्टीनें अुपयोगिता आणि सुंदरता या दोहोंच्या अुपासनेमध्यें जर पुरेसा संयम असला तरच आरोग्य सांभाळलें जातें.

जीवनरसिकता देखील म्हणते कीं माझी शक्ति आणि माझा आनंद प्रमाणबद्धता आणि संयम यांच्या वातावरणांतच चरम कोटीला पोंचत असतात.

स्वच्छंदी अुपयोगिता आणि स्वच्छंदी सुन्दरता नेहमींच अध्यात्माला भितात. आणि स्वतःचें नुकसान करून घेतात. अध्यात्म दोघांचा पक्षपातरहित स्नेही आहे. त्याच्या देखरेखीखालींच या दोहोंमधील विरोधी द्वैत नष्ट होअील आणि दोहोंमध्यें सुभग सामंजस्य प्रस्थापित होअूं शकेल.

× × ×

वरील सर्व विवेचन असें मानून करण्यांत आलें आहे कीं आवश्यक पुरुषार्थ साधल्याबरोबर व्यक्तीच्या आणि समाजाच्या जीवनांत आवश्यक समृद्धि अुत्पन्न होणार आहे. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. स्वार्थापुढें प्रेम दबलें गेल्यामुळें, खरें हित कशांत आहे याविषयींचें ज्ञान वासनांच्या बंडखोर हावरेपणामुळें दबलें गेल्यामुळें आणि मनुष्यजातीनें आपपरभाव निष्कारण वाढविल्यामुळें प्रकृतीची सर्व कृपा असूनहि समस्त मानवजातीला समृद्धि लाधली नाहीं. अशा स्थितींत जीवनव्यवहाराची दृष्टीच प्रधान धरून या प्रश्नाचा विचार करावा लागतो.

समाजहितैषी लोक दुःखनिवारणाच्याच विवंचनेंत पडले असल्यामुळें त्यांना प्रथम अुपयोगितेकडेच पहावें लागतें. याच्या अुलट जे लोक सौन्दर्याचे अुपासक असतात त्यांना सामाजिक जबाबदारीच्या बाबतींत औदासिन्याचा स्वीकार करावा लागतो. यामुळें सौन्दर्योपासकांची प्रतिष्ठा त्यांच्या जमातींत कितीहि असली तरीहि समाजामधें बेताचीच असावी लागते. जो समाज विलासितेच्या कह्यांत सांपडला आहे त्या समाजांत मात्र सौंदर्याची दृष्टि विकृत होअून धंदेवाअीक सौंदर्योपासकांची आर्थिक आणि सामाजिक प्रतिष्ठा खूपच वाढविली जाते.

ज्या अुदाहरणानें हें विवेचन सुरू केलें त्याच अुदाहरणानें जर समाप्ति करावयाची असली तर सिनेमास्टार्सचा दाखला न देतां पेशव्यांच्या वेळचें अेक सूत्र येथें नमूद करतां येअील. 'पायलीची खाअील क्षिप्रा, पालखी द्यावी तया विप्रा' असा दुसऱ्या बाजीरावाच्या पेशवाअींत नियम होता असें मोरोपंतांनीं लिहून ठेवलें आहे.

## सीमोल्लंघन

### १

राजपुत्र निघाला, स्वतःचें राज्य सोडून, सात सात राजांचें राज्य ओलांडून, ज्या देशीं कुणाहि राजाचें राज्य नाहीं, त्या देशाकडे.

ही ज्या काळची गोष्ट, त्या काळाला आरंभहि नाहीं आणि शेवटहि नाहीं!

शहरीं खेडोपाडीं सर्वत्र सर्व लोक हाटबाजार करतात, घरदार चालवतात, भांडणें करतात; पण आमचा हा चिरकाळाचा राजपुत्र मात्र आपलें राज्य सोडून सोडून चालता होतो.

कां बरें जातो?

आडांतलें पाणी आडांतच रहातें, तळ्यां-सरोवरांचें पाणी तळ्यां-सरोवरांतच मुकाट्यानें पडून रहातें. पण गिरिशिखरांवरचें पाणी गिरिशिखरांवर टिकत नाहीं. मेघांचें पाणी मेघांचें बंधन मानत नाहीं. राजपुत्राला त्या चिमुकल्या राज्यामध्यें कोण अडवून ठेवणार? तेपान्तराच्या कल्पनेनें तो परतत नाहीं; सात समुद्र आणि तेरा नद्या देखील पार करून जातो.

मनुष्य वारंवार मूल होअून जन्माला येतो आणि दरवेळीं नव्यानें ही जुनी कहाणी अैकतो.

संध्यादीपाचा प्रकाश स्थिरावतो आणि मुलें गुपचूप गालावर हात ठेअून कल्पना करतात, कीं आपणच तो राजपुत्र आहोंत.

तेपान्तर मैदान संपतें न संपतें तों समोर समुद्र अुभा ठाकतो. त्याच्या मधोमध आहे अेक द्वीप. तेथें दैत्यपुरींत राजकन्या बंदिनी आहे.

जगांत अितर सर्व लोक पैशाच्या मागें लागतात, नांव मिळ-विण्याची धडपड करतात, आराम शोधतात; आणि आमचा हा राजपुत्र मात्र दैत्यपुरींतून राजकन्येला सोडविण्यासाठीं निघाला आहे. वादळ अुठलें, नौका मिळाली नाहीं. तरी तो आपला रस्ता शोधतोच आहे.

हीच मनुष्याच्या जीवनांतली जशी प्रारंभींची तशीच सर्वशेषींची नवल-कथा होय. पृथ्वीवर जो जो नवीन जन्माला येतो, त्यानें आजी-बाओीजवळून हा चिरकालीन संदेश जाणलाच पाहिजे —— राजकन्या बंदिनी आहे, समुद्र दुर्गम आहे, दैत्य दुर्जय आहे आणि हा लहानगा मानव मात्र अेकाकी सज्ज होअून पण करतो आहे कीं बन्दिनीला सोडवून आणीनच आणीन.

बाहेर वनाच्या अन्धःकारांत पाअूस पडत आहे. रातकिडे किर्र करीत आहेत. आणि लहानगा मुलगा गप्प बसून गालावर हात ठेअून कल्पना करतो, 'मला दैत्यपुरी गांठलीच पाहिजे.'

२

समोर आला अफाट समुद्र —— स्वप्नांचे तरंग अुठविणाऱ्या निळ्याभोर निद्रेप्रमाणें. तेथें राजपुत्र घोड्यावरून खालीं अुतरला.

पण त्यानें जमिनीवर पाय टेकला मात्र, अितक्यांत हें काय झालें? कुणा जादुगाराची जादू ही!

अरे, हें तर शहर. ट्राम चालत आहेत. ऑफिसकडे जाणाऱ्या गाड्यांच्या गर्दीमुळें रस्ता दुर्गम झाला आहे. ताडाच्या पानाच्या पिपुड्या विकणारा गल्लीच्या तोंडावरील अुघड्या बंब मुलांना वेड लावून पिंपाणी वाजवीत वाजवीत चालला आहे.

आणि कसला हा राजपुत्राचा वेश नि कसली ही चाल. अंगीं बटनें अुघडीं असलेला शर्ट, धोतर चांगलेसें नेटकें नाहीं आणि पायीं जीर्ण जोडा. खेड्यांतला मुलगा शहरांत शिकत आहे, शिकवण्या करून जीविका चालवीत आहे.

आणि राजकन्या कुठे आहे?

त्याच्या रहात्या घराशेजारींच.

सोनचांफ्याप्रमाणें कांहीं तिचा रंग नाहीं. तिच्या हास्यांतून माणिकमोती गळत नाहींत. आकाशांतील ताऱ्यांबरोबर तिची तुलना होअूं शकत नाहीं. तुलनाच करायची तर नव्या पावसानंतर अुगवलेल्या गवतामधून जीं निनांवीं फुलें अुमलतात त्यांचेशीं करतां येअील.

आओवेगळी ही मुलगी बापाची लाडकी होती. बाप होता गरीब. कुस्थळीं मुलीच्या सोयरिकीला त्याचें मन घेओना. म्हणून मुलीचें वय वाढलें होतें. लोकांनीं नाकें मुरडायला सुरुवात केली होती.

बापहि वारला आणि मुलगी आपल्या काकाकडे रहावयास आली होती.

स्थळ मिळालें. त्यांचेपाशीं पैसाहि मुबलक, वयहि तसेंच मुबलक. आणि नात-नातवंडांनाहि तोटा नाहीं. त्यांच्या दबदब्यालाहि सीमा नाहीं.

काका म्हणाले, 'पोरीचें नशीब थोर.'

अशा स्थितींत हळदीच्या दिवशीं मुलगी दिसेना आणि शेजारचा मुलगाहि सांपडेना.

बातमी लागली कीं त्यांनीं चोरून लग्न केलें. त्यांची जात जरी जुळत नव्हती तरी जुळत होतें त्याचें मन. सर्वांनीं नावें ठेवलीं.

लक्षाधिपतीनें आपल्या अिष्ट देवतेला सोन्याचें सिंहासन अर्पण करण्याचा नवस केला आणि म्हणाला, 'पाहूं आतां या पोराला कोण वांचवतो.'

मुलाला न्यायालयासमोर अुभे करण्यांत आलें. विचक्षण वकील मंडळींनीं आणि अनुभवी साक्षीनीं देवतेच्या कृपेनें होत्याचें नव्हतें करून सोडलें. हेंहि अेक मोठें आश्चर्यंच.

त्याच दिवशीं अिष्टदेवतेच्या चरणीं कोंकरांची जोडी बळी दिली गेली. वाजंत्रीं वाजलीं नि सगळी मंडळी खुश झाली. म्हणाली, 'कलिकाळ खरा, पण धर्म अजूनहि जागृत आहे.'

३

त्यानंतर पुष्कळ पुष्कळ घडलें. जेलमधून तो मुलगा सुटून आला. पण त्याचा तो दीर्घपथ कांहीं केल्या संपेना. तेपान्तराच्या मैदानापेक्षांहि तो दीर्घ आणि संगी-हीन आहे. कितीदां तरी त्याला अंधारांत अैकू येते, 'हाँअू–माँअू–खाँअू, अल्लाच माणूस गटकाँवू.' मनुष्याला गिळण्याची चारी बाजूनें अितकी चटक!

रस्त्याला अंत नाहीं पण चालायला तर अंत आहे. अेके दिवशीं त्या सीमेवर येअून तो थांबला.

त्या दिवशीं त्याचा संभाळ करणारें कुणीच नव्हतें. अुशाशीं मात्र अेक दयामय देवता जागत होती, ती म्हणजे यम.

यमानें आपली सोन्याची कांडी फिरवली मात्र, हा काय चमत्कार! शहर गेलें अुडून आणि स्वप्न गेलें विरून.

घटकेंत पुनः तोच राजपुत्र दिसूं लागला. त्याच्या कपाळीं असीम कालाचा राजतिलक. दैत्यपुरीचा दरवाजा तो फोडणार, आणि राजकन्येच्या बेड्या तो तोडणार.

युगोयुगीं मुलें आपल्या आअीच्या मांडीवर बसून सर्व जाणतात — तोच गृहत्यागी मनुष्य तेपान्तराचें मैदान ओलांडून कुठेंतरी चालला आहे. त्याच्या समोर साती समुद्राच्या लाटा गर्जना करीत आहेत.

अितिहासीं त्याचें चमत्कारिक रूप तर अितिहासाच्या पैलतीरं त्याचें अेकमेव रूप — तें राजपुत्राचें.

## निरूपण : राजपुत्तुर

अेकानें महाभारतावर अेक ग्रंथ लिहिला आहे. त्याचें नांव त्यानें ठेवलें आहे, 'Permanent History of Bharatvarsha'. त्याचा अुद्देश कसाहि असो, त्यानें भूमिका कोणतीहि मांडली असो, या नांवामध्यें स्वारस्य आहे खरें.

कोणत्याहि देशाचा आणि कोणत्याहि काळाचा अितिहास घ्या. नांवें निराळीं, प्रसंग निराळे, संस्था निराळ्या, साधनें निराळीं; पण मनुष्यस्वभाव येथून तेथून सारखाच. त्याच्या जीवनांतील प्रेरकतत्त्वें सारखींच. आपल्या देशांतील लोकांना साध्या अितिहासाच्या अध्ययनाचा कंटाळा. म्हणून त्यांनीं सर्व अितिहासांतून सनातन तत्त्वें शोधून काढून, जेथें देशहि नाहीं आणि कालहि नाहीं असा सार्वभौम, सार्वकालिक अथवा देशकालातीत अितिहास लिहून ठेवला. आपल्याच देशांतील लोकांनी नव्हे तर सर्व जगांतील विद्वत्ता-विमुख शहाण्या लोकांनीं असा-च सनातन अितिहास लिहून ठेवला आहे आणि त्याचा लोककथा आणि रूपककथांच्या रूपानें प्रचार चालविला आहे. राजपुत्राची रविबाबूंनीं दिलेली गोष्ट त्या अितिहासापैकींच आहे. राजपुत्राला स्वतःच्या राज्याची गोडी नाहीं. त्याला स्वतःला स्वतःच्या राज्यांत कोंडून घ्यावयाचें नाही. घोड्यावर बसून तो निघाला आहे. कोठें? जिथें रस्ता संपतो, त्याच्या पलीकडे; समुद्र गर्जना करतो, त्याच्याहि पलीकडे. मानवीकोटीला अशक्य असा पराक्रम त्याला करावयाचा आहे. दुष्टाच्या हातीं सांपडलेल्या राजकन्येला सोडवण्याची त्यानें प्रतिज्ञा केली आहे. त्याला कोणी सांगितलें कीं, वाटेंत पुष्कळ संकटें येतील. तो हंसून म्हणतो, 'यांत तुम्ही विशेष तें काय सांगितलें? मी तर वाटेंत अेक नव्हे तर अनेक मरणें मरावीं लागतील हें समजूनच त्याची तयारी करून निघालों आहें. त्यावांचून का राजकन्या बंधनमुक्त होणार आहे? मी सनातन काळाचा सार्वभौम राजपुत्र आहें. आजवर अनेक मरणें मेलों, पुढेंहि मरेन. पण माझें अंगीकृत कार्य सोडणार नाहीं.'

ज्याच्या ज्याच्या मध्यें असा हा निर्धार असेल तो राजपुत्रच होय. मग तो कलकत्त्याच्या चाळींतील, टय़ूशन करून पोट भरणारा विद्यार्थी असो किंवा स्वकीयांना चार घास जास्ती मिळवून देण्यासाठीं झगडणारा मिलमजूर असो. हे सर्व राजपुत्रच आहेत. जगाचा सामाजिक, आर्थिक, धार्मिक आणि आध्यात्मिक अितिहास जुन्या, सोप्या, साध्याभोळ्या पण मार्मिक रूपक-कथामध्यें भरून ठेवलेला आहे. लहानपणीं मुलें गालावर हात ठेवून वडील पिढीच्या तोंडून या रूपक-कथा अैकतात आणि सनातन संग्राम चालविण्याची दीक्षा घेतात. आपला सनातन राजपुत्र अनेक वेळां मेला आहे; पण पुनः पुनः या रूपक-कथांच्या अनेक मुग्ध हृदयांत तो जन्म घेतो. त्याचा हा जन्म रूपक-कथांतून होत असल्यामुळें खरोखर तोच अयोनिसंभव आहे. लोकसाहित्याच्या पोटीं त्याचा जन्म आहे. मुग्ध हृदयांत तो लहानाचा मोठा होतो. कल्पना-शक्तीकडून त्याला पोषण मिळतें. दृढसंकल्परूपी रसायनाचें सेवन करून तो वज्रकाय बनतो आणि मरणें टाळून नव्हे तर अेकामागून अेक असंख्य मरणें मरून तो अमर होतो.

या लहानशा कथा निबंधांत रविबाबूंनीं अितिहासाचा सनातन अितिहास ग्रथित केला आहे आणि राजपुत्र चिरंजीव कसा आहे तें दाखवून दिलें आहे.

आपल्या पुराणांतील 'अश्वत्थामा बलिर्व्यासो हनुमांश्च बिभीषणः। कृपः परशुरामश्च' या सात 'चिरजीविनः' चा असाच सनातन अितिहास कोण लिहून देअील ?

# आवडतीची आवड

आवडतीला मरणाचे वेध लागले जणुं.

तिचा प्राण घाबरा घुबरा झाला, तिला कश्शा कश्शांतहि गोडी वाटेना. वैद्य मात्रा घेअून आला. मधांत अुगाळून म्हणाला, 'घ्या.' तिनें फणकाऱ्यानें औषध फेकून दिलें.

राजाच्या कानावर बातमी गेली. राजा लगबगीनें राजसभा सोडून आला. जवळ बसून म्हणाला, 'तुला काय झालंय? काय हवंय?'

ती रुसव्यानें म्हणाली, 'तुम्ही सगळेच जा कसे अिथून. फक्त माझ्या सअीला तेवढी पाठवून द्या.'

सअी आली. राणी तिचा हात धरून म्हणाली, 'बस सये, असं आहे —'

सअी म्हणाली, 'नीट फोड करून सांगा गडे.'

आवडती म्हणाली, 'माझ्या सातचौकी महालाच्या अेका बाजूचे तीन चौक होते नावडतीचे. त्यांचे झाले दोन, नंतर राहिला काय तो अेकच. शेवटीं राजवाड्यालाच तिला पारखें व्हावें लागलें.

"त्यानंतर नावडतीचा पार विसर पडला होता मला.

"त्यानंतरचा दोलयात्रेचा* (रासलीलेचा) तो दिवस. त्या दिवशीं मी मयूर-पंखी नावेंत बसून निघालें होतें नाट-मंदिराला. पुढें लोक होते नि मागें लश्कर; अुजवीला वाजत होती सनअी नि डावीला झडत होता चौघडा.

अशा वेळीं रस्त्यालगत नदीकांठीं घाटाच्या वरच्या बाजूला दिसलें अेक कुडाचें घर, चंपकाच्या छायेखालीं. त्याच्या कुंपणावर फुलली होती अपराजितेची वेल, दारासमोर घातली होती शंखचक्राची रांगोळी. मी माझ्या छत्रधारिणीला विचारलें, 'अहा, हें घर ग कुणाचं?' ती म्हणाली, 'नावडतीचं.'

---

* दोलयात्रा — श्रीकृष्णाचा झुलन अुत्सव-दिन. (फाल्गुन पौर्णिमा)

त्यानंतर घरीं परत येअून संध्याकाळ झाली तरी तशीच बसून राहिलें. दिवासुद्धां केला नाहीं, नि तोंडाला खीळ घालून बसलें.

राजा येअून म्हणाला, 'तुला काय झालंय? काय हवंय?'

मी म्हणालें, 'या महालांत रहायचं नाही मला.'

राजा म्हणाला, 'मग मोठा थोरला चुनेगच्ची प्रासाद बांधून देतों तुला. त्याला हस्तिदंताच्या भिंती करवीन, शंखांच्या भुकीनें दुधाच्या फेसासारखी पांढरी शुभ्र फरशी बनवीन, मोत्यांच्या शिंपल्यांनीं तिच्या कांठाकांठानें कमळांची वेलबुट्टी काढवीन.'

मी म्हणालें, 'मला तीव्र अिच्छा झालीय कीं, आपल्या बाहेरच्या बागेच्या अेका कडेला कुडाचें घर बांधून त्यांत रहावें.'

राजा म्हणाला, 'वाः छान. मग त्यांत काय मोठंस?' कुडाचें घर तयार झालें. तें घर म्हणजे जणूं वनांतून खुडून आणलेलें फूल. तयार झालें न झालें तोंच कसें कोमेजून गेलें. रहायला गेलें खरी पण त्याची लाजच वाटूं लागली.

त्यानंतरचा स्नानयात्रेच्या* पर्वाचा दिवस होता तो. नदीवर स्नानाला गेलें होतें. बरोबर होत्या अेकशेसात सख्या. सरळ प्रवाहांतच पालखी अुतरली; स्नान अुरकलें.

रस्त्यानें परततांना पालखीचा दरवाजा कांहींसा किलकिला करून पाहिलें — "आहा, कुणाच्या घरची ग सून ही? निर्माल्यांतलें फूल जशी."

हातांत होत्या शुभ्र शंखांच्या पाटल्या, नि नेसूला होतें लाल किनारीचें लुगडें. स्नानानंतर पाण्याची घागर भरून नेत होती ती. सकाळचें अून तिच्या ओलेत्या केसांवर आणि भिजलेल्या घागरीवर लकाकत होतें.

छत्रधारिणीला विचारलें, 'कोण ग असेल ही बाअी? कुण्या देवमंदिरांतली तपस्विनी?'

छत्रधारिणी हंसून म्हणाली, 'ओळखायला आलं नाहीं ना? नावडती नव्हे का ही!'

---

* स्नानयात्रा — ज्येष्ठ पौर्णिमेला जगन्नाथाचा स्नानोत्सव.

त्यानंतर घरीं परत येअून तशीच अेकटी बसून राहिलें, नि तोंडाला खीळ घालून बसलें.

राजा येअून म्हणाला, 'तुला काय झालंय? काय हवंय?

मी म्हणालें, 'मला फार फार अिच्छा झालीय कीं, रोज सकाळीं नदींत न्हाअून मातीच्या घड्यांतून पाणी भरून आणावं बकुल-वीथीच्या वाटेनें.'

राजा म्हणाला, 'वा: छान. त्यांत ग काय मोठंसं!'

रस्तोरस्तीं पहारे बसले. लोकांची येजा थांबली.

हातांत शंखाच्या पाटल्या घातल्या आणि लाल किनारीचें लुगडें नेसलें. नदींत न्हाअून घागर भरून आणली. दारापाशीं येतांच मनांतील व्यथेनें घागर आदळून फोडून टाकली. मनांतले मांडे मनांतच राहिले. लाज मात्र पदरीं पडली.

त्यानंतर रासयात्रेचा* दिवस अुगवला.

मधुवनांत चांदण्या रात्रीं शामियाने अुभारले गेले. रात्रभर नृत्य चाललें, गायन चाललें.

दुसरे दिवशीं सकाळीं हत्तीवर हौदा चढला. पडद्याच्या आंत बसून घरीं परतत होतें. सहज नजर गेली, तो वनपथावरून कुणीसें जातांना आढळलें. कोवळें होतें त्याचें वय. त्याच्या केसाच्या जुड्यांत होत्या वनफुलांच्या माळा अन् हातांत परडी. परडीत कमळकंदाचीं फुलें, वनांतील फळें, शेतांतली भाजी.

छत्रधारिणीला विचारलें, 'कुणा भाग्यवंतीचा ग मुलगा हा वाट अुजळीत चालला आहे?'

छत्रधारिणी म्हणाली, 'विसरलां वाटतं? नावडतीचा ना हा मुलगा! आपल्या आअीसाठीं नेतोय कमळकंदाचीं फुलें, वनांतलीं फळें, शेतांतली भाजी.'

त्यानंतर घरीं परत येअून अेकटीच बसून राहिलें. तोंडाला ख़ीळ घालून बसल्यें.

---

* रासयात्रा — रासलीला अुत्सव दिन (कार्तिक पौर्णिमा)

राजा येऊन म्हणाला, 'तुला काय झालंय, काय हवंय?'

मी म्हणालें, 'मला फार फार अिच्छा झालीय कीं रोज खावींत कमळकंदाचीं फुलें, वनांतली फळें, शेतांतली भाजी. माझ्या मुलानं स्वतः जाऊन आणावीत हीं.'

राजा म्हणाला. 'वाः छान. त्यांत ग काय मोठंसं?

सोन्याच्या पलंगावर बसलें होतें, मुलगा परडी घेऊन आला. त्याचें सर्वांग घामानें डबडबलेलें, चेहऱ्यावर राग. परडी तशीच पडून राहिली, लाजेनें मात्र मेल्यें मी.

त्यानंतर काय झालंय कुणास ठाऊक. आपली अेकटीच बसून रहातें, नि तोंडाला खीळ घालून असतें. राजा रोज येतो आणि विचारतो, 'तुला काय झालंय, काय हवंय?'

आवडती राणी होऊनहि काय हवंय अेवढं मात्र लाजेनं कुणापुढं बोलायची सोय नाहीं. म्हणून तुला बोलावलंय सये. माझ्या मनींचं सांगतें तुझ्या कानांत, 'त्या नावडतीचं दुःख हवंय ग मला.'

सखी गालावर हात ठेऊन म्हणाली, 'पण कशासाठीं?'

आवडती राणी म्हणाली, 'तिच्या त्या वेळूच्या बांसरींतून सूर निघूं शकले; पण माझी सोन्याची बांसरी मी मिरवीत हिंडलें, जपत हिंडलें, पण वाजवूं मात्र शकलें नाहीं.'

## निरूपण — सुयोरानीर साध

लाडांत वाढलेल्या लोकांसारखे दुर्दैवी कोणी नसतील. स्वार्थानें मनुष्य आंधळा होतो आणि पोचट होतो, हें जीवन-सत्य लाडावलेल्या लोकांच्या ध्यानांत येत नाहीं. जीवनाचें खरें स्वरूप, त्याचा विस्तार, त्याची खोली आणि जीवनाचें प्रयोजन हें ज्यांना समजेनासें होतें त्यांचें जीवन व्यर्थ होणार नाहीं तर दुसरें काय होणार? सुयोराणी सुंदर असेल, नाजुक असेल, रसिक असेल आणि प्रेमळहि असेल. पण लाडानें ती बिघडली. तिला वाटलें सगळें जग आपल्याभोंवतीं फिरलें पाहिजे. आपलें असें कर्तव्य कांहींच नाहीं. आपण फक्त असल्यानेंच जगाला कृतार्थ करीत आहोंत. सर्व राज्य राजाच्या पायाखालीं होतें आणि तो राजा तिच्या चरणारविंदीं मिलिंदायमान होता.

तिच्या मनाला मत्सरानें घेरलें. मत्सर नेहमींच वाओीट असतो. पण लाडावलेल्या आंधळ्या, अुथळ आणि पोचट लोकांचा तर तो बळीच घेतो.

सुयोराणीला अेक दुयोराणी होती. बिचारी नम्र, सहिष्णु आणि तपस्विनी असली पाहिजे. पण ती दुयोराणी होती, सवत होती, अेवढीच गोष्ट सुयोराणीला दुःखी करायला पुरेशी होती. राजमहालाच्या सात चौकांपैकीं चार सुयोराणीचें, तीन दुयोराणीचें. ती वडील असूनहि तिची अशी अवहेलना. पण सवतीमत्सर अेवढ्यानें संतुष्ट झाला नाहीं. तीन चौकांचे दोन चौक झाले. दोहोंपैकीं अेकच तिला अुरला. पुढें तेथूनहि तिची अुचलबांगडी झाली. बिचारी आपल्या मुलाला घेअून अेका झोंपडींत राहूं लागली. तेथेंहि ती आपल्या सद्गुणानें राणीसारखी शोभूं लागली. निदान आपल्या संतोषवृत्तीनें तिनें आपलें दैन्य झांकून टाकलें.

मनुष्याचा स्वभावच आहे — निदान मत्सराचा — कीं जें आपल्यापाशीं आहे, जें आपलें आहे तें तुच्छ समजावयाचें. जें दुसऱ्याचें आहे तें रहस्यमय, सुन्दर आणि स्पृहणीय आहे असें मानावयाचें.

सुयोराणीला दुयोराणीच्या झोंपडीचा हेवा वाटला. तिला वाटलें आपलें जीवन कसें अुथळ आणि क्षुद्र दिसतें. दुयोराणीचें गांभीर्य — तिचा घरंदाजपणा आणि तेज त्या झोंपडीमुळेंच आहे. या बाबतींत दुयोराणीचें अनुकरण करण्याचें तिनें ठरवलें. रुसावें म्हणजे मिळतें हें अेकच सूत्र तिला ठाअूक होतें. तिचा कल्पतरु म्हणजे राजा. स्मरण करतांच ज्याप्रमाणें सिद्धपुरुष मदतीला धांवून येतात त्याचप्रमाणें रुसल्याबरोबर, अबोला दाखवल्याबरोबर राजा धावून येतो आणि हवें तें देतो, हा तिचा सनातन अनुभव होता. नाजुकशी झोंपडी तयार झाली. सुयोराणी त्यांत राहूं लागली. पण तिला दिसून आलें की अनुकरणानें सर्व कांहीं मिळवलें तरी त्यांत आत्मा धरला जात नाहीं. तिचें हें नवें जीवन हास्यास्पद झालें, लज्जास्पद झालें. तिला तें पोकळ वाटूं लागलें. ती अस्वस्थ झाली.

पुनः असाच प्रसंग आला. पुनः तिनें अनुकरण करण्याचा, दुयोराणीहून कमी न पडण्याचा विचार केला, आग्रह धरला. दुयोराणीला मातृभक्त मुलगा होता. तो रानांतून वन्यफळें आणून आअीला देत असे. सुयोराणीला याचाहि हेवा वाटूं लागला. तिनें हट्ट धरला. हवी तशी झोंपडी बांधविणें शक्य होतें, आपल्याहि मुलाला राजाकडून हुकूम करवून फळें आणविणें शक्य होतें. पण मुलाला मातृभक्त कसें करतां येअील? मुलगा अुन्हामुळें घामाघूम झाला होता, अेवढेंच नव्हें तर रागानें लालहि झाला होता. शेवटीं सुयोराणीच्या लक्षांत आलें — दुःखं सत्यं, सुखं माया। दुःखं जन्तोः परं धनम्॥ दुयोराणीचें जें धन होतें आणि ज्यामुळेंच ती तपःपूत आणि जीवनसमृद्ध झाली होती तें होतें तिचें दुःख. तसलें दुःख आपल्याला मिळावें असा तिच्या मनानें हट्ट घेतला. पण तें दुःख कसें मिळावें? सुयोराणी तर रहावयाचें आहे. दुयोराणीवर सरसाअी मिळवावयाची आहे. आणि दुःखी झाल्यावांचून ती मिळावयाची नाहीं. याला काय करावें? सखी सल्ला ती काय देणार? राजाजवळ मागावें काय?

खरोखर मत्सर आंधळा असतो, आणि जो कोणी मत्सराला आश्रय देतो त्याचा शेवटीं तो बळी घेतो. लाडावलेल्या लोकांचीं जीवनमूल्येंच हरवलेलीं असतात. सुयोखणीला जगणें असह्य झालें.

अनुकरण हें नेहमीं टीपकागदासारखें असतें. टीपकागदावर अक्षरें अुमटतात पण तीं अुलटीं होतात. त्यांची शाअी फुटते, सगळींच्या सगळीं वाचतां येत नाहींत आणि मुळांतलें सौंदर्य असें कांहीं विकृत होतें कीं तें पाहून हसावें कीं रडावें हेंच समजत नाहीं.

अनुकरण म्हणजे मरण हें जरी खरें असलें तरी तें पूर्ण-सत्य नाहीं. अनुकृति म्हणजे मृति. मृति तर खरीच पण त्याहून मोठी दुर्दशा म्हणजे ती विकृति बनते.

# विदूषक

१

काञ्चीचा राजा कर्नाटकाच्या मोहिमेवर निघाला. तो विजयी झाला. चंदनानें, हस्तिदंतानें, आणि सोन्यामाणकानें हत्ती लादले गेले.

स्वदेशी परततांना वाटेंत बलेश्वरीच्या मंदिरांत बळीच्या रक्ताचे पाट वाहवून राजानें पूजा साजरी केली.

पूजा करून परततांना राजाचे अंगांत होतें रक्त-वस्त्र, गळ्यांत जास्वंदीची माळा, कपाळीं रक्तचंदनाचा टिळा, आणि बरोबर होते केवळ मंत्री आणि विदूषक.

अेके ठिकाणीं रस्त्याच्या कडेला आमराअींत मुलें खेळत असलेलीं त्यांना दिसलीं.

राजा आपल्या दोन्ही सोबत्यांना म्हणाला, 'पाहूं या, कसला खेळ खेळताहेत तें.'

२

मुलें दोन वेगळाल्या रांगांत बाहुल्या सजवून लुटुपुटीची लढाअी खेळत होतीं.

राजानें विचारलें, 'कोणा बरोबर कोणाचें युद्ध चाललंय ?'

तीं म्हणालीं, 'कर्नाटकाशीं काञ्चीचें.'

राजानें विचारलें, 'कोणाचा विजय, कोणाची हार ?'

मुलें छाती फुलवून म्हणालीं, 'कर्नाटकाचा विजय, काञ्चीची हार.'

मंत्र्याचा चेहरा गंभीर झाला. राजाचे डोळे लालबुंद झाले. विदूषक आपला 'हो हो' करीत हंसत सुटला.

३

राजा आपल्या सैन्यासह परत निघाला तेव्हांहि मुलांचा खेळ चालूंच होता.

राजानें हुकूम सोडला, ‘अेकेका कारट्याला बांधा झाडाशीं आणि झोडपा वेतांनीं.’

गांवांतून त्यांचे आओीबाप धावत आले. म्हणाले, ‘पोरंच बिचारीं तीं, आपलीं खेळ खेळत होती. त्यांना क्षमा असावी.’

राजा सेनापतीला हांक मारून म्हणाला, ‘या अुभ्या गांवाला धडा द्या कीं जेणेंकरून कांञ्चीच्या राजाची त्यांना जन्मभर आठवण रहावी.’

अेवढें बोलून तो शिबिराला निघून गेला.

४

संध्याकाळीं सेनापति राजासमोर येअून अुभा राहिला. लवून मुजरा करीत म्हणाला, ‘महाराज, कोल्ह्याकुत्र्यांशिवाय अितर कुणाचाहि शब्द या संबंध गांवांतून अैकायला मिळायचा नाहीं.’

मंत्री म्हणाला, ‘महाराजांची मान-प्रतिष्ठा राखली गेली.’

पुरोहित म्हणाला, ‘विश्वेश्वरीचीच महाराजांवर कृपा आहे म्हणायची.’

विदूषक म्हणाला, ‘महाराज, आतां मला रजा द्यावी.’

राजानें विचारलें, ‘कां’?

विदूषक म्हणाला, ‘मला नाहीं येत मारतां कीं नाहीं येत कापतां. येतें काय तें देवाच्या दयेनें फक्त हसतां. महाराजांच्या दरबारांत राहिलों तर माझें हें हंसणेंहि मी विसरून जायचा!’

# घोडा

सृष्टीच्या अुत्पत्तीचें कार्य जवळ जवळ संपून विश्रामाची घांट वाजूं म्हणते आहे, अशा वेळीं ब्रह्मदेवांच्या डोक्यांत अेका नवीन कल्पनेचा अुदय झाला.

कोठाऱ्याला बोलावून ते म्हणाले, 'अरे भांडारी, माझ्या कारखान्यांतल्या खोलींत थोडीं थोडीं पंचभूतें आणून ठेव. आणखी अेक नवीन प्राणी अुत्पन्न करण्याचा मानस आहे.'

कोठारी हात जोडून म्हणाला, 'पितामह, आपण जेव्हां अुत्साहांत येअून हत्ती निर्माण केला, तिमि मासा तयार केला, अजगर सर्प बनवले, सिंह व्याघ्र बनवले तेव्हां हिशेबाकडे तुमचें मुळीं लक्षच नव्हतें. पंचभूतांपैकीं जीं जीं भारदस्त आणि भरभक्कम अशीं भूतें होतीं तीं सर्वच जवळ जवळ संपुष्टांत आलीं आहेत. पृथ्वी, आप्, तेज यांनीं तर तळच गांठला आहे. राहतां राहिलें काय तें मरुत् आणि व्योम. तें मात्र हवें तेवढें वापरा.'

चतुर्मुख आपल्या चारहि जोडी मिशांवर कांहीं क्षण ताव देत म्हणाले, 'ठीक ठीक, कोठारांत जें असेल तेंच घेअून ये. पहातां येअील.'

या खेपेचा प्राणी घडतांना त्यांनीं पृथ्वी, आप, तेज यांचा खर्च हात राखूनच केला. त्याला त्यांनीं नाहीं दिलीं शिंगें कीं नाहीं दिलीं नखें. आणि दांत दिले तेहि असे कीं त्यांनीं चावतां यावें पण चावा घेतां मात्र येअूं नये. तेजाच्या पात्रांतलें थोडेसेंच तेज त्यांनीं वापरलें, त्यामुळें हा प्राणी युद्ध-क्षेत्रांत थोडाफार अुपयोगी पडण्यासारखा झाला खरा, पण त्याच्यांत युद्धाची हौस मात्र मुळींच राहिली नाहीं. या प्राण्यालाच घोडा म्हणतात. हा अंडीं घालीत नसला तरी लोकांमध्यें याच्या अंड्यांचा चांगलाच बोलबाला आहे. [बंगालींत घोडार-डिम म्हणजे घोड्याचें अंडें. 'शश-शृंग', 'ख-पुष्प' किंवा 'वंध्या-पुत्र' या प्रमाणें या शब्दाचा अुपयोग होतो.] म्हणून याला द्विज म्हटलें तरी चालेल.

तें कसेंहि असो. पण सृष्टिकर्त्यांनीं याच्या बनावटींत मरुत् आणि व्योम मात्र खूप ठासून दिलें. परिणाम असा झाला कीं या प्राण्याचें मन सोळा आणे गेलें मुक्तीकडे. हा हवेच्याहि पुढें धावूं मागतो आणि असीम आकाशाच्या पार जाण्याचा पण करून बसतो. अितर सगळे प्राणी सकारण धावतात; पण हा मात्र धावतो अकारण; जणुं त्याला स्वतःला आपल्या स्वतःपासूनच पळून जाण्याची आत्यंतिक आवड असावी. तो कुणाचें कांहीं लुबाडूं अिच्छित नाहीं कीं कुणाला मारूं पहात नाहीं; त्याला फक्त धावावयाचें असतें. पळतां पळतां मत्त व्हावें, चूर व्हावें, सूं व्हावें, त्यानंतर 'गायब' होअून जावें असा असतो त्याचा मानस! ज्ञानी म्हणतात, प्रकृतींत मरुत् व्योम जेव्हां आप् तेजाला जुमानीतनासे होतात तेव्हां असेंच व्हावयाचें.

ब्रह्मदेव खूप खुष झाले. त्यांनीं रहाण्यासाठीं म्हणून कुणाला दिलें होतें वन तर कुणाला गुहा. पण दौडीची मौज पाहतां यावी म्हणून याला दिलें मोकळें मैदान.

या मैदानाच्या कडेलाच राही मनुष्य. लूटफाट करून तो जें कांहीं गोळा करी त्याचें अेक भलें मोठें ओझेंच होअून बसें आणि म्हणूनच घोड्याला मैदानांत अुगीचच धावाधाव करतांना त्यानें जेव्हां पाहिलें तेव्हां त्याला वाटलें कीं कसेंहि करून याला धरून बांधून ठेवूं शकलों तर बाजार करण्याची आपली चांगलीच सोय होअील.

फांसा घालून पकडलें त्यानें घोड्याला अेक दिवस आणि जोरानें कसली त्याच्या पाठीवर जीन. तोंडांत दिली कांटेरी लगाम. मानेवर तो ओढी चाबूक, बरगडींत मारी बुटाची लोखंडी टाच, त्याखेरीज अितरहि ठोकपिटी होत्याच.

मैदानांत मोकळा सोडला तर हातचा जाअील म्हणून घोड्याच्या चारी बाजूला त्यानें भिंत अुभारली. वाघाला दिलेलें वन वनच राहिलें. सिंहाची गुफा गुफाच राहिली; कुणीच काढून घेअूं शकला नाहीं कीं बदल करूं शकला नाहीं. पण घोड्याचें मोकळें मैदान मात्र होअून बसलें तबेला. या प्राण्यांत मरुत् व्योमांनीं मुक्ततेची हांव चांगलीच

ठासठासून भरली. पण बंधनापासून मात्र कांहीं ते त्याला वाचवूं शकले नाहींत.

जेव्हां असह्य झालें तेव्हां घोडयानें त्याच्या भिंतीवरच दुगाण्या झाडायला सुरुवात केली. त्यामुळें त्याचे पाय जितके जखमी झाले तितकी भिंत कांहीं झाली नाहीं, तरीपण चुना-माती ढासळून भिंतीचें सौंदर्य मात्र नाश पावूं लागलें खरें.

मनुष्याला या गोष्टीची चांगलीच चीड आली. म्हणाला, 'याचें नांव कृतघ्नता. दाणापाणी खायला देतों, लठ्ठ पगाराचा मोतद्दार अष्टौप्रहर याच्या सेवेंत सारखा राबतो, पण बेटयाचें मन कसें तें मिळतच नाहीं.'

मन मिळवण्यासाठीं म्हणून मोतद्दारानें अुठल्या बसल्या असे कांहीं दंडे चालवलें कीं पुनः त्याच्या लाथा कांहीं चालल्या नाहींत. मनुष्य आपल्या शेजाऱ्यांपाजाऱ्यांना अुद्देशून म्हणायचा, 'माझ्या या वाहनासारखें निष्ठावान भक्त असें दुसरें वाहनच नाहीं.'

ते तारीफ करीत म्हणत, 'खरंच हो, अगदीं कसा पाण्यासारखा शांत, तुमच्या धर्मासारखाच थंड.'

अेक परीनें पहातां त्याला मुळांतच अुपयुक्त असे दांत नव्हते, नव्हतीं नखें कीं नव्हतीं शिंगें. आणि त्यांतच आतां भिंतीवर किंवा तिच्या अभावीं शून्यांत लाथा झाडणेंहि बंद झालें. तेव्हां मन मोकळें करण्यासाठीं म्हणून आकाशाकडे डोकें अुंचावून तो 'हीं हीं हीं' खिकाळूं लागला. यामुळें त्या माणसाची झोंपमोड होअी आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांनाहि वाटायचें कीं याचा आवाज कांहीं तितकासा भक्ति-गद्गद् वाटत नाहीं. तोंड बंद करण्याच्या अनेक युक्त्या आणि साधनें अस्तित्वांत आलीं. पण श्वास बंद केल्याशिवाय कांहीं तोंड पुरतें बंद होत नसतें. म्हणून त्याचा रुद्ध आवाज मुमूर्षूच्या अुचक्यांप्रमाणें मधून मधून निघतच असे.

अेके दिवशीं अखेरीस तो आवाज ब्रह्मदेवांच्या कानीं पोंचलाच. त्यांनीं ध्यान विसर्जन करून अेकदां पृथ्वीवरील मैदानाकडे पाहिलें, पण तेथें त्यांना घोडयाचा मागमूसहि लागेना.

पितामहांनीं यमाला बोलावून म्हटलें, 'खात्रीनें तुझाच हा पराक्रम. तूंच माझ्या घोड्याला अुचललें असावेंस.'

यम म्हणाला, 'सृष्टिकर्त्या, तुम्हांला आपला नेहमीं माझाच संशय. जरा मनुष्याच्या वस्तीकडें तर बघा.'

ब्रह्मदेवांनीं बघितलें. लहानशीच जागा, नि चारी बाजूंस भिंती. त्यांत अुभा अुभा क्षीण स्वरानें घोडा 'हीं ही हीं हीं' खिकाळत आहे.

त्यांचें हृदय विचलित झालें. ते माणसाला म्हणाले, 'माझ्या या प्राण्याला मुक्त न केलेंस तर मी याला वाघाप्रमाणें नखें आणि दांत बनवून देअीन. आणि मग तो तुझ्या कसल्याच कामीं यायचा नाहीं.'

मनुष्य म्हणाला, 'छिः छिः, अशानें तर हिंसेला अुत्तेजनच दिल्यासारखें होअील. पण कांहींहि म्हणा, पितामह, तुमचा हा प्राणी मुळीं मुक्तीच्या योग्यतेचाच नाहीं. त्याच्या हिताकरतां म्हणूनच तर मी पुष्कळ खर्च करून हा तबेला तयार करविला आहे. अगदीं खासा तबेला.'

ब्रह्मा हट्टाला पेटून म्हणाले, 'त्याला सोडून द्यायलाच हवा.'

मनुष्य म्हणाला, 'ठीक, देतो सोडून. पण साता दिसांच्या मुदतीवर. आणि मग जर म्हणाल, तुमच्या मैदानापेक्षां माझा हा तबेला त्याच्या वाट्याला अधिक अुपयोगी नाहीं तर मी नाक घासायला तयार आहें.'

माणसानें केलें काय, घोड्याला तर सोडला त्यानें मोकळा, पण त्याचे पुढचे दोन पाय दोरीनें चांगलेच आवळून बांधले. तेव्हां घोडा अशी कांहीं विचित्र चाल चालूं लागला कीं त्या चालीपेक्षां बेडकाची चाल सुद्धा अधिक सुन्दर वाटावी.

बिचारे ब्रह्मा रहातात दूर स्वर्गांत. तेथून त्यांना घोड्याची चाल तेवढी दिसे, पण त्याच्या गुडघ्यांचें बंधन मात्र दिसत नसे. ते आपल्या या सुंदरकृतिची अशी हिजड्यासारखी चाल बघून लाजेनें लाल झाले. म्हणाले, 'चूक झाली खरी.'

मनुष्य हात जोडून म्हणाला, 'आतां याला घेअून मी काय करूं? आपल्या ब्रह्मलोकीं मैदान असेल तर तेथेंच देतों त्याला रवाना करून.'

ब्रह्मा व्याकूळ होअून म्हणाले, 'जा, जा. परत घेअून जा याला तुझ्या त्या तबेल्यांतच.'

मनुष्य म्हणाला, 'आदिदेव, मनुष्याच्या वाट्याला हा भलताच भार होअील हो.'

ब्रह्मा म्हणाले, 'यांतच तर तुम्हां मनुष्यांचें मनुष्यत्व आहे.'

* * *

[या रेखाचित्राप्रमाणेंच दुसरें अेक रेखाचित्र याच्या पुष्कळ पूर्वी रविबाबूंनीं लिहिलें आहे. त्यांत घोड्यानें माणसाला मदतीला बोलावून आपल्या कामासाठीं त्याला स्वतःच्या पाठीवर बसवून घेतलें. मग काम पुरें झालें तरी मनुष्य घोड्याच्या पाठीवरून अुतरेना असा भाव आला आहे.

त्या शब्दचित्राचें गुजराती भाषांतर 'मधपुड्यां'त* प्रसिद्ध झालें आहे. आणि तीच गोष्ट पुढें चालवून मीहि अेक रेखाचित्र भविष्यपुराण म्हणून तेथें दिलें आहे.]

---

* 'मधपूडो' गुजराती प्रकाशन. प्रकाशक: नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद – १४.

## निरूपण — घोडा

प्रस्तुत शब्दचित्रांत मनुष्यजातीच्या अितिहासांतील नित्य परिचित प्रसंग दिला आहे. आशिया-आफ्रिका खंडांतील राष्ट्रांना तर तो चांगलाच भोवला आहे. घोड्याला कुरणांतून धरून आणून तबेल्यांत बांधून टाकला आणि मग हा मोकळा रहायच्या योग्यतेचाच नाहीं असें मनुष्यानें ठरवून टाकलें. अितकेंच नव्हें तर थोडीशी युक्ति लढवून सप्रमाण सिद्धहि करून दाखविलें. या गोष्टीचें रहस्य काय हें आपल्या लोकांना फोड करून सांगण्याची जरूरी नाहीं. या गोष्टींत बोध आहे अेवढें समजतांच प्रत्येक वाचक तो बोध सहज काढून घेअू शकेल.

घोडा युद्धोपयोगी प्राणी आहे. पण लढाअू प्राणी नाहीं; कुरणामधें स्वच्छंद विहार करण्यासाठी अुत्पन्न झालेला प्राणी मोकळा रहाण्याच्या योग्यतेचाच नाहीं असें ज्या माणसानें सिद्ध केलें त्याच्या चातुर्याची बलिहारीच होय.

घोड्याचे किंवा गाढवाचे पुढचें दोन पाय बांधून त्यांना मोकळे सोडतात तेव्हां त्यांच्या गतीला जें हास्यास्पद रूप येतें त्याची तुलना मंडुक-प्लुतीशीं करून कवींनीं आपल्या निरीक्षणाची आणि विनोदीवृत्तीची कमाल केली आहे. आणि शेवटीं ब्रह्मदेवाला चकवल्यानंतर मनुष्य जेव्हां म्हणतो कीं 'हे आदिदेव, मनुष्याच्या वाट्याला हा अेक मोठाच विषम भार आला आहे' तेव्हां तर पाश्चात्य लोकांच्या White Man's Burden ची ताबडतोब आठवण होते.

घोड्याला मार मारून सरळ केल्यानंतर घोड्याच्या मनुष्यभक्तीची तारीफ करणें, घोड्याचा स्वभाव तुमच्या धर्माप्रमाणेंच थंड आहे अशी आसपासच्या लोकांनीं साक्ष देणें हें देखील आपल्या नेहमीच्या परिचयाचेंच आहे.

हातपाय बांधतां येतील, पण मुस्कटदाबी करणें सोपें नाहीं, हीहि गोष्ट बंगाली लेखणींतून अुतरली असल्यामुळें विशेष ध्यान खेंचते.

चिडून जाअून कडू कडू लिहिण्यापेक्षां गोडपणें असलीं रेखाचित्रें रेखाटणें अत्यंत परिणामकारक असतें आणि त्यायोगें साहित्याची श्रीवृद्धि तर होतेच.

# कर्त्या पुरुषाचें भूत

## १

म्हाताऱ्या कर्त्या पुरुषाच्या मरणवेळीं देशभरचे सर्वच लोक म्हणाले, ‘आपल्या मागं आमचं कसं होअील ? ’

हें अैकून त्यांनाहि वाअीट वाटलें, ‘खरंच, माझ्यामागं यांना कोण शांत ठेवील ? ’

पण मरण थोडेंच टळत असतें ? तेव्हां प्रभु कृपावंत होअून म्हणाले, ‘नको काळजी. बेटा भूत होअूनच यांचे मानगुटीवर बसो. माणसाला मृत्यु आहे. भूताला तोहि नाहीं. ’

## २

देशभरचे लोक अगदीं निश्चिंत झाले.

कारण, भविष्य माना कीं आल्याच त्याच्या चिंता. भूताला माना कीं चिंताच नकोत कसल्या. सगळ्या बिचाऱ्या जाअून पडतात भूताच्या डोअीवर. तशांत भूताला नाहीं डोकें म्हणून डोकेदुखीहि नाहीं त्याला कोणाकरितां.

तरी स्वभावदोषामुळें जे स्वतःच्या चिंता स्वतःच वाहूं जातात त्यांचे भूताकडून चांगलेच कान खेंचले जातात.

त्या ‘कानखेची’ नाहीं येत टाळतां कीं नाहीं येत त्यांचेपासून पळ काढतां. त्यांच्याविरुद्ध फिर्यादहि चालत नाहीं कीं त्यांचेविषयीं न्यायहि मागतां येत नाहीं.

देशभरचे लोक भूतग्रस्त होअून डोळे मिटून चालतात. देशाचे तत्त्वज्ञानी म्हणाले, ‘हें डोळे मिटून चालणेंच जगाचें खरोखरीचें — आदिम चालणें होय. यालाच म्हणतां येअील अदृष्टाच्या चालीनें चालणें. सृष्टींतील सर्व-प्रथम चक्षु-रहित कीटाणु हीच चाल चालत; तृणामधून, वृक्षामधून याच चालीचा अिशारा चालू आहे. ’

हें विधान अैकून भूतग्रस्त देश आपलें आदिम आभिजात्य अनुभवूं लागला. त्यांतच त्याला खूप आनंद वाटूं लागला.

भूताचा पेशवा, भुताटक्यांच्या तुरुंगाचा दरोगा आहे. या तुरुंगाच्या भिंती डोळ्यांना दिसत नाहींत, म्हणूनच कांहीं केल्या लक्षांत येत नाहीं कीं, या भिंताडांना खिंडार पाडून कोणत्या अुपायानें बाहेर सटकणें शक्य आहे.

या जेलखान्यांत जी घाणी अेकसारखी फिरवावी लागते, तींतून अेक छटाकहि तेल निघत नाहीं, किं जें बाजारांत विकलें जाअील. निघून निघून निघतें काय तें मनुष्याचें तेज (-स्विता). हें तेज निघून गेलें म्हणजें मनुष्य कसा अगदीं शांत होतो. त्यामुळें भूताच्या राजवटींत आणखी कांहीं — अन्न, वा वस्त्र, वा स्वास्थ्य — राहो वा न राहो शान्ति मात्र रहाते.

केवढी ही शान्ति — याचा दृष्टान्तच द्यावयाचा म्हणजे, अितर सर्व देशांत भूतांकडून अतिरेक झाला कीं लोक अस्थिर होअून पंचाक्षऱ्याचा शोध करतात; पण येथें तीहि पंचाअीत नाहीं. कारण पंचाक्षऱ्यालाच भूतानें सर्वाआधीं पछाडलें आहे.

३

असेच दिवस निघून गेले असते आणि भूतशासनतंत्राबाबत कोणाच्याच मनीं कसलीच आशंका जागली नसती. चिरकाळपर्यन्त गर्वहि वहातां आला असता कीं यांचें भविष्य पाळीव मेंढरा प्रमाणें भूताच्या खुंटाला बांधलेलें आहे. तें भविष्य ब्या-हि करीत नाहीं कीं म्या-हि करीत नाहीं. गुपचुप आपलें पडून असतें मातीवर. जणूं कायमचीच माती.

केवळ अेका अत्यंत क्षुल्लक कारणामुळेंच थोडासा घोटाळा झाला. तो म्हणजे, पृथ्वीवर अन्य देशांना भूतानें पछाडलेलें नव्हतें. म्हणून त्या सर्व देशीं ज्या घाण्या चालतात, त्यांतून जें तेल निघतें, तें त्यांच्या भविष्याच्या रथचक्रांना चालतीं ठेवण्याच्या कामीं येतें; — हृदयाचें रक्त पिळून भूताच्या खर्परामध्यें ओतण्यासाठीं नव्हें. म्हणूनच तिथलीं माणसें अेकदम गार झालीं नाहींत. तीं भयंकर जागरुक आहेत.

अिकडे स्वर्गीय शान्तींत भूताच्या राज्यभर 'नीज लागली बाळासी, शान्ति आडोशी प्राडोशीं.'

हें बाळाच्या वाट्याला आरामाचें, तसेंच बालकाच्या पालकांसाठींहि आरामाचें; आणि आडोशी–पाडोशींची गोष्ट तर सांगितलीच आहे.

पण 'बार्गि* (डाकू) आले देशीं!'

नाहींतर छन्द मिळावा कसा? अितिहासाचे चरणच लंगडे रहाते ना! देशांतले जे जे म्हणून शिरोमणि चूडामणि होते, सर्वांनाच विचारण्यांत आलें, 'असें घडलेंच कसें?'

ते अेक-वाक्यानें, शेंड्या झटकून म्हणाले, 'हा भूताचा दोष नव्हे, भूतग्रस्त देशाचा दोष नव्हे; दोष काय तो अेकमात्र डाकूंचाच. डाकूंनीं यावेंच काय म्हणून?'

अैकून सर्वच ओरडले, 'खरें आहे, खरें आहे.' आणि त्यांना खूपच हायसें वाटलें.

दोष कुणाचाहि असो, घराच्या मागील दारीं, आसपास घिरट्या घालतो भूताचा शिपुर्डा; आणि सदरेच्या समोरील मार्गीं, घाटीं-वाटीं गस्त घालीत आहे अ-भूताचा शिपुर्डा. गृहस्थ माणसानें घरांत रहावें तर तेंहि अेक संकटच आणि बाहेर पडायची तर मुळीं सोयच नाहीं. अेकीकडून अेक ओरडतो, 'सारा दे;' तर दुसरीकडून दुसरा आरडतो, 'कर दे.'

आतां प्रश्न दत्त म्हणून अुभा ठाकला आहे कीं, 'सारा द्यावा तरी कुठून?'

---

* नागपूरच्या भोसल्यांचें मराठा सैन्य बंगालवर वारंवार छापे घालीत असे. त्या भयानें कलकत्त्याजवळ अिंग्रजांनीं अेक खंदक खणला होता, ज्याला 'मराठा डिच' म्हणत. त्याकाळीं लोकांनीं मराठा बारगिरांची अशी दहशत घेतली होती कीं मुलाला निजवतांना 'तो पहा बागुलबुवा आला' असें म्हणण्याअैवजीं 'बर्गी अेलो देशे' असें म्हणत. बारगिराचें बंगालींत 'बोर्गी' झालें आहे.

अितके दिवस अेकसारखे अुत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम चारी बाजूंनीं नाना जातींच्या पांखरांनीं थव्याथव्यांनीं येअून सारेंच धान्य फस्त करून टाकलें तेव्हां कुणालाच शुद्ध नव्हती. जगांत जे जे शुद्धीवर होते त्यांच्या वाऱ्यालाहि हे अुभे रहात नसत. प्रायश्चित करावें लागतें ना! पण ते मात्र यांच्याशीं चांगलींच लगट करतात आणि वर प्रायश्चितहि करीत नाहींत. शिरोमणींचा चूडामणींचा गट पोथ्या अुघडून वदतो कीं, 'बेशुद्ध जे तेच पवित्र होत. जे शुद्धीवर आहेत तेच अशुचि होत. म्हणून शुद्धीवर असलेल्यां प्रति अुदासीन रहा.' **प्रबुद्धमिव सुप्तः ।**

तें सगळें खरें, पण हा प्रश्न कांहीं अुधळून लावतां येत नाहीं की 'सारा द्यावा तरी कुठून?'

स्मशानावरून मसाणावरून अुठलेल्या वावटळींतून 'ही ही' करीत या प्रश्नाचें अुत्तर येतें: 'आब्रू देअून, अिज्जत देअून, अिमान देअून, हृदयाचें रक्त देअून.'

प्रश्नमात्राची अशी खोड असते कीं, जेव्हां ते येतात तेव्हां अेकटे येत नसतात. म्हणून आणखी अेक प्रश्न अुद्भवतो, 'भूताचें शासनच काय म्हणून अन्तकाळपर्यंत चालावें?'

हें अैकून अंगाअी गाणाऱ्या जाखाअी मावश्या, जोखाअी आत्या आणि मावसआत्यांचा कंपू कानावर हात ठेवून म्हणतो, 'शिव शिव! असला प्रश्न बापजन्मीं अैकला नव्हता हो. असें झालें तर आमची ती सनातन झोप, ती आदिमतम, सकल जागरणांच्याहि प्राचीनतम झोप, त्या झोपेची हो काय वाट!'

प्रश्नकरी विचारतो, 'हें सर्व तर समजलों. परंतु आधुनिकतम अशा ह्या पाखरांच्या थव्यांचें आणि अुपस्थिततम या डाकूंच्या टोळक्यांचें करावें तरी काय?'

मावश्या आत्या म्हणतात, 'पाखरांच्या थव्यांना कृष्णनाम सुनवूं तसेंच डाकूंच्या टोळक्यांनाहि.'

तरुण रक्त अुसळून, अर्वाचीन अुद्धत होअून म्हणालें, 'काय वाटेल तें करूं पण भूताला पिटाळूं.'

भूताचा कारभारी डोळे वटारून म्हणतो, 'चूप, अजून घाणी कांहीं थांबली नाहीं.'

हें अैकून देशाचे तरुण निस्तब्ध होतात आणि नंतर कूस बदलून झोंपीं जातात.

मुद्द्याची गोष्ट ही कीं म्हातारे कर्तेबोवा जिवंतहि नाहींत अथवा मेलेलेहि नाहींत. भूत होअून बसले आहेत. देशाला ते हलवूनहि सोडीत नाहींत कीं सोडूनहि जात नाहींत.

देशांतील चार दोन माणसें — जीं दिवसा पेशव्याच्या भयानें ब्रहि काढीत नाहींत — तींच मध्यरात्रीं हात जोडून म्हणतात, 'कर्ते महाराज, अजूनहि सोडून जायची वेळ झाली नाहीं का?'

कर्तेबोवा म्हणाले, 'अरे वेडयांनों, मला धरणें कसलें नि सोडणें कसलें. तुम्ही सोडलें कीं मी सुटलोंच.'

ते म्हणतात, 'पण भीति वाटते हो, कर्ते महाराज.'

कर्ता म्हणाला, 'तिथंच तर वसतें भूत.'

## निरूपण — कर्तार भूत

पूर्वजांनीं जी परिपाठी घालून दिली आहे ती कशी मोडावी, पूर्वज शहाणे नव्हते काय? असें म्हणून जुन्या रूढीला चिकटून रहाणारे आपले लोक वरील गोष्ट सहज समजूं शकतील.

स्वराज्याच्या चळवळीच्या दिवसांत अेका पस्तीस चाळीस वर्षाच्या तरुणाला चळवळींत भाग घेण्यासाठी मी समजावत होतों. अितक्यांत त्याचा वृद्ध पिता येअून मला म्हणूं लागला, 'काय सांगायचें तें मला सांगा. या लहान पोराला काय सांगता?' मी नम्रपणानें म्हटलें, 'आपल्या चिरंजिवांना दोन मुलें झालीं आहेत. ते कांहीं अगदीच पोर नाहींत. त्यांना देशाविषयींचें कर्तव्य समजावयास नको काय?'

म्हातारा चिडून म्हणाला, 'नाहीं. मी जिवंत असेपर्यंत घरांतील कर्ता पुरुष मी आहें, सर्वांनीं माझ्या सांगण्याप्रमाणें चालावयाचें आहे. मी आहें तोंवर विचार करण्याचा अधिकारहि माझ्या मुलाला नाहीं.'

'तर मग आम्ही देवाजवळ काय प्रार्थना करावी?' मी थोडेसें त्रासून आणि थोडेसें मिस्किलपणानें विचारलें.

माझ्या प्रश्नाचें सनातनी बिनतोड अुत्तर रविबाबूंच्या वरील गोष्टींत आहे.

प्राचीन काळच्या स्मृतिकारांनीं सर्व कांहीं गोष्टी कायमच्या ठरवून टाकल्या आहेत. आपण घालून दिलेल्या व्यवस्थेच्या रूपानें आपले सर्व पूर्वज आपल्या मानगुटीवर बसले आहेत. मानव स्वभावांतील ढिलेपणामुळें जुनी व्यवस्था खिळखिळी होअील ती होवो, बाहेरून आलेल्या परदेशी लोकांचा पुरुषार्थ जे फेरफार जबरदस्तीनें घडवून आणील ते येवोत, पण आपले लोक आपण होअून कांहीं विचार करणार नाहींत. आणि परिवर्तन तर मुळींच करणार नाहींत.

भूतकाळची भुताटकी सुरळीतपणें नांदत असतां परदेशी लोकांचे बारगीर हल्ला चढवूं लागले आणि 'खाजना', खंडणीचा खजाना

अथवा कर मागूं लागले. तेव्हां पंचाअीत येअून पडली कीं 'खाजना दिबो किसे?' 'बुलबुलिते धान खेये छे............धान फुरोलो, पान फुरोलो खाजनार अुपाय कि।' याचें अुत्तर वावटळीनें दिलेंच आहे, 'आब्रू देअून, अिज्जत देअून, अिमान देअून, हृदयाचें रक्त देअून.'

आपल्या भूतपरायण समाजव्यवस्थेमुळें आपण कितीतरी पिढ्या पारतंत्र्यांत काढल्या. आतां कुठें आपण स्वतंत्र झालों आहोंत. गांधींनीं आपल्याला सांगितलें, आपण अिंग्रजांच्या पकडींत नसून आपणच त्यांना धरून ठेवलें आहे. आपण सोडतांच ते सुटले.

मानगुटीवरचें अेक भूत आतां दूर झालें. आतां आपण सामाजिक रूढि, जातिजातींतील अुच्चनीच भाव आणि आर्थिक असमानता यांचीं भूतें सोडून द्यावयाचीं आहेत.

# पोपटपंचीची कुळकथा

१

अेक होता पक्षी. तो होता अगदींच अडाणी. तो गाणें गाअी, शास्त्र वांचीना. अुडया मारी, भराऱ्या मारी; जाणीना कायदे-कानून कशाशीं खातात तें.

. राजा म्हणाला, 'असला पक्षी अगदीं कुचकामाचा. शिवाय वनांतलीं फळें फस्त करून राजपेठेंतल्या फळबाजाराला नुकसान पोंचवतो.'

मंत्र्याला बोलावून सांगितलें, 'द्या या पक्ष्याला शिक्षण.'

२

पक्ष्याला शिक्षण देण्याचें काम राजाच्या भाच्यावर येअून पडलें.

पंडितांनीं (रॉयल कमिशनमध्यें) बसून चांगलाच खल केला. प्रश्न असा होता कीं, 'अुक्त जीवाच्या अज्ञानाचें कारण काय?'

निर्णय झाला कीं, मामुली काटया-कुटक्यांचें घरटें पक्षी बांधतात, म्हणून त्यांत फारशी विद्या मावत नाहीं. अतअेव सर्वांत अगत्याची गोष्ट म्हणजे चांगलासा पिंजरा बनवायला हवा.

राजपंडित दक्षिणा घेअून आनंदी मनानें घरीं परतले.

३

सोनार बसला सोन्याचा पिंजरा घडवायला. पिंजरा असा कांहीं अप्रतिम झाला कीं, तो पहायला देशविदेशांतले लोक लोटले. कुणी म्हणाले, 'शिक्षणाची अगदीं हद्द झाली हो.' कुणी म्हणाले, 'शिक्षण होवो वा न होवो. पिंजरा तर झाला. पक्षी भाग्यवान खरा.'

सोनाराला थैल्या भरून भरून बक्षीस मिळालें. खुश होअून ताबडतोब त्यानें पाय काढला घराकडे.

पंडित बसले पक्ष्याला विद्या शिकवायला. तपकीर नाकांत कोंबीत पंडित म्हणाले, 'चार दोन पोथ्यांनीं भागणारं काम नव्हे हें.'

तेव्हां भाच्यानें ग्रंथलेखकांना पाचारण केलें. त्यांनीं पोथ्यांच्या नकला आणि नकलांच्या नकला करून पोथ्यांचा पर्वत रचला. जो बघे तो म्हणें, 'शाबास, विद्येचा कडेलोट झाला!'

लेखकांच्या लवाजम्याला पारितोषिकें लाभलीं; गाडे भरभरून त्यांनीं तेव्हांच्या तेव्हां घराकडे धूम ठोकली. मध्यान्हीची विवंचना आतां त्यांना अुरली नाहीं.

या मूल्यवान पिंजऱ्याच्या खबरदारीची भाचे साहेबांनीं हद्द केली. डागडुजीला, मरम्मतीला अगदी खंड नव्हता. त्याशिवाय झाडलोट, घासपुस, पॉलिश वगैरेंची धामधूम पाहून सर्वच म्हणूं लागले, 'अुन्नति होतेय खरी.' भरपूर लोक लागले या कामापायीं आणि त्याहूनहि भरपूर भरणा करण्यांत आला त्यांचेवर देखरेख ठेवणारांचा.

महिन्याकाठी ओंजळ भरभरून मिळणाऱ्या पगारानें त्यांनीं आपल्या पेटयाहि भरून काढल्या.

ते आणि त्यांचे मामेभाअू, चुलतभाअू, मावसभाअू मोठमोठया अट्टालिकांतून गाद्यागिर्द्या घालून विराजले.

४

जगांमध्यें अितर अुणिवा अगणित आहेत पण निंदकांना मात्र तोटा नाहीं. ते म्हणाले, 'पिंजऱ्याची अुन्नति होतेय खरीं, पण पक्ष्याची वास्तपुस्त कुणीच ठेवीत नाहीं.'

गोष्ट राजाचे कानीं गेली. त्यांनीं भाचेसाहेबांना बोलावून विचारलें, 'हें काय अैकतों मी?'

भाचेसाहेब म्हणाले, 'सत्य जाणायचेंच असेल तर बोलवा सोनारांना, पंडितांना, लेखकांना; बोलवा त्यांना जे डागडुजी – मरम्मत करतात आणि मरम्मतीची देखरेख करीत फिरतात त्यांनाहि. निंदकांना गिळायला मिळत नाहीं म्हणूनच असल्या हलक्या गोष्टी बोलतात ते.'

जबाब अैकून राजेसाहेबांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला आणि लगेच भाचेबोवांच्या गळयांत सोन्याचा हार चढला.

५

शिक्षण किती भयंकर गतीनें चालत असावें तें जातीनें पहाण्याची राजेसाहेबांना लहर आली. अेके दिवशीं आपले सखेसोबती, पारिषद वगैरेंच्या लवाजम्यानिशीं ते शिक्षामंदिरांत येअून अुपस्थित झाले. राजांची स्वारी येतांच महाद्वारावरील शंख, घंटा, ढोल, ताशे, नगारे, तूरी, भेरी, दमामे, सनअी, झांझ, मृदंग, करताल झणाणून अुठले. पंडितवर्ग गळा काढून, शेंडी झाडून मंत्र पाठ करूं लागला. मिस्त्री, मजूर, सोनार, लेखक, व्यवस्थापक आणि मामे, आते, चुलत, मावस भावांनीं जयजयकार केला.

भाचा म्हणाला, 'महाराज, पहातां ना हा सगळा समारोह?'

महाराज म्हणाले, 'वा: ! शब्द तर कांहीं कमी होत नाहीं !'

भाचा म्हणाला, 'मात्र शब्दच नव्हे, त्याच्या मागें अर्थहि कांहीं कमी नाहीं.'

राजेसाहेब बेहद्द खुष होअून महाद्वाराच्या बाहेर येअून जसे हत्तीवर बसायला जातात तोंच झुडुपामध्यें लपून बसलेला निन्दक ओरडला, 'महाराज, पक्ष्याला पाहिलें का?'

राजा चमकला, म्हणाला, 'खरेंच कीं, ध्यानांतच आलें नाहीं. पक्ष्याला पहायचें तर राहूनच गेलें.'

परत येअून पंडितांना म्हणाला, 'पक्ष्याला तुम्ही कसें काय शिकवतां त्याची पद्धति पहायची आहे मला.'

पहाणें संपलें. पाहून नेत्रांचें पारणें फिटलें. शिक्षणाची प्रगति पक्ष्यापेक्षांहि अितकी मोठी होती कीं पक्षी मुळीं दिसेच ना. वाटे कीं त्याला न पाहिलें तरी चालेल. राजेसाहेबांना कळून आलें कीं व्यवस्थेंत नांव काढायला कशी ती जागाच नाहीं. पिंजऱ्यांत नाहीं दाणा नाहीं पाणी. मात्र भाराभार पोथ्यांतून ढीगचे ढीग पानें फाडून लेखणीच्या टोकानें पक्ष्याच्या तोंडांत कोंबलीं जात आहेत. गायन तर बंदच — ओरडण्यापुरतीची फट देखील बुजलेली पाहून अंगावर कांटाच अुभा रहातो.

या खेपेला राजेसाहेब हत्तीवर चढतांना कान-अुपटे सरदाराला बजावून गेले कीं निंदकाचे चांगलेच कान अुपटण्यांत यावेत.

६

दिवसेंदिवस पक्षी शिष्टाचाराच्या सभ्य नियमा-बरहुकूम अर्धमेला होअूं लागला. पालकांना ही गोष्ट चांगलीच आशाजनक वाटली. तरी स्वभावदोषामुळें सकाळच्या वेळीं पक्षी प्रकाशाकडे पहातो आणि असभ्य रीतीनें पंख फडफडावतो. अेवढेंच नव्हे तर कधीमधीं आढळून येअी कीं तो आपल्या दुबळया क्षीण चोंचीनें पिंजऱ्याच्या सळया कापण्याच्या प्रयत्नांतहि आहे.

कोतवाल म्हणाला, 'कोण ही बेअदबी.'

तेव्हां शिक्षण विभागांत भाता, हातोडी, अग्नि घेअून लोहार हजर झाला आणि काय ते दणादण घणावर घण! लोखंडाची सांखळी तयार झाली. आणि पक्ष्याचे पंखहि छाटले गेले.

राजाचे सोयरे धायरे तोंडाचा चंबू करून डोकें हलवीत म्हणाले, 'या राज्यांत पक्ष्यांना केवळ अक्कलच नाहीं असें नाहीं, तर कृतज्ञताहि नाहीं.'

यावेळीं पंडितांनीं अेका हातांत लेखणी आणि अेका हातांत बरछी घेअून असा कांहीं प्रकार आरंभला कीं ज्याला 'धडा शिकवणें' म्हणतां येअील.

लोहाराचा धंदा भरभराटला आणि लोहारणीच्या अंगावर सोनें चढलें. आणि कोतवालाची दक्षता पाहून राजानें त्याला शिरोपा दिला.

७

पक्षी मेला. केव्हां तें कुणाच्याहि ध्यानीं आलें नाहीं. कम्बख्त निंदकानें मात्र हांकाटी केली, 'पक्षी मेला.'

भाच्याला बोलावून राजेसाहेबांनीं विचारलें, 'भाच्या, हें काय अैकतों मी?'

भाचा म्हणाला, 'महाराज, पक्ष्याचें शिक्षण पुरें झालें.'

राजानें विचारलें, ‘मग तो आतां अुड्या मारतो का ? ”

भाचा म्हणाला, ‘छे ! ’

‘मग अुडतो ना ? ’

‘अं हं.’

‘गातो वाटतें.’

‘अं हं.’

‘दाणे न मिळाले म्हणजे आरडाओरडा करतो ? ’

‘अं हं.”

राजा म्हणाला, ‘अेकदां माझ्यासमोर पक्ष्याला आणा बघूं.’

पक्षी आला. बरोबर आला कोतवाल, आले शिपाअी शिपुर्डे, आलें घोडदळ, पायदळ. राजानें पक्ष्याला चांचपलें. त्यानें हूंहि केलें नाहीं कीं चूंहि केलें नाहीं. केवळ त्याच्या पोटांतलीं पोथ्यांची कोरडी पानें खुसखस गुजगुज करूं लागलीं.

बाहेर नववसन्ताच्या मलयमारुतानें, किसलयांच्या दीर्घ निश्वासानें मुकुलित वनाच्या आसमंताला व्याकुळ करून सोडलें.

* * *

## प्रसंग — तोता काहिनी

अिंग्रजांनीं हिन्दुस्तानांतील शिक्षण पद्धति सुधारण्यासाठीं अेकदां अेक बादशाही कमिशन नेमलें. त्या काळीं ‘ अिंग्रजी शिक्षणाच्या मुळाशीं अिंग्रजी राज्यकर्त्यांचा हेतुच शुद्ध नाहीं तेव्हां आपल्या राष्ट्राचें शिक्षण आपणच आपल्या हातीं घेतले पाहिजे ’ असा विचार देशांत बळावला होता.

अशा काळांत कविवरांनीं वरील झणझणीत व्यंगचित्र रेखाटलें होतें. याचें अिंग्रजी करून पुस्तकरूपानें प्रकाशितहि केलें होतें.

# अस्पष्ट

खिडकीच्या फटीकुटींतून दिसते आहे समोरच्या घरची जीवन-यात्रा. रेखा आणि छेद, दिसणें आणि न दिसणें मिळून झालेलें तें चित्र.

अेके दिवशीं अभ्यासाचें पुस्तक तसेंच पडून राहिलें. वनमाळीचे डोळे त्या दिशेला धावले.

त्या दिवशीं त्याला दिसलीं त्या घरच्या नित्याच्या व्यवहाराच्या पटावर दोन नवीनच मोहरीं. अेक प्रौढ विधवा तर दुसरीचें वय असेल सोळा किंवा सतरा.

ती प्रौढा खिडकीजवळ बसून त्या मुलीची वेणीफणी करीत आहे आणि मुलीच्या डोळ्यांतून सारखें पाणी घळघळ वहात आहे.

पुन: अेके दिवशीं दिसलें कीं वेणी घालून देणारें माणूसच नाहीं. ती मुलगी दिनान्ताच्या ढळत्या प्रकाशांत ओणवी होअून अेका जुन्या फोटोची फ्रेम पदरानें पुसत आहेसें वाटलें.

त्यानंतर खिडकीच्या फटीकुटींतून दिसतो तिच्या जीवनाचा प्रवाह. मांडीवर सूप घेअून डाळ निवडणें, अडकित्त्यानें सुपारी कातरणें, स्नानानंतर डाव्या हातानें चाळवाचाळव करून ओले केस वाळवणें, व्हरांड्यांच्या कठड्यावर गाद्या-गोधड्या वाळत टाकणें.

दुपारच्या वेळीं पुरुष मंडळी असते ऑफिसांत; स्त्रियांपैकी कुणी झोंपतात तर कुणी पत्ते खेळतात; तसेंच गच्चीवर खुराड्यांतून पारव्यांचें गुटर्र गूं, गुटर्र गूं असें मंद कूजन चालत असतें.

अशा वेळीं ती मुलगी गच्चीवरील जिन्याच्या खोलींत पाय लांब करून पुस्तक वाचते, अेखादे दिवशीं पुस्तकावर कागद ठेअून पत्र लिहिते. तिचे मोकळे केस कपाळावर थबकलेले असतात. आणि बोटें जणूं चालतां चालतां पत्राच्या कानाशीं हितगुज करतात.

अेके दिवशीं याला खंड पडला. त्या दिवशीं ती थोडावेळ पत्र-लेखनांत घालवून थोडा वेळ टांका बरोबर खेळत राहिली होती; त्याच वेळीं अेक कावळा गच्चीच्या बांधावर बसून अर्धी खाल्लेली आंब्याची अुष्टी कोय चोंच मारून मारून खात होता.

अशा वेळीं जणूं पंचमीच्या अन्य-मना चंद्रकोरीच्या मागें पाअूल न वाजवितां अेक मेघ येअून ठेपला. ती होती अेक पोक्त बाअी. तिच्या जाडजूड हातीं जाडीं भरडीं कांकणें, तिचे समोरचे केस विरळ होते आणि भांगांत जाडशी कुंकवाची रेघ होती.

बालिकेच्या मांडीवरील तिचें तें अँपुरें पत्र तिनें अवचित झटकन् खेंचून घेतलें. जणूं ससाण्यानेंच पारव्यावर झडप घातली.

आतां ती मुलगी गच्चीवर फारशी दिसत नाहीं. कधीं शान्त गंभीर रात्रीं तर कधीं सकाळीं तर कधीं संध्याकाळीं त्या घरांतून जे आभास मिळतात, त्यावरून वाटतें कीं, त्यांच्या संसाराच्या तळाला फोडून जणूं अेखादा भूमि-कंपच बाहेर येण्यासाठीं डोकेफोड करीत आहे.

अिकडे खिडकीच्या फटीकुटींतूनच तेंच डाळ निवडणें नि तेंच विडे तयार करणें चालूं आहे. क्षणा-क्षणाला दुधाची कढअी घेअून ती मुलगी अंगणांतल्या नळावर सारखी येजा करीत आहे.

* * *

असेच आणखी थोडे दिवस गेले. ती कार्तिकांतली सायंकाळ होती; गच्चीवर आकाश-दिवा तेवत होता. पागेमधून निघणारा धूर अजगरासारखा आळोखे पिळोखे देत आकाशाला जणूं गुदमरून टाकीत होता.

वनमाळीनें बाहेरून परत येअून खिडकी अुघडली तों ती मुलगी गच्चीवर हात जोडून स्तब्ध अुभी असलेली त्याच्या नजरेस पडली. त्यावेळीं जवळच्याच मल्लिकांच्या मंदिरांत आरतीच्या घंटा वाजत होत्या. बऱ्याच वेळानंतर जमिनीवर बसून वारंवार डोकें टेकून तिनें प्रणाम केला; आणि नंतर ती निघून गेली.

त्याच दिवशीं वनमाळीनें खालीं जाअून पत्र लिहिलें आणि लिहून होतांच स्वतःच जाअून पोस्टाच्या पेटींत त्याच पावलीं टाकून आला. रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या मनापासून अिच्छा करूं लागला कीं, तें पत्र न पोंचेल तर बरें. सकाळीं अुठून त्या घराकडे तो तोंड वर करून पाहूंहि शकला नाहीं.

त्याच दिवशीं वनमाळी मधुपुरला निघून गेला; कुठें जात आहे तें कुणालाच सांगून गेला नाहीं.

* * *

कॉलेज अुघडण्याच्या सुमारास तो परत आला. ती संध्याकाळची वेळ होती. समोरचें घर खालून वरपर्यंत बंद होतें, सर्वत्र अंधकार होता. मग ती सर्व मंडळी गेली तरी कुठें?

वनमाळी बोलून गेला, ‘चला, बरेंच झालें.’

घरांत शिरून पहातो तों टेबलावर पत्रांचा ढीग. सर्वांत खालच्या पत्रावरील पत्ता बायकी अक्षरांत लिहिलेला होता. अनोळखी हस्ताक्षर, त्यावर शेजारच्याच पोस्ट ऑफिसचा शिक्का.

त्यानें पत्र हातांत घेतलें आणि तसाच बसून राहिला. लिफाफा-सुद्धां फोडला नाहीं. फक्त अुजेडासमोर अुचलून धरून त्यानें पाहिलें. खिडकीच्या फटींकुटींतून जीवनयात्रेचें जसें अस्पष्ट चित्र, तशींच आव-रणाआडचीं तीं अस्पष्ट अक्षरें.

अेकदां अुघडायलाहि गेला, त्यानंतर लगेच त्यानें तें पेटींत ठेअून कुलूप लावलें; आणि प्रतिज्ञेनें म्हणाला, ‘हें पत्र मी कध्धीं कध्धीं अुघडणार नाहीं.’

## निरूपण — अस्पष्ट

अेखाद्या पुराण-वस्तु संग्रहालयांत आपण मूर्तींचे अवशेष पाहातों. मूर्ति सुंदर आणि मोहक असल्यामुळें आपलें लक्ष तिला चिकटतें. पण बोलून चालून मूर्तीचा अवशेष तो! सबंध मूर्ति कशी असावी याची कल्पना स्पष्टपणें होत नाहीं. आपण मनानें अनेक प्रकारें ती मूर्ति पुरी करतों. असेंहि असेल आणि तसेंहि जुळेल अशी मनांत 'भवती न भवती' चालत असते. अेखाद्या घटनेचा थोडाबहुत पुरावा हातीं लागावा आणि तेवढ्यावरून सबंध घटनेचा छडा लावण्यासाठीं कुशल अंमल-दारानें प्रयत्न करावा आणि आपल्या संवयीप्रमाणें त्यानें तीनचार पांच 'थिअरीज' बसवाव्यात तशासारखी स्थिति होते हें अस्पष्ट रेखाचित्र वाचून.

* * *

ती मुलगी कोण होती, सधवा होती कीं विधवा, वनमाळीशीं तिचा कांहीं पूर्व संबंध होता किंवा नव्हता, वनमाळीचें लक्ष तिचेकडे लागलें आहे हें तिच्या लक्षांत आलें होतें किंवा नाहीं हें कांहींच आप-ल्याला ठाअूक नाहीं. कवीलाहि ठाअूक नसेल. आंब्याची अुष्टी कोय टोचून खाणाऱ्या कावळ्यानेंहि त्याला सांगितलें नाहीं आणि कूजन करणाऱ्या पारव्यांनींहि त्याचें सूचन केलें नाहीं. प्रामाणिक कवीनें त्याला जे कळलें, जेवढें ध्यानांत आलें, तेवढेंच अस्पष्ट कां असेना, आपणाला सांगून टाकलें आहे. आपण आतां हवी ती कल्पना लढवीत बसावें. कवीची ना नाहीं. तो म्हणतो, 'सगळेंच ओझें माझेवर कां टाकतां? तुम्हीहि थोडें अुचला ना.'

आपणहि वाचकांना म्हणूं कीं या बाबतींत प्रत्येकानें आपापलें ओझें स्वत: अुचललेलें बरें. कल्पनाशक्ति देवानें प्रत्येकाला दिली आहेच. वेणीफणी करून देणारी ती प्रौढा चार दिवसासाठीं आलेली मुलीची आअी असावी काय? पत्र हिसकावून घेणारी तिची मावशी किंवा सासू असावी काय? आणि मिठाअीची तयारी कशासाठीं होत होती? पत्र लिहीत बसल्याबद्दल मुलीला काय काय सोसावें लागलें? पुढें ती

मुलगी गच्चीवर बसून कुणाला नमस्कार करीत होती ? अुद्धारकर्त्या ओीश्वराला कीं अेखाद्या मानवी वराला ?

अेवढें मात्र दिसून येतें कीं वनमाळीच्या मनांत मोठें द्वन्द्व चालूं होतें. त्याची जिज्ञासा प्रबल होती. जबाबदारीची भीतिहि कमी प्रबळ नव्हती. जिज्ञासा, शिव्हल्‌री (कैवारीपणा), रोमान्स (काव्यमय साहस) या सर्वांना फक्त मनांतच वाव द्यावा, बाह्य आचरणांत शिष्टाचाराचा यत्‌किंचितहि भंग होअूं देअूं नये असा त्याचा जीवन-सिद्धान्त असावा. 'मन गया तो जाने दो, मत जाने दो शरीर' असेंहि तो वारंवार स्वतःला समजावीत असावा.

* * *

मुलीची ती करुणामूर्ति, तिचे ते व्याकुळ प्रणाम त्यानें पाहिले. त्याच्यानें रहावलें नाहीं. संयमाचा बांध फुटला, भावनेचा प्रवाह कागद-शाओीच्या मदतीनें पत्रावर अुमटला, अेवढेंच नव्हे तर तें पत्र भावनावेगांत टपालपेटींत टाकूनहि दिलें. गेलें झालें. हातचा बाण सुटला. परत ये म्हटल्यानें सुटलेला बाण थोडाच परत येणार आहे ? हातून चूक झाली. आतां प्रश्न अुद्भवला की चूक येथेंच दाबून टाकायची का चूक आपलीच आहे तेव्हां तिच्याशीं निष्ठा बाळगून ती नेओील तिथवर जावयाचें ? वनमाळी भावनावश होता त्याहिपेक्षां संयमधन अधिक होता. त्यानें पाहिलें कीं येथून पाय काढलाच पाहिजे. कुणालाहि न कळवितां तो मधुपुरला निघून गेला. मागें काय काय घडलें कुणाला ठाअूक.

* * *

सुटी संपली. कॉलेज सुरू होण्याचे दिवस येअून ठेपले. तो परत आला. पाहिलें कीं समोरचें घर बंद. तेथें कोणीच नाहीं. त्याला कसेसेंच वाटलें. पण व्यवहार जाणणारा संभावितपणा म्हणाला— कांहींहि होवो. झालें तें चांगलेंच झालें. ग्रंथ आपोआप आटपला.

पण नाहीं. अजूनहि त्याची अेक कसोटी व्हावयाची होती. चांगलीच अुग्र कसोटी. त्याच्या पत्रांचें अुत्तर आलें होतें. अनोळखी मुलीनें त्याच्या पत्राला अुत्तर दिलें होतें. त्यांत काय असावें ? तिनें मदतीची याचना

केली होती? अनोळखी तरुणाची त्याच्या धाडसाबद्दल कानअुघाडणी केली होती? त्याला मागोमाग येअून कसेंहि करून सोडवण्यासाठीं आमंत्रण दिलें होतें? का 'अेका भगवानावांचून दुसरा कुणीहि माझा वाली होअूं शकत नाहीं. माझें तर बरें होणेंच नाहीं पण तुम्ही आपलें वाटोळें कां करून घेतां?' अशी निर्वाणीची शिकवणूक त्याला पाठविली होती?

आतां कोणाला विचारण्याची जरूर अुरली नव्हती. शोध करण्याचा प्रश्न नव्हता. आपल्याच नांवाचें आलेलें पत्र, अेकांतांत आपल्या हातीं आहे. अुघडून पहाण्याचा अवकाश, सर्व रहस्य समजण्याजोगें होतें. अेक पातळसा लिफाफाच काय तो आड होता. अुघडून पाहिल्यानें विशेष काय बिघडणार आहे? पत्रहि दुसऱ्या कोणाच्या नावाचें नव्हतें. वाचल्यानंतरहि आपला निर्धार कायम ठेवण्यास कुणी नको म्हटलें होतें?

* * *

नको म्हणणारें कुणी नव्हतें, हें खरें. पण वनमाळीचा स्वतःवर तेवढा विश्वास नव्हता. अेकदां पत्र लिहून टाकलें, त्या चुकींतून अेवढें मोठें प्रकरण अुत्पन्न झालें. बालिका तिथून लुप्त झाली आणि तिचें पत्र हातीं येअून थडकलें. आतां हें वाचल्यानंतर शिष्टाचार, सदाचार संभाळण्याचें धैर्य टिकेल का? आणि जर संयम करावयाचाच असेल तर हें पत्रच न वाचलेलें काय वाअीट? त्यानें जिवाचा धडा केला. मोठमोठ्या ऋषिमुनींना न साधणारा संयम त्यानें केला. पत्र फोडलें नाहीं. पेटींत ठेअून देअून पेटी बंद केली. पेटीला कुलूप लावलें. मनावर विजय मिळविला, आणखीहि कितीतरी गोष्टींवर विजय मिळविला. पण-पण —

त्यानें तें पत्र फाडून कां टाकलें नाहीं? संभाळून कां ठेवलें? देवा, यांतून कांहीं नवें, बरें किंवा वाअीट प्रकरण अुत्पन्न होणार नाहीं ना?

देव म्हणतो, 'कथा सृष्टीच्या ब्रह्मदेवाला-कवीला विचारा.'

कवि म्हणतो, 'देव जाणे.'

# पट

१

अभिराम ज्या नगरांत राहून देवदेवींचे पट रंगवी, तिथें त्याचा कुणाशींच पूर्व परिचय असा नव्हता. सर्वांना अेवढेंच ठाअूक आहे कीं, तो परदेशी आहे. आणि पट रंगविणें हाच त्याचा नेहमींचा व्यवसाय आहे.

तो मनांतल्या मनांत विचार करी, 'धनी होतों. तें धनहि गेलें. बरेंच झालें. आतां रात्रंदिवस देवतेच्याच रूपाचें ध्यान करतों. देवाच्या दयेनेंच दोन घास खातों. आणि घरोघरीं देवाची प्राणप्रतिष्ठा करतों. माझा हा गौरव माझ्या हातून कोण हिरावून घेणार?'

अेवढ्यांत त्या देशाचा राजमंत्री वारला. तेव्हां दुसऱ्या अेका देशाहून अेका नवीनच मंत्र्याला राजानें गौरवानें बोलावून आणलें. या निमित्तानें त्या दिवशीं शहरभर खूप धूमधाम चालली होती.

केवळ अभिरामाची कुंचली काय ती त्या दिवशीं चालली नाहीं. नवीन राजमंत्री! अरे, हा तर तोच गवसलेला मुलगा, ज्याला अभिरामाच्या वडिलांनीं प्रतिपाळ करून लहानाचा मोठा केला होता आणि आपल्या पोटच्या पोरापेक्षांहि ज्याच्यावर अधिक विश्वास ठेवला होता. तो विश्वासच घरचे वासे मोजायला कारण झाला होता आणि म्हाताऱ्याला सर्वस्वाला मुकावें लागलें होतें. तोच आज देशाचा राजमंत्री होअून आला आहे!

ज्या खोलींत बसून अभिराम पट रंगवीत असे, तेंच त्याचें देवघरहि होतें. तेथें जाअून तो हात जोडून म्हणाला, 'देवा! येवढ्या करतांच कां मी अितके दिवस रेखारेखांतून आणि रंगारंगांतून तुझें स्मरण करीत आलों? अितक्या दिवसांचा वर किंवा प्रसाद म्हणून दिलास मला हा अपमान!'

२

याच सुमारास रथोत्सवाचा मेळा भरला.

त्या दिवशीं नानादेशींचे लोक त्याचे पट विकत घ्यायला आले. त्याच गर्दींत अेक मुलगाहि आला, त्याच्या अंवतीभंवती होतें लावलष्कर.

त्यानेंहि अेक पट निवडला आणि म्हणाला, 'हा मला विकत हवाय.'

अभिरामानें त्याच्या परिचारकाला विचारलें, 'कुणाचा मुलगा हा?'

तो म्हणाला, 'आमच्या राजमंत्र्याचा अेकुलता अेक मुलगा.'

अभिरामानें तो पट कपड्यानें झांकला, म्हणाला, 'विकायचा नाहीं मला हा.'

हें अैकून मुलाचा हट्ट अधिकच पेटला. घरीं येअून त्यानें जेवण सोडलें आणि तोंड फुगवून बसला. अभिरामाकडे मंत्र्याकडून मोहरांनीं भरलेली थैली गेली. पण ती जशीच्या तशीच परत आली.

मंत्री मनांतल्या मनांत म्हणाला, 'अितकी मगरुरी!'

अभिरामावर जसजसे अत्याचार वाढूं लागले तसतसा तो मनांत म्हणायचा, 'यांतच आहे माझा विजय.'

३

अभिराम दररोज सकाळीं सर्वप्रथम आपल्या अिष्ट देवतेचें अेक चित्र काढीत असे. हीच होती त्याची पूजा. अितर कसलीच पूजा त्याला ठाअूक नव्हती.

अेके दिवशीं त्याला कळून आलें कीं चित्र कांहीं त्याच्या मनासारखें वठत नाहीं. कुठेंतरी कांहींतरी बदल घडला आहे. कशांतच त्याचें मन टिकेना, बरें वाटेना. त्याचें मन त्याला जणूं खात होतें.

हळूं हळूं तो सूक्ष्म बदल स्थूल होअूं लागला. अेके दिवशीं अेकाअेकीं चकित होअून तो म्हणाला, 'अुमगलें सगळें.'

आज त्याला स्पष्ट दिसून आलें कीं दिवसें-दिवस त्याच्या आराध्य देवतेचा चेहरामोहरा मंत्र्याच्या चेहऱ्यासारखाच होऊं लागला आहे.

कुंचली जमिनीवर भिरकावून देऊन तो म्हणाला, 'मंत्र्याचाच जय झाला खरा.'

त्याच दिवशीं, त्याच क्षणीं पट हातीं घेऊन अभिराम राज-मंत्र्याकडे गेला. म्हणाला, 'हा घ्या तो पट आणि द्या तुमच्या मुलाला.'

मंत्र्यानें विचारलें, 'काय किंमत याची?'

अभिराम म्हणाला, 'माझ्या आराध्यदेवतेचें ध्यान तुम्ही हिरावून बसला होतां. हा पट देऊन तेंच ध्यान मी परत नेतों.'

मंत्री कांहींच समजूं शकला नाहीं.

## निरूपण — पट

प्रेमानें, भक्तीनें, भयानें, धाकानें अथवा क्रोधानें ज्याचें आपण अखंड स्मरण करतों, ध्यान धरतों, त्याचें गुणदोषच काय, त्याचें रूप-देखील आपल्यांत अुतरतें असें अनुभवी लोक सांगतात.

गरोदर स्त्री जर अेखाद्या मनुष्याचें अखंड ध्यान करूं लागली तर त्याचा तोंडवळा पोटांतील अर्भकावर अुमटल्यावांचून रहात नाहीं असें वृद्धांच्या तोंडून आपण अैकतों. विष्णुभक्त विष्णूचें ध्यान करूं लागले म्हणजे त्यांचा चेहरा देखील हळूं हळूं विष्णुसारखा होअूं लागतो आणि म्हणूनच पुराणकार म्हणतात कीं अशा लोकांना सारूप्य कोटीची मुक्ति मिळते. (सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता अशा चार अुत्तरोत्तर श्रेष्ठ मुक्ति मानल्या आहेत.) वेदान्ती लोक देखील 'भ्रमरीकीट' न्यायाचें वर्णन करतात. भ्रमरी जिवंत किडयांना म्हणे आपल्या पोवळयांत नेअून टेवतें आणि रोज त्यांची टोंचणी करते. 'आतां भ्रमरी येअील आणि आमची टोंचणी पुनः सुरूं होअील,' अशा भयानें किडे भ्रमरीचें ध्यान करतात. याचा परिणाम असा होतो कीं किडयांचें रूपान्तर होअून ते भ्रमरीचीं पिल्लें बनतात. (ही फक्त कविकल्पना आहे. वस्तुस्थिति निराळीच असते. पण त्याच्याशीं आपल्याला येथें कर्तव्य नाहीं.)

कंसानें द्वेषानें आणि क्रोधानें आणि कांहीं अंशीं भयानेंहि कृष्णाचें अखंड ध्यान केलें. पुराणकार याला विरोधी भक्ति म्हणतात. याहि भक्तीचें कंसाला फळ मिळालें आणि तेंहि अविलंबें. कृष्णाच्या हातून मृत्यु येतांच कंसाला मुक्ति मिळाली. आणि तो कृष्णरूप झाला.

आपला अभिराम देवदेवींचें ध्यान करून समाधान मानीत असे आणि त्यांचीं चित्रें काढून पोट भरीत असे. पण तो रहात होता त्या नगरीचा राजमंत्री बदलला. हा राजमंत्री आपल्या पित्याचाच कृतघ्न मानसपुत्र आहे असें अभिरामाला कळतांच त्याचा पुण्यप्रकोप जागृत

झाला, त्याची सात्विकता नष्ट झाली. त्यानें राजमंत्र्यावर शक्य तो सूड घेण्याचें ठरवलें. आणि अर्थात सूडबुद्धिमुळें तो सगळा वेळ राजमंत्र्याचें ध्यान करूं लागला. सूड घेण्याची संधी त्याला मिळालीहि. पण त्यांतून अितर जें निष्पन्न झालें तें कवींनीं वरील रेखाचित्रांत सांगितलेंले आहे.

राजमंत्र्याला अभिरामानें दिलेलें अुत्तर मंत्र्याला न समजो, आपण तें सहज समजूं शकतो. त्या अेका वाक्यांत अृषि-वचना-अितकें गांभीर्य भरलेलें आहे.

# पर्यवसान

## १

भोजराजाच्या देशांत जी मुलगी पहांटेच्या वेळीं देवमंदिरांत गायन करायला जात असे, ती [सीते शंकुतले प्रमाणें] सांपडलेली मुलगी होती.

गायनाचार्य सांगत, 'अेके दिवशीं अुत्तर रात्रीं माझ्या कानीं अेक सूर आला. त्यानंतर त्याच दिवशीं जेव्हां परडी घेअून पारुल वनांत फुलें आणायला गेलों तेव्हां ही मुलगी अेका फुलझाडाखालीं पडलेली आढळली.'

तेव्हांपासून आचार्यांनीं या मुलीला तंबोऱ्याप्रमाणें आपल्या मांडीवर लहानाची मोठी केली. तिच्या तोंडीं वाचा फुटण्यापूर्वींच तिच्या गळ्यांतून गायन स्फुरलें.

आज आचार्यांचा सूर क्षीण झाला आहे. डोळ्यांनीं धड दिसतहि नाहीं. ती मुलगीच आतां त्यांचा बाळाप्रमाणें संभाळ करते.

कितीतरी युवक देशदेशान्तराहून या मुलीचें गायन अैकायला येतात. हें सर्व पाहून आचार्यांचें हृदय मधून मधून धडधडूं लागते आणि ते म्हणतात, 'जो देठ सुटूं सुटूं व्हायला येतो, त्याचें फूल त्याला सोडून जातें.'

मुलगी म्हणायची, 'तुम्हांला सोडून मी अेक पळहि जिवंत राहूं शकणार नाहीं.'

आचार्य तिच्या मस्तकावरून हात फिरवीत तिचें तोंड कुरवाळीत म्हणत, 'जें गायन आज माझा गळा सोडून गेलें आहे, तेंच तुझ्यामध्यें प्रगट झालें आहे. तूं जर मला सोडून गेलीस तर मी माझ्या अुभ्या जन्माच्या साधनेलाच गमावून बसेन.'

फाल्गुन पौर्णिमेला आचार्यांचा पट्टशिष्य कुमारसेन यानें गुरूचे पायीं अेक आम्रमंजरी वाहून प्रणाम केला. आणि म्हणाला, 'माधवीचें

हृदय मीं मिळविलें आहे. आतां प्रभूंची जर अनुमति असेल तर आम्ही दोघें मिळून आपली चरणसेवा करूं.'

आचार्यांच्या डोळयांतून अश्रु वाहूं लागले. ते म्हणाले, 'आणा पाहूं माझा तंबोरा. आणि तुम्ही दोघे राजाप्रमाणें राणीप्रमाणें माझ्या समोर येअून बसा.'

तंबोरा घेअून आचार्य गायला बसले "दुलहा-दुलही" चें लग्नगीत साहानाच्या सुरांत. म्हणाले, 'आज मीं माझ्या जीवनाचें अंतिम गाणें गाअीन.'

गायनाचें अेक कडवें गाअिलें गेलें. गायन पुढें चालेना. वृष्टीच्या थेंबांनीं भिजून जड झालेल्या जुंअी-पुष्पाप्रमाणें हवेंत कांपत कांपत तें खालीं गळून पडे.

शेवटीं तंबोरा कुमारसेनाच्या हातांत देअून आचार्य म्हणाले, 'वत्सा, हें घे माझें वाद्य.'

नंतर माधवीचा हात त्याच्या हातांत देअून म्हणाले, 'आणि हा घे माझा प्राण.'

त्यानंतर ते म्हणाले, 'आतां माझें तें गाणें तुम्ही दोघें मिळून पूर्ण करा. मी अैकतों.'

माधवीनें आणि कुमारानें गायन चालू केलें, जणूं आकाश आणि पूर्णचंद्रच अेका गळयानें गात आहेत.

२

अशा वेळीं दारीं राजदूत येअून ठेपला. गायन थबकलें.

आचार्य कांपत कांपत आसनावरून अुठले. त्यांनीं विचारलें, 'महाराजांचा काय आदेश आहे?'

दूत म्हणाला, 'आपल्या मुलीचें भाग्य थोर. महाराजांनीं तिला पाचारण केलें आहे.'

आचार्यांनीं विचारलें, 'काय अिच्छा आहे त्यांची?'

दूत म्हणाला, 'आजची रात्र अुजाडतांच राजकन्या काम्बोजला आपल्या पतिगृहीं जायला निघणार आहे. माधवी तिची पाठराखीण म्हणून जाअील.'

रात्र पहांटली, राजकन्या निघाली.

महाराणीनें माधवीला बोलावून सांगितलें, 'माझ्या मुलीला प्रवासांत प्रसन्न राखण्याचा भार तुझे शिरीं.'

माधवीच्या डोळयांतून अश्रु ओघळले नाहींत. पण अनावृष्टीच्या आकाशांतून जणूं प्रखर अून झळाळून अुठलें.

३

राजकन्येची मयुरपंखी नौका पुढें पुढें सरूं लागली आणि तिच्या मागोमाग कांठाकांठानें माधवीचा मेणा. तो मेणा किनखाबानें झांकलेला होता आणि त्याच्या दोन्ही बाजूस पहारेकरी होते.

रस्त्याच्या कडेला धुळीवर तुफानानें अुन्मळून पडलेल्या अश्वत्थाच्या शाखेप्रमाणें पडून राहिले आचार्य आणि ताठर होअून स्तब्ध अुभा राहिला कुमारसेन.

पळसाच्या डहाळी डहाळीवर पक्षी गात होते. आंब्याच्या मोहोराच्या सुगंधानें वारा अस्वस्थ - विव्हल झाला होता.

यदाकदाचित् राजकन्येचें मन प्रवासांतल्या अेखाद्या फाल्गुन संध्याकाळीं अेका क्षणाकरितां व्याकुळ व्हावयाचें याच्या कल्पनेनेंच मात्र राजपुरीच्या लोकांच्या तोंडून अेक सुस्कार बाहेर पडला.

## निरूपण — अुपसंहार

दीनबंधु अॅण्ड्रूजनीं अेकदां आपली वेदना व्यक्त केली होती. अरण्यांतल्या सुंदर सुंदर पक्ष्यांना मारून त्यांचीं पिसें युरोप अमेरिकेच्या ललना आपल्या डोक्यावरील बॉनेटमध्यें बसवितात. आपल्या मधुर कंठानें जीवनदेवतेला आळवणाऱ्या पक्ष्यांचीं घरटीं मोडून, त्यांचीं पिसें अुपटून काढून, त्याचें शिरोभूषण करणाऱ्या युवतीच्या कठोरतेचा निषेध करूं जाणाऱ्या त्यांच्या हृदयांला तिकडचे तरुण अुत्तर देतात — मदिरेप्रमाणें ज्यांचे डोळे चमकतात अशा रमणींच्या डोक्यावर जाअून बसण्यापेक्षां या तुच्छ प्राण्यांच्या जीवनाचें अधिक भाग्य कोणचें ?

अशा प्रश्नांना दीनबंधु अुत्तर काय देणार ? त्यांनीं फक्त आपली व्याकुळता महात्माजींच्या पत्रामध्यें प्रगट केली आणि ते शान्त झाले.

आचार्यांनीं अनन्यनिष्ठेनें संगीत विद्येची अुपासना केली. स्वतःचा प्राणच जणूं त्या संगीतांत त्यांनीं सांठवला होता. ते वृद्ध झाले, त्यांचा कंठ क्षीण झाला. पण त्यांची ती संगीतकला त्यांना सांपडलेल्या त्यांच्या शकुंतलेच्या गळ्यांत अप्सरेप्रमाणें विलसूं लागली. आतां ही आपली मुलगी लग्न करून पतिगृहीं जाअील या शंकेनें आचार्यांचे प्राण कासावीस होअूं लागले. 'तुम्हांला मी सोडणार नाहीं,' असें मुलीचें वचन कितीसा प्रत्यय अुत्पन्न करणार ? पण देवाला त्यांची दया आली. त्यानें त्यांना घरजांवअी दिला त्यांचाच अनन्यभक्त आणि पट्टशिष्य कुमारसेन. वृद्धाचें जीवन कृतार्थ झालें. त्यांची संगीत-चित्कला पूर्णावतारानें वधूवरांमध्यें प्रगट झाली. आचार्यांना जणूं स्वर्गसुख लाभलें. परंतु —

देवाला जी दया आली ती राजाला आली नाहीं. राजा म्हणजे आश्रितांच्या घरघराण्यांचा स्वामी. राजाज्ञाच ती. देवाज्ञेहूनहि कठोर. कुमारसेनाच्या हृदयाचें धन, आचार्यांचे पंचप्राण आणि माधवीचें जीवन-सर्वस्व अेका राजकन्येच्या क्षणभराच्या विरंगुळ्यासाठीं सहज लीलेनें खुडलें गेलें.

अेकाच जगांत अुच्चनीच भेदामुळें जेथें जीवन-मूल्यें भिन्न भिन्न होतात तेथें दिव्य प्रेमानंदाचें पर्यवसान देखील असेंच छिन्न भिन्न व्हावयाचें.

# नवी बाहुली

१

हा गुणी बाहुल्याच तयार करी; त्या बाहुल्या राजवाड्यांतील मुलींच्या खेळाच्या कामीं येत.

दरवर्षी राजवाड्याच्या चौकांत बाहुल्यांचा मेळा भरत असे. या मेळ्यामध्यें सर्वच कारागीर या कलावंताला अग्रपूजेचा मान देत आले आहेत.

त्याचें वय चार-विसे झालें, अशा वेळीं मेळ्यामध्यें अेक नवीनच कारागीर आला. त्याचें नांव किसनलाल. तरुण त्याचें वय, नवीन त्याची ढब.

तो जी बाहुली घडवी तिचा कांहीं भाग घडवी, कांहीं अपुरा ठेवी; कुठें कुठें रंग भरी, कुठें कुठें भरीना: असा भास व्हायचा, बाहुल्या जणूं अजून पुऱ्याच व्हावयाच्या आहेत. जणूं कधींच पुऱ्या व्हावयाच्या नाहींत.

तरणे म्हणत, 'बेट्यानें साहस दाखविलें आहे!'

मुरब्बी म्हणत, 'हें का साहस? ही झाली अीर्षा.'

पण नव्या युगाची हौस. आजकालच्या राजकन्या म्हणत, 'आम्हांला असल्याच बाहुल्या हव्यात.'

जुन्या वळणाचे म्हणत, 'छि: छि:'

हें अैकून त्याचा हेका अुलटा वाढे.

म्हाताऱ्याच्या दुकानीं या खेपेला गर्दी नाहीं. त्याच्या पाटीभर बाहुल्या जणूं तरुणीची वाट पहात घाटावरील घोळक्याप्रमाणें पैल-तीराकडे डोळे लावून बसून राहिल्या.

वर्ष गेलें, दोन वर्षें गेलीं. म्हाताऱ्याचें नांव सगळेच जवळजवळ विसरून गेले. किसनलाल बनला राजवाड्यांतील बाहुल-बाजाराचा सरदार.

२

म्हाताऱ्याचें मन भंगलें. म्हाताऱ्याचें पोट भरेना. शेवटीं त्याच्या मुलीनें येअून विनविलें, 'बाबा, तुम्हीं आमचे घरीं चला.'

जांवअी म्हणाला, 'खा, प्या, आराम करा; आणि आमच्या भाजीपाल्याच्या वाडींतून गुरें-वासरें तेवढीं हुसका म्हणजे झालें.'

म्हाताऱ्याची मुलगी अष्टौप्रहर घरकामांत असते आणि जांवअी मातीच्या पणत्या करतो, व नावा भरून शहराला घेअून जातो.

नवा मनु आला आहे ही गोष्ट जशी म्हाताऱ्याला अुमगली नाहीं तसेंच त्याला अुमगेना कीं त्याच्या नातीचें वय झालें आहे सोळाचें.

जिथें झाडाखालीं बसून म्हातारा वाडीची राखण करतो आणि क्षणोक्षणीं झांपड येअून ढळून पडतो, तिथें त्याची नात येअून त्याच्या गळ्याला मिठी मारते. म्हाताऱ्याच्या हृदयाचीं हाडें सुद्धा सुखावत. तो म्हणे, 'काय दादी, काय हवंय?'

नात म्हणायची, 'आम्हांला अेक बाहुली बनवून द्या. मला खेळायचंय.'

म्हातारा म्हणायचा, 'अग, माझ्या बाहुल्या का तुला पसंत पडतील?'

नात म्हणायची, 'मग तुमच्यापेक्षां चांगल्या बाहुल्या कोण घडवतो तें सांगा बरं.'

म्हातारा म्हणायचा, 'कां? किसनलाल.'

नात म्हणायची, 'अिश्श, किसनलालचा काय पाड?'

दोघांमध्यें अशी शब्दांची झटापटी कितीदां तरी व्हायची. दर खेपेला आपली अेकच अेक गोष्ट.'

त्यानंतर म्हातारा आपल्या झोळींतून माल-मसाला बाहेर काढायचा नि डोळ्यांवर जाडसा चश्मा चढवायचा.

नातीला म्हणायचा, 'पण दादी, कावळे कणसें खातील कीं.'

नात म्हणायची, 'आजोबा, कावळे हांकीन मी.' वेळ वाढूं लागतो. दूर विहिरीवर बैल मोट खेंचतात त्याचा आवाज येतो; नात कावळे हांकते; म्हातारा बसल्या बसल्या बाहुल्या घडवतो.

३

म्हाताऱ्याला खरा धाक काय तो त्याच्या मुलीचा. त्या बाओीचा वचक भारी कडक. तिच्या संसारांत सगळेच जपून वागत.

म्हातारा आज अेकमनानें बाहुली घडवायला बसला आहे. मागून त्याची मुलगी जोरजोरानें हात हलवीत येत आहे हें त्या बिचाऱ्याच्या गांवींहि नव्हतें.

जवळ येअून जेव्हां तिनें हटकलें तेव्हां डोळ्यावरचा चश्मा काढीत भाबड्या मुलाप्रमाणें तो तिचेकडे पहात राहिला.

मुलगी म्हणाली, 'धार काढणें राहिलें दूर आणि तुम्ही बसलांत सुभद्रेला घेअून वेळ दवडीत. अेवढी मोठी घोडी झालीय ती. आतां का बाहुल्यांनीं खेळण्याचें वय आहे हें?'

म्हातारा लगबगीनें म्हणाला, 'सुभद्रा कशाला खेळेल? ही बाहुली राजवाड्यांत विकावी म्हणतों. माझ्या दादीचा ज्या दिवशीं वर येअील त्या दिवशीं तिच्या गळ्यांत पुतळ्यांची माळ घालावी लागेल ना? म्हणून पैसे जमवावे म्हणतो.'

मुलगी त्रासिक स्वरांत म्हणाली, 'राजवाड्यांत कोण असली बाहुली विकत घेणार?'

म्हाताऱ्यानें मान खालीं घातली आणि गप्प बसला.

सुभद्रा कुर्ऱ्यानें म्हणाली, 'पहाते कशा घेत नाहींत ते आजोबांच्या बाहुल्या राजवाड्यांत.'

४

दोन दिवसांनंतर आओीला सोन्याचा अेक होन देत सुभद्रा म्हणाली, 'ही घे माझ्या आजोबांच्या बाहुलीची किंमत.'

आजी म्हणाली, 'कुठें मिळाली ?'

मुलगी म्हणाली, 'राजपुरींत जाऊन विकून आलें.'

म्हातारा हंसत हंसत म्हणाला, 'दादी, तरी बरं तुझ्या आजोबांच्या डोळ्यांना धड दिसत नाहीं नि हातहि कांपतो.'

आजी आनंदानें म्हणाली, 'अशा सोळा मोहरा जमल्या म्हणजे सुभद्रेला पुतळ्यांची माळ होईल.'

म्हातारा म्हणाला, 'त्याची नको आतां चिंता.'

सुभद्रा म्हाताऱ्याच्या गळ्याला बिलगून म्हणाली, 'आजोबा, आणि माझ्या वराचीहि नको करायला आतां चिंता.'

म्हातारा हसूं लागला आणि डोळ्यांत उभें राहिलेलें एक टिपुस त्यानें पुसून काढलें.

५

म्हाताऱ्याचें यौवनच जणूं परत आलें. तो झाडाखालीं बसून बाहुल्या तयार करी आणि सुभद्रा कावळे हांकी; आणि दूर विहिरीवर मोटेचे बैल क्यॉं कॉं करीत मोट खेंचीत.

एक एक करून सोळाहि मोहरा जमल्या नि हार पूर्ण झाला.

आजी म्हणाली, 'आतां वर आला कीं झालें.'

सुभद्रा म्हाताऱ्याच्या कानीं गुणगुणली, 'आजोबा, वरहि ठरला आहे हो.'

आजोबा म्हणाले, 'कुठंग मिळाला वर, सांग ना.'

सुभद्रा म्हणाली, 'जशी मी राजवाड्यांत गेलें, द्वारपाळ म्हणाला —काय हवंय? मी म्हणालें —राजकन्यांना बाहुली विकायची आहे. तो म्हणाला —असली बाहुली का आजकाल कुणी घेणार? असें म्हणून मला परत घालविलें. एकजण माझें रडें पाहून म्हणाला, "दे पाहूं ती बाहुली. तिचा साज थोडासा बदलून देतों. म्हणजे जाईल विकली".'

'तोच जर तुम्हाला पसंत पडेल, तर मी त्याच्याच गळ्यांत माळ घालीन म्हणतें?'

म्हाताऱ्यानें विचारलें, 'तो कुठें आहे?'

नात म्हणाली, 'तो पहा तिथें प्रियाल वृक्षाखालीं.'

वर आंत आला. म्हातारा म्हणाला, 'अरे, हा तर किसन-लाल!'

किसनलाल म्हाताऱ्याच्या पायाची धूळ घेत म्हणाला, 'होय, मी किसनलाल.'

म्हातारा त्याला हृदयाशीं घट्ट धरून म्हणाला, 'बाबा, अेके दिवशीं तूं माझ्या हातच्या बाहुल्या काढून घेतल्या होत्यास आणि आज काढून नेतोस माझ्या प्राणाच्या बाहुलीला.'

नात म्हाताऱ्याच्या गळ्याला बिलगत कानीं गुणगुणली, 'आणि तुम्हांला सुद्धा, आजोबा.'

## निरूपण — नतुन पुतुल

अिंग्रजींत ज्याला Idyll म्हणतात तशा प्रकारची ही गोष्ट आहे. अगदीं साधी सोपी पण हृदयाला वेध लावणारी. 'अुपसंहारा' सारखी हृदयाची कालवा-कालव करून सोडणारी गोष्ट वाचल्यानंतर 'नतुन पुतुल' (परिवर्तन) वाचावयास मिळाली म्हणजे तर विशषच आनंद होतो. या संतोषकारक गोष्टीवर विवेचन तें काय लिहावयाचें! पण थोडीं टिपणें अवश्य लिहितां येतील.

'गानभंगा' सारख्या कवितेमध्यें रविबाबूंनीं दाखविलें आहे कीं अेक पिढी जाते तेव्हां तिला आपल्या काळची अभिरुचि देखील गुंडाळून बरोबर न्यावी लागते. कारण नवीन पिढी आपली नवी अभिरुचि घेअूनच येत असते. आणि ज्याप्रमाणें मुलांना कुमारावस्थेंत येणारे दांत आंतून येअून दुधाच्या दातांना खो देतात त्याप्रमाणें जुन्या पिढीची गत होते. 'The old order changeth giving place to new.'

किसनलाल या नव्या पिढीचा प्रतिनिधि आहे. जुन्या कलेमध्यें सर्वांग-सुन्दरतेचा, परिपूर्णतेचा आणि प्रमाण-बद्धतेचा आग्रह असे. तसें केल्यानें अभिरुचीला कडक वळण लागतें हें खरें. पण त्यांत कलेचा स्वच्छंद विहार कोंडला जातो. Classical आणि Romantic यांच्या-प्रमाणेंच हा भेद आहे. जीवन ज्याप्रमाणें नेहमींच अपूर्ण असतें आणि त्या अपूर्णतेमुळेंच स्वभाव-सुंदर दिसतें, त्याचप्रमाणें किसनलालच्या बाहुल्या पुऱ्या आकारास आलेल्या नसावयाच्या. आणि त्यांना रंगहि सर्वत्र पोंचलेला नसावयाचा. पण त्यांतच त्यानें आपल्या कलेची सर्व खुबी व्यक्त करण्याअितका अवकाश मिळवलेला असावयाचा. आधुनिक अभि-रुचीला अशा कृतीचें वेड कां लागूं नये?

म्हाताऱ्याला कलाक्षेत्रांतून पाय काढावा लागला. जर तो अेकाकी असता तर घोर निराशेनें त्याला गुदमरून टाकून त्याचा प्राण घेतला असता. पण कलेच्या क्षेत्रांतून रजा मिळतांच प्रेमाच्या, वत्सल-तेच्या क्षेत्रानें त्याचें स्वागत केलें. मुलगी आणि जांवअी यांनीं त्याला प्रेमाच्या घरचा पेन्शनर बनवलें. विरंगुळा म्हणून त्याला बैठें कामहि

सांगितलें तरीहि म्हाताऱ्याला मुलीचा धाक होता. 'चार दिवस सासूचे आणि चार दिवस सुनेचे' ही म्हण खरी असली तरी अेकांगी आहे. वृद्ध माणसें आपल्या वार्धक्यामुळें आपल्या मुलांचीं मुलें बनतात आणि मुलांप्रमाणें प्रेमाच्या हातीं परावलंबी होअून रहातात, हा अनुभव सार्वत्रिक आहे. या अर्थानें देखील वर्डस्वर्थची ओळ वापरतां येअील : 'The child is the father of the man.' [बंगालमध्यें आजोबा आपल्या नातीला 'आअी' म्हणून हांक मारतात; कुठें कुठें नात अगदींच लहान असतांना तिला आपली पत्नीहि म्हणतात. आजोबांनाच असला विनोद शोभतो. मुलाची मुलगी असती तर तिला मा म्हटलें असतें.]

कलेनें प्रगति करीत असतां दोन पिढ्यांमध्यें अंतर अुत्पन्न केलें. तें अंतर प्रेमानें दुहेरी रीतीने तोडलें आणि जीवनप्रवाह तुटला होता तो सांधून अखंड प्रवहमान केला. सुभद्रेला आजोबांचा ळळा लागला. त्यांना झालेला मर्मान्तिक आघात ती जाणत होती आणि त्यावर आपल्या प्रौढ बाळपणानें मलमपट्टीहि करीत होती. अितक्यांत आजोबांच्या बाहुल्या विकून आणण्याची जरूर अुत्पन्न झाली. मोठी माणसें ज्याप्रमाणें लहान मुलांच्या पश्चात् त्यांना नकळेल अशा रीतीनें पुष्कळशा गोष्टी जमवून आणून त्यांना चिंतामुक्त करतात त्याचप्रमाणें सुभद्रेनें दुसरें बालपण आलेल्या आजोबांना अज्ञानांत ठेअून त्यांना सुखी करण्याचा अुपक्रम केला. अिकडे किसन-लालला सुभद्रेविषयीं आकर्षण वाटूं लागलें. म्हणूनच त्यानें म्हाता-ऱ्याच्या कलेला थोडासा संस्कार देअून तिला अद्यतन बनवण्याचा घाट घातला.

पुढचा गोड भाग अतिशय सोपा आहे. सुभद्रेनें किसनलालला आपलासा केलें आणि आजोबांच्या विषादयुक्त संतोषाची पूर्ति करून विषादाचें अुरलेलें अल्पस्वल्प शल्यहि काढून टाकलें. शेवटीं विजय झाला सुभद्रेच्या प्रेमळपणाचाच.

# पुनरावृत्ति

## १

त्या दिवशींची रणांगणावरची बातमी तितकीशी बरी नव्हती. राजा हिरमुसल्या चित्तानें बागेंत हिंडायला गेला.

हिंडतां हिंडतां पाहिलें, प्राचीराच्या कडेच्या झाडाखालीं खेळत आहेत दोन लहानगीं मुलें——अेक मुलगा नि अेक मुलगी.

राजानें त्यांना विचारलें, 'कसला खेळ चाललाय तुमचा?'

मुलें म्हणाली, 'रामसीतेच्या वनवासाचा खेळ आहे आजचा.'

राजा तिथेंच थांबला.

मुलगा म्हणाला, 'हें आमचें दण्डकारण्य. अिथें कुटी बांधीन.'

भाराभर मोडक्या तोडक्या काटक्या आणि गवत जमवून तो आपल्या कामांत अगदीं गर्क आहे.

आणि मुलगी भाजी-पाला घेअून लुटूपुटूच्या मडक्यांतून विस्तवा-शिवायच स्वयंपाकाला बसली आहे; राम जेवणार, म्हणून सीतेला अेका क्षणाचीहि फुरसत नाहीं.

राजा म्हणाला, 'सर्व कांहीं आहे. पण राक्षस कुठें आहेत?'

मुलाला मानावें लागलें कीं त्याच्या दण्डकारण्यांत कांहीं कांहीं गोष्टींची वाण आहे खरी.

राजा म्हणाला, 'बरं तर, मीच बनेन राक्षस.'

मुलानें राजाला चांगलेंच निरखून बघितलें. नंतर म्हणाला, 'पण तुम्हीं हरायला हवं बरं का.'

राजा म्हणाला, 'मला चांगलंच हरायला येतं. परीक्षा करून पहा.'

त्या दिवशींचा राक्षसवध अितका सुंदर वठला कीं मुलगा कांहीं केल्या राजाला सोडीना. त्या दिवशीं अेकाच बैठकींत राजाला दहा

बारा राक्षसांचें मरण अेकटयानेंच मरावें लागलें. मरतां मरतां त्याला धाप लागली.

त्रेतायुगीं पंचवटींत ज्या तऱ्हेनें पक्षी गायिले होते त्याच तऱ्हेनें त्या दिवशीं तिथेंहि पक्षी गाअूं लागले. त्रेतायुगीं हिरव्याकच पानांच्या पडद्या पडद्या आड पहाटेच्या अुन्हानें ज्या कोमल थाटाचे सूर लावले होते, आज सुद्धा त्यांनीं तेच सूर लावले.

राजाच्या मनावरचा भार अुतरला.

मंत्र्याला बोलावून राजानें विचारलें, 'हीं मुलें कुणाचीं ?'

मंत्री म्हणाला, 'मुलगी माझीच, नांव रुचिरा. मुलाचें नांव कौशिक. त्याचा बाप अेक गरीब ब्राह्मण आहे. पूजापाठ करून पोट भरतो.'

राजा म्हणाला, 'योग्य काळ येतांच या मुलाबरोबर त्या मुलीचें लग्न व्हावें अशी माझी अिच्छा आहे.'

हें अैकून प्रत्युत्तर करण्याचें धाडस मंत्र्याला करवलें नाहीं. खालीं मान घालून तो गप्पच राहिला.

२

राज्यांतल्या सर्वश्रेष्ठ पंडिताकडे शिकायला म्हणून राजानें कौशिकाला पाठवलें. सगळ्या अुच्च घराण्यांतले विद्यार्थी त्यांचेकडेच शिकत. आणि रुचिराहि त्यांचेकडेच शिके.

कौशिक ज्या दिवशीं त्यांचेकडे शिकायला म्हणून आला त्या दिवशीं अध्यापकाचें मन प्रसन्न राहिलें नाहीं. अितरांनाहि लाज वाटली. परंतु राजाची मर्जी !

खरी मुश्किल झाली ती रुचिरेची. कारण मुलें कुजबुजत. लाजेनें तिचें तोंड लाल होअी. रागानें तिच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकत.

कौशिकानें जर कदाचित् तिच्यापुढें पोथी सारली तर ती भिरकावून देअी. जर त्यानें कधीं पाठासंबंधी गोष्टी काढल्या तर ती गप्पच राही.

रुचीच्या बाबतींत अध्यापकांच्या स्नेहाला सीमा नव्हती. सर्वच बाबतींत कौशिकाच्या वरचढ ती व्हावी असाच त्यांचा बाणा होता. रुचीचाहि पण तसाच होता.

वाटे कीं तसें घडणें कठिण नाहीं. कारण कौशिक अभ्यास करी खरा, पण अेकाग्रतेनें करीत नसे. त्याचें पोहण्यांत मन जाअी, त्याला वनांत हिंडणें बरें वाटे, तो गात बसे, वाद्य वाजवीत बसे.

अध्यापक तिरस्कारानें त्याला म्हणत, 'विद्येविषयीं तुझ्यांत आवड कां दिसत नाहीं ?'

तो म्हणे, 'माझ्यांत अेकट्या विद्येचीच आवड नाहीं. अनेक गोष्टींची आवड माझ्यांत आहे.'

अध्यापक म्हणत, 'त्या सगळ्या आवडी सोड.'

तो म्हणें, 'तर मग विद्येचीहि आवड माझ्यांत अुरणार नाहीं.'

३

असाच कांहीं काळ लोटला.

राजानें अध्यापकांना विचारलें, 'आपल्या विद्यार्थीवर्गांत श्रेष्ठ कोण आहे ?'

अध्यापक म्हणाले, 'रुचिरा.'

राजानें परत विचारलें, 'आणि कौशिक ?'

अध्यापक म्हणाले, 'तो कांहीं शिकला असेल असें वाटत नाहीं.'

राजा म्हणाला, 'कौशिकाचें लग्न रुचिरेशीं व्हावें असा माझा बेत आहे.'

अध्यापक जरासे हंसले, म्हणाले : 'गोधुलीबरोबर (गोरज मुहूर्ताबरोबर) अुषेचें लग्न लावण्यासारखाच हा प्रकार व्हायचा.'

राजानें मंत्र्याला बोलावून म्हटलें, 'तुमच्या मुलीबरोबर कौशिकाच्या लग्नाला विलम्ब व्हायला नको.'

मंत्री म्हणाला, 'माझी मुलगी हें लग्न अिच्छीत नाहीं.'

राजा म्हणाला, 'स्त्रियांच्या मनांतली अिच्छा, तोंडच्या शब्दांवरून का पारखली जाते ?'

मंत्री म्हणाला, 'तिच्या डोळयांतलें पाणी साक्ष देतेंय ना?'

राजा म्हणाला, 'काय तिला असें वाटतें कीं कौशिक तिच्या अयोग्य आहे?'

मंत्री म्हणाला, 'होय, तेंच खरें.'

राजा म्हणाला, 'माझ्यासमोर दोघांच्याहि विद्येची परीक्षा होवो. कौशिक विजयी झाला तर हा विवाह होअूनच राहायचा.'

दुसरे दिवशीं मंत्री राजाला येअून म्हणाला, 'माझ्या मुलीलाहि हा पण पसंत आहे.'

४

न्यायसभा बसली. राजा सिंहासनावर बसला होता, आणि कौशिक त्याच्या सिंहासनाच्या पायथ्याशीं.

स्वतः अध्यापकच रुचिरेला घेअून अुपस्थित झाले. कौशिकानें आसनावरून अुठून त्यांना प्रणाम आणि रुचीला नमस्कार केला. रुचीनें त्याचेकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं.

शाळेंतला शिरस्ता पाळण्यापुरताहि कौशिक कधीं रुचीशीं वाद-विवाद करीत नसे. अितर विद्यार्थीहि अवज्ञेनें त्याला वादविवाद करायला अवसर असा देत नसत. म्हणून आज जेव्हां त्याच्या युक्तीच्या तोंडीं क्षुरधार व्यंग, बाणाच्या फळावरील प्रकाशाप्रमाणें तळपूं लागलें तेव्हां गुरूहि आश्चर्यचकित झाले. पण मनांत संतापले. रुचीच्या कपाळाला घाम सुटला. ती आपली बुद्धि कह्यांत ठेवूं शकली नाहीं. कौशिकानें तिला पराभवाच्या परिसीमेवर पोंचवून सोडून दिलें.

रागानें अध्यापकांची बोबडी वळली आणि रुचीच्या डोळयांतून गंगा यमुना वाहूं लागल्या.

राजा मंत्र्याला म्हणाला, 'आतां विवाहाचा मुहूर्त ठरवा.'

कौशिक आसनावरून अुठला आणि हात जोडून राजाला म्हणाला, 'महाराज, क्षमा करा. या विवाहाला मी तयार नाहीं.'

राजा विस्मित होअून म्हणाला, 'जयलब्ध पुरस्कार घ्यायचा नाहीं तुला?'

कौशिक म्हणाला, 'जय माझाच असो. पण पुरस्कार अितरांचा होवो.'

अध्यापक म्हणाले, 'महाराज, आणखी अेका वर्षाची मुदत द्या. त्यानंतर अखेरची परीक्षा व्हावी.'

अखेर हाच निर्णय नक्की ठरला.

५

कौशिकानें शाळेचा त्याग केला. आतां तो अेखाद्या पहांटे वनांतल्या छायेंत तर अेखाद्या संध्याकाळीं पहाडाच्या शिखरावर दिसायचा.

अिकडे रुचीच्या अभ्यासाकडे अध्यापकांनीं आपलें संपूर्ण मन लावलें. पण रुचीचें संपूर्ण मन कुठें?

अध्यापक चिडून म्हणत, 'अजूनहि जर तूं सावध झाली नाहींस तर दुसऱ्यांदा पुन: तुजवर लाजायची पाळी येअील.' दुसऱ्यांदाहि लाजायची पाळी यावी म्हणूनच जणूं तिनें तप आरंभिलें. अपर्णेचें तप जसें अनशनाचें तसेंच रुचिरेचें होतें अनध्यायाचें. षड्दर्शनाची पोथी अुघडल्या शिवायच राहिली. अितकेंच नव्हे तर काव्याच्या पोथीचेंहि भाग्य क्वचितच अुघडे.

अध्यापक संतापानें चिडून म्हणाले, 'कपिल कणादांच्या नांवानें प्रतिज्ञा करतों कीं यापुढें कधींहि स्त्री-जातीला विद्यार्थी म्हणून घेणार नाहीं. वेदवेदान्ताचा थांग मिळविला. पण स्त्री-जातीचें मन ओळखूं शकलों नाहीं.'

अेके दिवशीं मंत्री राजाकडे येअून म्हणाला, 'भवदत्तांकडून मुलीला मागणी आली आहे. कुलानें, शीलानें, धनानें, मानानें ते श्रेष्ठ आहेत. महाराजांची अनुज्ञा असावी.'

राजानें विचारलें, 'मुलगी काय म्हणते?'

मंत्री म्हणाला, 'मुलीच्या मनांतली अिच्छा का तोंडच्या शब्दां-वरून पारखली जाते?'

राजानें परत विचारलें, 'तिच्यां डोळ्यातलें पाणी आज कसली साक्ष देतेय ?'

मंत्री चूप बसला.

६

राजा आपल्या बागेंत येऊन बसला. मंत्र्याला म्हणाला, 'तुमच्या मुलीला मजकडे पाठवून द्या.'

रुचिरा आली. राजाला प्रणाम करून अुभी राहिली.

राजा म्हणाला, 'मुली, तो राम-वन-वासाचा खेळ आठवतो ना ?'

रुचिरा हंसत, खालीं मान घालून अुभी राहिली.

राजा म्हणाला, 'आज तोच राम-वन-वासाचा खेळ पुनः अेकदां पहायची मला हौस झालीय.'

रुची आपल्या डोक्यावरचा पदर आणखीनच सांवरीत गप्प राहिली.

राजा म्हणाला, 'वनहि आहे, रामहि आहे. पण अैकतों कीं या खेपेला सीतेचाच काय तो अभाव आहे. तूं मनांत आणलेंस तर तो अभाव सहज भरून निघेल.'

रुचीनें न बोलतांच खालीं वांकून राजाला प्रणाम केला.

राजा म्हणाला, 'पण मुली, या खेपेला मला राक्षस होतां यायचें नाहीं.'

रुची हळुवार नजरेनें राजाच्या तोंडाकडे पहातच राहिली.

राजा म्हणाला, 'या खेपेला राक्षसाचें काम करतील तुमचे अध्यापक.'

## निरूपण — पुनरावृत्ति

'पुनरावृत्ति' ही गोष्ट मोठ्या चातुर्यानें लिहिली आहे. पहिल्या वाक्यांतच कवीनें गोष्टीचा 'मुखडा' सुंदरपणें बांधला आहे. रणांगणावर राजाचें सैन्य कुठेंतरी हरलें असेल. त्याचा विषाद मनांत भरला होता. म्हणूनच राजा अन्तर्मुख वृत्तीनें म्हणतो, 'मला चांगलंच हरायला येतं.' आणि पुढें ज्या अध्यापकाला वेदवेदान्ताचा थांग लागला, पण स्त्रीहृदयाचा थांग लागला नाहीं त्या विद्याजडाला खेळांत नव्हे तर प्रत्यक्ष गोष्टींत हार खाणारा राक्षस बनविलें आहे.

कवीचें बाळपण विद्याजड शिक्षकांच्या काचांतून वाचण्याच्या प्रयत्नांतच गेलें. आणि म्हणूनच त्यांनीं विद्यार्थ्यांचें नंदनवन अशी अेक शाळा शांतिनिकेतन मधें मोठ्या चिकाटीनें चालवली. अेवढेंच नव्हे तर स्वतःच्या साहित्यांत जेथें संधि साधेल तेथें शिक्षणाविषयींच्या स्वतःच्या कल्पना ते खुबीनें मांडत असतात.

कवीप्रमाणें माझाहि अनुभव आणि अभिप्राय आहे कीं बाळपणीं आणि कांहीं अंशीं कुमार वयांत देखील मुलावरती अेकाग्रपणें शिकण्याचा जुलूम होता कामा नये. मी नेहमीं म्हणतों कीं अेकाग्रता यथाकाळीं येअील. ती प्रयत्नानें आणण्यापेक्षां जिज्ञासेच्या अुत्कटतेंतून अुत्पन्न झालेली बरी. दिवा ज्याप्रमाणें स्वतःचे किरण विश्वतो (सगळ्या दिशेनें) फेकतो, त्याप्रमाणें जिज्ञासेनें स्वतःचें ध्यान जीवनांतील सर्वच क्षेत्रांत पाठविलें पाहिजे, पोहोंचविलें पाहिजे. अेखाद्या खेडवळाला जर राजदरबारांत किंवा पदार्थ-संग्रहालयांत घेअून गेलांत तर तेथील समृद्धीनें तो भारावतो आणि काय पाहूं आणि काय नको, असें त्याला होअून जातें. अेकहि वस्तु तो न्याहाळून पाहूं शकत नाहीं. पण समग्र परिस्थितीचें तो प्रथम साकल्यानें आकलन करतो. हा लाभ थोडाथोडका नाहीं.

अेकाच वेळीं अनेक दिशांनीं पहाणें आणि अनेक बाबतींकडे युगपत् लक्ष पुरवणें हें जीवन-शिक्षणाचें अत्यंत आवश्यक आणि म्हणूनच

अत्यंत महत्त्वाचें अंग आहे. अेकाग्र ध्यानाची महती सर्व जाणतात. पण ध्यानाच्या या विकिरण शक्तीचें महत्त्व शिक्षण-शास्त्र्यांना अजून पुरेसें अुमगलें नाहीं. मुंबअीला बोरीबंदरच्या समोरील रस्ता ओलांडणाऱ्या सायकल स्वाराला कितीतरी ठिकाणीं अेकाच वेळीं लक्ष द्यावें लागतें. अेकीकडून ट्राम येत आहे, दुसरीकडून मोटर, तिसऱ्या बाजूनें अेक सायकल, अशीं कितीतरी व्यवधानें त्याच्यापुढें दत्त म्हणून अुभीं राहिलेलीं असतात —— अुभीं रहातीं तर अितकी चिंता नव्हती. हीं सर्व व्यवधानें आपापल्या दिशेनें आणि आपापल्या वेगानें धांवत असतात. त्यांतील प्रत्येकाचा मनसुबा ओळखून, गतीची दिशा ठरवून स्वतःचा मार्ग काढावयाचा असतो. या सर्व गोष्टींकडे अेकाच क्षणीं सारखेंच अुत्कट ध्यान देणें आणि अेकाच क्षणीं सर्व गतींचा हिशोब करणें हें आहे खरें जीवनशिक्षण.

जंगलांतल्या पशुपक्ष्यांना अत्यंत गोडीनें आहार विहार करतांना देखील अेकाग्र होअून भागत नाहीं. केव्हां कोठून शत्रु झडप घालील हें सांगतां येत नाहीं. म्हणून चारी बाजूंनी सतर्क आणि सावधान असल्यावांचून त्यांना सुरक्षितपणें जगणेंच शक्य नाहीं.

सृष्टिकर्त्याच्या विविध लीलांनी भरलेल्या या विश्वांत प्रवेश केल्याबरोबर बालमानसाची आकलन शक्ति जसजशी खुलत जाते तसतसें तें कुतूहलानें सर्वत्र पाहूं लागतें.

आपल्या गोष्टींतील कौशिक गुरुजींना सांगतो, 'माझ्यांत अेकट्या (पुस्तकी) विद्येचीच आवड नाहीं. अनेक गोष्टींची आवड माझ्यांत आहे.' विद्या-परायण गुरुजी म्हणतात, 'त्या सगळ्या आवडी सोड.' जीवननिष्ठ कौशिक म्हणतो, 'तर मग विद्येचीहि आवड माझ्यांत अुरणार नाहीं.'

या लहानशा संवादांत रविबाबूंनीं शिक्षण-शास्त्रांतील अेक अुपेक्षित असा मोठा अध्याय सांगून टाकला आहे.

मागील अेका गोष्टींत (पर्यवसान) राजाच्या अमर्याद अधिकाराची आपल्याला चीड आली होती. प्रस्तुत गोष्टींत राजाच्या हातीं असलेले

सर्वाधिकार आपल्याला रुचतात. कारण राजामध्यें स्वार्थ, अहंकार किंवा अप्रबुद्ध लहरीचा वेग नसून तो येथें सर्वज्ञ आणि मर्मज्ञ आहे. त्याच्यांत नर्म रसिकता (humour) हि आहे. आणि हृदय पारखण्याची हातोटीहि आहे.

जेव्हां कवींची शिक्षण कला जगांत नांदूं लागेल तेव्हां हल्लींचें रूढ शिक्षणशास्त्र प्रस्तुत गोष्टींतील राक्षसाप्रमाणें अनेकवार परास्त होईल आणि मरतां मरतां त्याला धाप चढेल.

मुलांमुलींच्या लहानपणच्या प्राकृतिक प्रेमांत सामाजिक दर्जाचें वैषम्य कालवलें गेलें, अभिमान आणि संकोच आड आले, तरुणाचा तेजस्वी स्वाभिमान खंडित झाला. पण शेवटीं प्रेमाचाच विजय झाला. Till Pride be quelled and Love be free हें कवि स्कॉटचें वचन येथें पूर्णपणें चरितार्थ झालेलें दिसतें.

# सिद्धि

## १

स्वर्गाच्या अधिकारापासून मनुष्य वंचित राहूं नये, असा त्याचा पण होता. म्हणून जबर शोधाअंतीं त्यानें अमर होण्याचा मंत्र शिकून घेतला. आणि आतां वनामध्यें अेकटा बसून तो त्या मंत्राची साधना करूं लागला.

वनाच्या अेका कडेला काटक्या वेंचीत हिंडणारी अेक मुलगी रहात असे. ती मधें मधें त्याच्याकरितां ओच्यांतून फळें आणी आणि पानांच्या द्रोणांतून झऱ्याचें पाणी आणून देअी.

हळू हळू तपस्या अितकी अुग्र झाली कीं, तो आतां फळांना शिवतसुद्धा नसे, पक्षी येअून चोंचा मारून मारून खाअून जात.

असेच आणखी कांहीं दिवस गेले. आतां द्रोणांतलें पाणी द्रोणांतच सुकून जाअूं लागलें. ओठांपर्यन्त पोंचत नसे.

काटक्या वेचणारी ती मुलगी म्हणायची, 'आतां मी करावं तरी काय? माझी सगळीच सेवा वाया जाअूं लागली.'

यापुढें ती फुलें वेंचून आणून तपस्व्याच्या पायाशीं ठेअून जाअी; तपस्व्याच्या हें ध्यानांतहि येत नसे.

मध्यान्हींचें अून तापूं लागे तेव्हां ती आपला पदर धरून छाया करीत अुभी राही. परंतु तपस्व्याच्या वाट्याला जसें अून तशीच छाया.

कृष्ण पक्षाच्या रात्रीं जेव्हां अंधकार गाढ होत असे तेव्हां ती मुलगी तेथेंच जागत बसे. तपस्व्याला भय असें कसलें नव्हतेंच. तरी ती पहारा करी.

## २

असाहि अेक काळ होता कीं जेव्हां ही काटक्या वेचणारी भेटे तेव्हां हा तरुण तपस्वी ममतेनें विचारीत असे, 'काय, बरं चाललंय ना?'

ती म्हणायची, 'आमचं बरं काय नि वाअीट काय.

'पण तुम्हांला बघणारं कुणी नाहीं वाटतं? तुमची आअी, बहीण?'

तो म्हणायचा, 'सगळेच आहेत. पण त्यांच्या काळजी वहाण्यानें काय व्हायचंय? ते मला चिरकालपर्यन्त जिवन्त थोडेच ठेवूं शकतील.'

ती म्हणायची, 'प्राण वाचवतां येत नाहींत म्हणूनच ना जिवाचा अेवढा आटापिटा?'

तपस्वी म्हणायचा, 'मी चिरकाळा पर्यन्त जगण्याचा मार्ग शोधीत आहें. मनुष्याला अमर करायचा आहे मला.'

अेवढें बोलून तो आणखीहि कितीतरी बोलत रहायचा; सगळेंच जणूं स्वगत. मग त्याचा अर्थ कुणाला कळावा तरी कसा?

काटक्या वेचणारीला बापडीला यांतलें कांहींच कळत नसे. तरीहि आकाशांत नवीन मेघ बोलूं लागतांच मयूरीला जसें होतें तसेंच होअून तिचें मन व्याकूळ होअी.

त्यानंतर आणखी कांहीं काळ लोटला. तपस्व्यानें मौन धारण केलें. तिचेशीं तो कांहींच बोलेना.

त्यानंतर आणखीहि कांहीं दिवस गेले. तपस्व्याचे डोळेहि बंद झाले. तिचेकडे आतां तो पाहीना.

मुलीला वाटायचें, तिच्यांत आणि त्या तापसामध्यें त्या तपस्येनें जणूं लक्षयोजन कोसांचें दूरत्व आणलें आहे. हजारों वर्षे गेलीं तरीहि हा अेवढा मोठा विच्छेद पार करून जवळ येण्याची आतां आशाच नको.

आशा न राहीना का, तरी तिला रडें कोसळे. मनांतल्या मनांत ती म्हणायची, 'सबंध दिवसांतून अेकदांहि जरी म्हटलं असतं, "बरी आहेस ना?" तर तेवढ्या त्या दोन शब्दांनींच दिवस सुखाचा गेला असता; अेका वेळेला जरी चारदोन फळें खाल्लीं असतीं आणि थोडेसें पाणी प्याले असते तरी तोंडाला अन्नपाणी गोड लागलं असतं.'

३

अिकडे अिन्द्र लोकीं वर्तमान पोंचलें कीं मनुष्य मर्त्य लोकाला ओलांडून सरळ स्वर्ग गाठूं पहातो आहे—कोण हें धारिष्ट्य!

अिन्द्रानें बाहेरून रागाचा आव आणला, पण आंतल्याआंत चरकला. म्हणाला, 'दैत्यांनीं स्वर्ग जिंकण्याचा मनसुबा केला होता

बाहुबळावर. त्यांच्याशीं युद्ध चालू शकलें; मनुष्य स्वर्ग आपलासा करूं मागतो आहे दुःखाच्या बळावर; त्याच्यापुढें हात टेकावे लागतील कीं काय ?'

मेनकेला महेन्द्र म्हणाले, 'जा आणि तपोभंग कर.'

मेनका म्हणाली, 'सुरराज, स्वर्गाच्या अस्त्रानें मर्त्यलोकींच्या माणसाचा पराभव कराल तर तो स्वर्गाचाच पराभव होअील. मानवाचा मरणबाण मानवाच्याच हातांत नाहीं कीं काय ?'

अिन्द्र म्हणाला, 'गोष्ट खरी आहे.'

४

फाल्गुनांतले दक्षिण मलयानिलाचे झोत लागतांच मर्मरित माधवी-लता जशी प्रफुल्ल होते, त्याप्रमाणेंच अेके दिवशीं त्या काटक्या वेचणारीच्या शरीराला नंदनवनाचा वारा चुंबून गेला आणि तिचा देह, तिचें मन अेका अुत्सुक माधुर्याच्या अुन्मेषानें व्यथित होअून निघालें. तिच्या मनाच्या भावना पोळ्यावरून अुडालेल्या मधमाशांप्रमाणें अुडूं-बागडूं लागल्या, कुठेतरी त्यांना मधाचा सुगावा लागला असावा.

बरोबर याच बेताला साधनेचें अेक पर्व संपलें. आतां तापसाला जावयाला हवें होतें निर्जन गिरिगुहेंत, म्हणून त्यानें डोळे अुघडले.

समोरच त्याला दिसली ती काटक्या वेचणारी मुलगी! तिनें वेणींत माळली होती अशोकाची मंजरी आणि नेसली होती ती कुसुंब्याच्या फुलांच्या रंगांत रंगवलेली साडी. अेखादी परिचयाची रागिणी असावी, पण तिचे स्वर मात्र आठवूं नयेत तशासारखी त्याला ती वाटली — पूर्वीं जणूं ती अेखाद्या चित्राची रूपरेखाच मात्र होती. आतां अेखाद्या चित्रकारानें आपल्याच मस्तींत अचानक त्यांत रंग भरले असावेत असें वाटलें.

तपस्वी आसन सोडून अुभा राहिला आणि म्हणाला, 'मी दूर-देशीं जावें म्हणतों.'

काटक्या वेचणारी मुलगी म्हणाली, 'तें कां, प्रभु ?'

तपस्वी म्हणाला, 'तपस्या पूर्ण करावी म्हणून.'

तेव्हां ती हात जोडून म्हणाली, 'दर्शनाच्या पुण्यापासून मला अशी वंचित कां करतां ?'

तपस्वी पुन्हा आसनावर बसला, त्यानें बराच वेळ आपल्या मनाशीं चांगलाच खल केला पण अवाक्षरहि बोलला मात्र नाहीं.

५

तिची विनवणी मान्य झाली मात्र, तिच्या हृदयाच्या अेका टोकापासून तो दुसऱ्या टोकापर्यन्त अेकसारख्या वज्र-सूचि तिला पुन्हा पुन्हा बोचूं लागल्या.

तिला वाटलें, 'मी यःकश्चित् तुच्छ माणूस. मग माझ्या बोलामुळें विघ्न तरी का यावें ?'

त्या रात्रीं डोळा न लागल्यामुळें पाचोळ्याच्या शय्येवर अेकाकी जागत बसण्यांत तिला आपली स्वतःचीच सारखी भीति वाटूं लागली.

दुसरे दिवशीं सकाळीं तीं फळें घेअून समोर अुभी राहिली. तापसानें हात पुढें करून तीं घेतलीं. द्रोणांतून पाणी आणतांच तापस पाणीहि प्याला. तिचें मन मोदानें भरून निघालें.

परंतु त्यानंतर लगेच नदीतीरावरील शिरीषाच्या छायेंत येतांच तिच्या डोळ्यांतील पाणी खळेना. काय वाटलें असेल कुणास ठाअूक !

दुसरे दिवशीं सकाळीं तापसाला प्रणाम करीत ती काटक्या वेंचणारी मुलगी म्हणाली, 'प्रभो, आपला आशीर्वाद मागतें.'

तपस्व्यानें विचारलें, 'कां ?'

मुलगी म्हणाली, 'बरीच लांब जाणार आहे म्हणून.'

तपस्वी म्हणाला, 'बरं जा, तुझी साधना सफळ होवो.'

६

अेके दिवशीं तपस्या पूर्ण झाली.

अिन्द्र येअून म्हणाला, 'स्वर्गाचा तूं अधिकारी झाला आहेस.'

तपस्वी म्हणाला, 'आतां स्वर्ग घेअून मी काय करूं ?'

अिन्द्रानें विचारलें, 'मग काय हवंय तुला ?'

तपस्वी म्हणाला, 'याच वनांतली ती काटक्या वेंचणारी मुलगी.'

## निरूपण — सिद्धि

हा विषय रविबाबूंनीं अनेक ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारांनीं हाताळला आहे.

शाप-संभ्रमांतील पुंडरिक म्हणतो –
निराकार त्या निर्गुण रूपा। बहुदिन धुंडित होतों।।
सगुण अशी साकार सुंदरी। दिसतां छंद सुटे तो।।
लाभे जरि मजला। मानिन मुक्तिलाभ घडला।।

जुन्या कवींचे कथानायक सौंदर्यावरच लुब्ध होत असत आणि अशा सुंदर व्यक्ति आकृति-विरोधी होऊं शकत नाहींत, तेव्हां त्यांच्यांत सर्व सद्गुण असलेच पाहिजेत असें धरून ते चालतात. आपला तपस्वी मोक्षार्थी नव्हता. स्वर्ग गांठून त्याला अजरामर व्हावयाचें होतें. तरीहि त्यानें म्हटलें असतें —

सेवा-मूर्ति मुग्ध कन्यका पाहुनि छंद सुटे तो।

पण येथेंहि मदन आणि वसंत यांनीं तिचें सौंदर्य खुलवल्यानंतरच तो चित्रांगदेंतील तपस्वी अर्जुनाप्रमाणें संकल्प-भ्रष्ट झाला असेल.

कसेंहि असो, स्वर्गांत जाऊन 'नोहे माता, नोहे कन्या, नोहे वधू, सुन्दरी रूपसी नन्दनवासिनी ऊर्वशी,' अशा देवांगनेला प्राप्त करण्यापेक्षां प्रेममूर्ति, सेवापरायणा मुग्धा सात्त्विकी बनकन्या मिळवण्याची अिच्छा कांहीं अधःपाताचें लक्षण म्हणतां येणार नाहीं.

# पहिलें पत्र

## १

वधूबरोबर त्याचें हें पहिलेंच मिलन आणि त्यानंतर तो हा पहिल्या प्रथमच प्रवासाला निघाला आहे.

घरांतून बाहेर पडतांना वधूचें मुळूमुळू रडणें घरच्या आरशामधून अवचित त्याच्या नजरेस पडलें. मनांत आलें, 'परतावें, चार गोष्टी बोलून यावें.' पण तेवढाहि वेळ नव्हता.

तो दूर निघून जातो आहे म्हणून अेका माणसाच्या डोळ्यांवाटे गंगायमुना वाहूं लागाव्यात, असें त्याच्या जीवनांत पूर्वी कधीं घडलें नव्हतें.

रस्त्यावरून चालतां चालतां कलत्या अुन्हांमध्यें त्याला ही पृथ्वी प्रेमाच्या व्यथेनें भारावलेलीशी वाटली. त्या अपार व्यथेच्या भाण्डारांत त्याच्या सारख्या अेका माणसालाहि आमंत्रण आहे हा विचार मनीं येअून विस्मयानें त्याचें हृदय भरून आलें.

ज्या ठिकाणीं तो कामासाठीं आला होता तो होता पहाड. तेथें देवदारूंच्या छायेमधून बांकदार रस्ता नीरव आराधनेप्रमाणें पहाडाला बिलगून आहे आणि छोटे छोटे झरे जणूं आडून आडून कुणाचा शोध करीत फिरत आहेत, लपत छपत.

आरशामध्यें जी मुद्रा तो पाहून आला होता, आज सृष्टीमध्यें प्रवासी तीच मुद्रा बघतो आहे, नववधूच्या गुप्त व्याकुळतेची ती मुद्रा.

## २

आज गांवाहून त्याच्या बायकोचें पहिलें वहिलें पत्र आलें आहे.

ती लिहिते, 'तुम्ही परत केव्हां येणार? लवकर या, लवकर लवकर या. तुमच्या पायां पडतें.'

जेथें येणें जाणें अखंड चालूंच असतें अशा या जगांत त्याच्याहि निघून जाण्याला आणि निघून येण्याला अितकी किंमत असूं शकते हें

कुणाला ठाअूक होतें? त्या दोन आतुर नयनांच्या नजरेसमोर त्यानें स्वत:ला अुभें करून पाहिलें आणि त्याचें मन विस्मयानें भरून आलें.

पहांटे अुठून पत्र घेअून देवदारूंच्या छायेंत त्याच वळणदार रस्त्यावरून तो फिरायला निघाला. पत्राचा स्पर्श त्याच्या हाताला होत होता आणि कान जणूं अैकत होते, 'तुम्हांला भेटूं शकत नाहीं म्हणून माझ्या जगाचें सारें आकाश शोकानें भरून निघालें आहे.'

मनांतल्या मनांत तो विचार करूं लागला, 'अितक्या शोकाच्या मोलाचा मी आहे का?'

३

अशा वेळीं पूर्वदिशेच्या निळ्या पहाडांच्या शिखरांवर सूर्य अुगवला. देवदारूंच्या, दंवानें ओलावलेल्या पानांच्या झालरीमधून प्रकाश झगमगून अुठला.

अकस्मात् चार विदेशी तरुणी दोन कुत्रे बरोबर घेअून रस्त्याच्या वळणावरच त्याच्या समोर आल्या. कोण जाणें काय झालें होतें; त्याच्या चेहऱ्यावरच कांहीं होतें कीं पोषाखांत कीं चालचलणुकींत — मोठ्या दोन मुली चेष्टेनें तोंड वेडावीत निघून गेल्या. छोट्या दोन मुलींनीं हंसें दाबण्याचा प्रयत्न केला, पण हरल्या. आणि दोघीहि अेकमेकींना कोपरखळ्या मारीत फिदी फिदी हंसत पळून गेल्या.

कठोर चेष्टेच्या हास्यानें झऱ्यांचाहि सूर पालटला. त्यांनीं टाळ्या पिटायला सुरुवात केली. प्रवासी बिचारा मान खालीं घालून चालतो आणि विचारतो, 'असलें हें हंसेंच का माझ्या भेटीची किंमत?'

त्या दिवशीं त्याचें रस्त्यावरून अधिक फिरणें झालें नाहीं. घरीं परतला आणि अेकटाच खोलींत बसून पत्र अुघडून वाचूं लागला, 'तुम्ही परत केव्हां येणार? लवकर या, लवकर लवकर या, तुमच्या पायां पडतें.'

## निरूपण — प्रथम चिठ्ठी

कवि जेव्हां मनोव्यापाराच्या नाजुक खुब्या वर्णन करतो तेव्हां बहुधा त्यांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष स्वानुभवच व्यक्त होत असतो आणि त्यामुळें कोणाहि लेखकाचें किंवा कवीचें लिखाण तो ज्या वर्गांत वावरतो त्याच्या वातावरणाला धरूनच असतें. या परिचित वातावरणाच्या तंबोऱ्यावरच त्याच्या कल्पनेचे आरोह अवरोह छेडले जात असतात.

रविबाबूंसारख्या गर्भश्रीमंत आणि राजदरबारी वातावरणांत वावरणाऱ्या व्यक्तीची कल्पनाशक्ति कितीहि जोमदार असो आणि सहानुभूति कितीहि भेदक असो पण दुर्मुखलेल्या गरिबांच्या होणाऱ्या अपमानाची अितकी यथार्थ कल्पना आणि त्यावर सुचणारा अितका विलक्षण पण रामबाण तोडगा या कवीच्या डोक्यांत आला तरी कसा याचें आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं. खरोखर या कवीची सहानुभूति विश्वगामी दिसते. मानवजातीच्या सगळ्याच प्रकारच्या मनोभूमिकेचे पापुद्रे स्वत:च्या मनांत त्यानें सांठवून ठेवले असले पाहिजेत. अितकी विश्व-वेदिता पूर्वजन्मींच्या साधनेवांचून सिद्ध होअूं शकत असेल काय ? असाहि प्रश्न मनांत आल्यावांचून रहात नाहीं.

असा प्रश्न अुठण्यास हें अेकच रेखाचित्र कारणीभूत नाहीं. हीच शक्ति अनेक ठिकाणीं प्रत्ययास आलेली आहे.

# रथयात्रा

रथयात्रेचा दिवस जवळ आला.

राणी राजाला म्हणाली, ‘चला, रथ पहायला जाअूं या.’

राजा म्हणाला, ‘अुत्तम.’

अश्वशाळेंतून अश्व बाहेर पडले, हस्तिशाळेंतून हत्ती. मेणेपालख्यांची रीघ लागली आणि मागेंपुढें चालूं लागले भालदार चोपदार, दास दासी.

मागें राहिला काय तो अेकच जण; ज्याचें काम होतें राजवाड्यांत केरसुणीच्या काठ्या पुरविण्याचें.

सरदार त्याचेजवळ येअून कनवाळूपणानें म्हणाला, ‘अरे, यायचें असेल तर ये ना.’

हात जोडून तो म्हणाला, ‘माझें येणें व्हायचें नाहीं.’

राजाच्या कानीं गोष्ट गेली — सगळेच येताहेत पण अेकटा हा दुःखीच तेवढा येत नाहीं.

राजा दयार्द्र होअून मंत्र्याला म्हणाला, ‘त्यालाहि बोलावून घ्या.’

राजमार्गाच्या कडेलाच दुःखीचें घर होतें. मंत्र्याचा हत्ती तेथें पोंचतांच त्यानें त्याला बोलावून विचारलें, ‘अरे दुःखी, देवाची स्वारी बघायचीय ना? चल.’

दुःखी हात जोडून म्हणाला, ‘कुठवर चलीन? देवाच्या दारापर्यन्त पोचायचें का माझ्या भाग्यांत आहे?’

मंत्री म्हणाला, ‘भीति कुणाची रे तुला? राजाबरोबर तर तूं चलणार.’

तो म्हणाला, ‘बाप रे बाप. राजांची वाट ती का माझी वाट?’

मंत्री म्हणाला ‘मग तुझी वाट काय? देवाची स्वारी बघाय तुझ्या नशिबीं नाहीं वाटतें?’

तो म्हणाला, 'नाहीं कसें? देवाची स्वारी तर रोजच रथांत बसून माझ्या दारीं येत असते.'

मंत्र्याला हसूं आलें. म्हणाला, 'तुझ्या दारीं रथाचीं चिन्हें कुठें आहेत?'

दुःखी म्हणाला, 'देवाच्या रथाचीं चिन्हें अुमटत नसतात.'

मंत्री म्हणाला, 'कां बरं?'

दुःखी म्हणाला, 'कारण ते पुष्पक रथांत बसून येत असतात.'

मंत्री म्हणाला, 'मग कुठें आहे रे तो रथ?'

दुःखीनें दाखविलें — त्याच्या दाराच्या दोन्ही बाजूला दोन सूर्यमुखी फुलल्या आहेत.

## निरूपण — रथ-यात्रा

आपल्याला वाटतें कीं राजाचें वैभव पुष्कळ असल्यामुळें राजाचें जीवन समृद्ध असलें पाहिजे, पण तें तसें नसतें. घरांत ज्याप्रमाणें मेज, खुर्च्या, पलंग वगैरे अुपकरणें वाढलीं म्हणजे हिंडण्या फिरण्याची जागा आणि मोकळीक कमी होते, त्याचप्रमाणें वैभव आणि अैश्वर्य यांची गर्दी झाली म्हणजे जीवन बरेचसें संपुष्टांत येतें. अशा राजानें देवदर्शन घ्यावयाचें तें राजाच्या पद्धतीनेंच घ्यावें लागतें. राजाच्या आसपास जसें बाहेरचें लटांबर असतें तसें तो राजा आहे अेवढ्याच मुळें त्याचें मानसिक लटांबरहि पुष्कळ असणार. अशा परिस्थितींत राजाला देवदर्शन बेताचेंच घडतें.

गरिबांचें तसें नाहीं. त्यांच्याजवळ लोकांवर गाजविण्यासाठीं सत्ताहि नसते आणि अुपभोग करण्यासाठीं मालमत्ताहि नसते. त्यांच्या जीवनांतील ही पोकळी भरून काढण्याला त्यांना देवच आणावा लागतो आणि जीवनांत यथेच्छ अवकाश असल्यामुळें तेथें देवहि मुबलक मावूं शकतो.

गरिबांचा आहार ओबडधोबड. पण त्यांची भूक असते कडाक्याची. राजाच्या ताटांत पंचपक्वान्नें भरलेलीं असतात. पण राजाची भूक असते मेलेली. दोन घास पोटांत अुतरले तर सुदैव. राजा जेवढें खातो तेवढेंच जर गरीब खाअूं लागतील तर त्यांची अुपासमारच व्हावयाची.

राजदरबारांत शोभेसाठीं जसें अेखादें फुलपात्र असावें त्याचप्रमाणें राजाच्या जीवनांत देवाला स्थान असतें. गरिबांना स्वतःचें सगळेंच जीवन भरून काढावयाचें असतें देवानें. जीवन अीश्वरमय होतें म्हणूनच त्यांना जगतां येतें.

राजाला वर्षांतून अमुक अमुक दिवशीं मंदिराकडे जाअून मूर्तीचें दर्शन घ्यावयाचें असतें. गरिबांच्या घरीं अीश्वर आपण होअून येत असतो. आणि गरिबांना तो रोजच हवा असतो. मात्र देवाचा हा अभिसार असल्यामुळें आल्या-गेल्याचा तो मागमूस राहूं देत नाहीं.

सूर्यमुखीचीं मोठीं मोठीं वाटोळीं पिवळीं फुलें म्हणजे भगवंताचीं सुवर्ण रथचक्रेंच होत. फुलांच्या रथांत बसून भगवान रोज आपल्या घरीं येत असतात. पण अितकें सुलभ दर्शन जीवन-दरिद्री धनवानांना कोठून?

# भेट

१

पूजेचें पर्व येऊन ठेपलें. कोठार नाना वस्तूंनीं भरून निघालें. कितीक बनारसी साड्या, कितीतरी दागदागिने, हांडे भरून भरून दूध-दही, आणि ताटें भरभरून पक्वान्नें, मेवा-मिठाई.

आई भेटी धाडत आहे.

मोठा मुलगा दूरदेशीं राजदरबारीं चाकरी करतो, मधला मुलगा सौदागरी करतो. बाकीचे मुलगे आपापसांत भांडून वेगवेगळें घर करून रहातात, आप्तेष्ट कुटुम्बी देशदेशान्तरीं विखुरलेले आहेत.

धाकटें मूल देवडीवर अुभें अुभें बघतें, सबंध दिवसभर भरून भरून भेटी जाताहेत, दासदासींची रांग लागली आहे; ताटांवर ताटें रंगीबेरंगी रुमालांनीं झांकलेलीं आहेत.

दिवस मावळला. भेटी पाठविणें संपलें. दिवसाच्या अखेरच्या नैवेद्याचें सोन्याचें ताट घेऊन सूर्यास्ताची सोनेरी प्रभा नक्षत्रलोकींच्या वाटेवर दिसेनाशी झाली.

२

धाकटें मूल आंत येऊन आईला म्हणालें, 'आई, सगळ्यांनाच तूं भेटी पाठवल्यास. फक्त आम्हांलाच नाहीं ?'

आई हंसत म्हणाली, 'सगळ्यांना सगळें देऊन चुकलें. आतां तुझ्याकरतां काय अुरलें — हें बघ,' म्हणत म्हणत तिनें बाळाचा मुका घेतला.

मुलानें रडकुंडीच्या सुरांत म्हटलें, 'भेट नाहीं मिळणार मला ?'

'दूर जाशील तेव्हां मिळेल.'

'आणि जवळ असलों म्हणजे तुझ्या हातचा जिन्नस मिळायचा नाहीं वाटतं ?'

आईनें त्याला दोन्ही हातांनीं अुचलून कडेवर घेतलें आणि म्हणाली, 'अरे, हाच तर माझ्या हातचा जिन्नस.'

## निरूपण — सओगात

बायबलमधें अुधळ्या बंडखोर मुलाची गोष्ट आहे. अेक मुलगा बापाशीं भांडला. त्यानें बापाकडून आपला हिस्सा मागून घेतला आणि चैनबाजींत अुधळून टाकला. पुढे जेव्हां त्याची अन्नान्न दशा झाली तेव्हां पश्चात्तापानें पोळून निघून तो बापाकडे परत आला आणि म्हणाला, 'मुलगा म्हणून घरीं येण्याचा माझा अधिकार अुरला नाहीं. मला अन्न-वस्त्र देअून घरांत नोकर म्हणून ठेअून घ्या.' बापानें मुलाला छातीशीं धरलें. त्याच्या शरीरावरील चिंध्या काढून टाकून त्याला चांगले कपडे घालायला दिले आणि पक्वान्नें तयार करून मोठा सण केला. हें सर्व पाहून दुसरा भाअू म्हणतो, 'बाबा, मी कधीं बंडखोरपणा केला नाहीं. तुम्हांला सोडून गेलों नाहीं, अुधळपट्टी केली नाहीं. अुर्मटपणानें वागलों नाहीं. पण माझेसाठीं कांहीं कधीं तुम्ही मेजवानी केली नाहीं.'

बाप म्हणाला, 'अरे तूं तर माझा आहेसच. हा मुलगा मला अंतरला होता. तो मला परत मिळाला. म्हणून हा अुत्सव करीत आहें, हें तुला समजलें पाहिजे.'

मुलगा वयानें मोठा होता. बापाची भावना समजूं शकला.

प्रस्तुत गोष्टींतील भूमिका निराळी असली, तरीहि वरील बायबलच्या गोष्टीचें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं.

जे दूर गेले आहेत, मग ते मनानें दूर गेले असोत किंवा दूरदेशी गेले असोत, त्यांना रोज भेटतां येत नाहीं. त्यांची सतत, अखंड सेवा घडत नाहींत. हा विषाद आणि हा विरह भरून काढण्यासाठीं आपण विशिष्ट दिवशीं मूल्यवान भेटी पाठवतों. जे जवळ आहेत, ते आहेतच. त्यांच्याशीं प्रेमाची देवघेव अखंड चालते. त्यांना भेट देणें म्हणजे नसलेला दुरावा कल्पण्यासारखें होतें. प्रेमाला तें सहन कसें व्हावें?

येथवर सर्व ठीक झालें. मातेची भावना आणि मातेची भूमिका कवीला समजली, आपल्यालाहि समजते. पण त्या लहान अर्भकाचें काय? त्याला हें गूढ तत्त्वज्ञान कसें समजावें?

आपण पुष्कळदां पहातों कीं नातेवाअीक खूप प्रेमानें बालकांचा मुका घेतात आणि मुलें कंटाळून ताबडतोब गाल पुसतात. चुंबनांतील प्रेमापेक्षां त्याचा ओलसरपणा अर्भकांना अधिक जाणवतो. तींच मुलें जरा मोठीं झालीं म्हणजे चुंबनाचा रतीब न मिळाला तर अुदास होतात. आणि अंग धरत नाहींत.

रविबाबूंची गोष्ट आपल्याला खूप आवडली. आअीनें मुलाचा मुका घेतला. त्याला दोन हातांनीं अुचलून अुराशीं धरला. त्याला प्रेमाचा जिन्नस म्हणून संबोधलें. पण त्या बरोबर अेखादा पेढा, अेखादी जिलबी अथवा दोनचार भजीं मुलाला दिलीं असतीं तर आपल्याला तें अधिक आवडलें असतें. मुलाला जी गोष्ट समजत नाहीं तीच सर्वश्रेष्ठ असली तरी मुलाला हिरमुसलें ठेअून तुमच्या आमच्या संतोषानें कवीनें संतुष्ट व्हायला नको होतें.

# मुक्ति

## १

विरहिणीनें आपल्या फूलबागेच्या अेका कडेला वेदी अुभारून त्यावर अेक मूर्ति घडवायला घेतली. तिच्या मनांत जी व्यक्ति वसत होती, बाह्यतः तिचीच प्रतिकृति दररोज थोडी थोडी करून ती घडत असे. फिरून फिरून मूर्तीकडे ती बघायची, कसलासा विचार करायची आणि तिचे डोळे डबडबून यायचे.

पण जें रूप अेके काळीं तिच्या चित्तपटावर सुस्पष्ट होतें तेंच जणूं आतां हळूं हळूं अस्पष्ट होअूं लागलें. रात्रीच्या वेळीं आपल्या पाकळ्या मिटणाऱ्या पद्माप्रमाणें जणूं तिच्या स्मृतीच्या पाकळ्या हळूं हळूं मिटायला आल्या होत्या.

ती तरुणी स्वतःवरच रागवायची, लाजायचीहि. आतां तिची साधना कठोर झाली — चारदोन फळें खाअी, थोडें पाणी पिअी आणि तृणशय्येवरच पडून राही.

आठवणींतून आकृति घडतां घडतां तिची नेमकी प्रतिकृति वठेना. भास व्हायचा कीं ही अेखाद्या विशिष्ट व्यक्तीची मूर्ति नव्हे. जसजशी तिची कसोशी वाढे तसतशी तफावतहि अधिक वाढे.

आतां ती त्या मूर्तीला अलंकारांनीं सजवूं लागली, अेकशे अेक पद्मांनीं तिची पूजा करूं लागली, संध्याकाळीं तिचे समोर सुगंधी तेलाचा दिवा लावूं लागली. तो दिवा सोन्याचा होता आणि तेल मोलाचें होतें. रोजरोज अलंकारांत भर पडूं लागली. पुजेच्या अुपकरणांनींच वेदी झांकून निघे, मूर्तीचें अस्तित्वच जाणवे ना.

## २

अेका मुलानें जवळ येअून तिला म्हटलें, 'आम्हांला खेळायचंय.'

'कुठें ?'

'त्या तिथें — तुम्ही तुमची बाहुली सजवून ठेवली आहे ना तिथें.'

तरुणी त्याला दटावीत म्हणाली, 'तिकडे कधींच खेळायला मिळणार नाहीं.'

दुसरें अेक मूल येअून तिला म्हणालें, 'आम्हांला फुलें तोडायचींत.'

'कुठलीं ?'

'तुमच्या बाहुलीच्या घराला लागून जें चांफ्याचें झाड आहे ना त्यावरचीं.'

तरुणी त्याला हांकलून लावीत म्हणाली, 'त्या फुलांना कुणी शिवूंहि शकणार नाहीं.'

आणखी अेक मूल येअून म्हणालें, 'दिवा धरून आम्हांला वाट दाखवा ना.'

'दिवा कुठून आणूं ?'

'तुमच्या बाहुलीच्या घरांत जळतो तो ?'

तरुणी त्याला पिटाळून लावीत म्हणाली, 'तो दिवा तेथून हलवणें शक्य नाहीं.'

३

मुलांची अेक टोळी जाते तर दुसरी येते.

तरुणी त्यांचा हलकल्लोळ अैकते, त्यांचें नाचणें बागडणें पहाते. चार क्षणांपुरती अन्यमनस्क होते. तोंच चमकून लाजतेहि.

मेळ्याचे दिवस जवळ आले.

पडोसचा म्हातारा तिचेकडे आला, म्हणाला, 'पोरी, मेळा बघायला येतेस ना ?'

तरुणी म्हणाली, 'मला कुठेंच जायचें नाहीं.'

सख्या येअून म्हणाल्या, 'चल कीं, मेळा बघायला.'

तरुणी म्हणाली, 'मला वेळ नाहीं.'

लहानगें पोर येअून म्हणालें, 'मला मेळा बघायला घेअून चल ना.'

तरुणी म्हणाली, 'येतां यायचें नाहीं मला. येथें पूजाअर्चा करायची असते.'

४

अेके दिवशीं गाढ झोंपेंतच जणूं तिच्या कानीं पडला समुद्र-गर्जने-सारखा शब्द. थव्याथव्यांनीं देशदेशचे लोक निघाले आहेत. कुणीं रथांतून तर कुणीं पायीं — कुणी पाठीवर ओझें घेअून तर कुणी आपलें ओझें फेंकून देअून.

पहांटे जेव्हां तिची झोंपमोड झाली तेव्हां यात्रेकरूंच्या गाण्यामुळें पाखरांचें गाणें अैकूं येणें दुरापास्त झालें. सहसा तिच्या मनानें घेतलें कीं तिलाहि जायला हवें.

तोंच तिला आठवलें, 'मला तर पूजाअर्चा करायची असते. मी जाअूं म्हटलें तरी जायची सोय नाहीं.'

मग ती धांवतच निघाली आपल्या बागेकडे — तिनें मूर्ति सजवून ठेवली होती तिकडे.

पहाते तों मूर्ति कुठें? वेदीवरूनच वाट फुटली आहे. लोकांच्या झुंडीमागून झुंडी जाताहेत, खळ कसा तो पडतच नाहीं.

अिथें ज्याची स्थापना करून गेलें होतें तो कुठा'य?

कुणीसें जणूं तिच्या कानांत गुणगुणलें, 'जे निघाले आहेत त्यांच्यांत.'

अितक्यांत लहानगें पोर येअून म्हणालें, 'माझा हात धरून चल ना.'

'कुठें?'

मूल म्हणालें, 'मेळा बघायला तुम्हीहि येणार ना?'

तरुणी म्हणाली, 'होय, मीहि येअीन म्हणतें.'

ज्या वेदी समोर येअून ती बसत असे तिचेवरूनच तिची वाट झाली, आणि जो मूर्तीमध्यें झांकला गेला होता तोच तिला सगळ्या यात्रेकरूंच्या रूपांत सांपडला.

## निरूपण — मुक्ति

या लहानशा गोष्टींत गोंवलेला प्रसंग रविबाबूंचा अत्यंत आवडता विषय आहे. अनेक कवितांतून आणि नाटकांतून त्यांनीं तो कुशल हातानें हाताळला आहे.

कवींनीं आध्यात्मिक क्षेत्रांत होणारी ही महान् युगक्रांति ओळखली आणि ती नवीन पिढीच्या मनावर कशी ठसवूं अशी हुरहुर त्यांना लागली. त्या हुरहुरीनें अनेक रूपें धारण केलीं आहेत. गीतांजलींतील अत्यंत लोकप्रिय गीत 'भजन पूजन साधन आराधना समस्त थाक् पडे' ही कविता घ्या किंवा 'राजार मतन साजाये तुमि' या मातेला अुद्देशून लिहिलेली कविता घ्या भाव तोच आहे. मंदिराच्या अंधाऱ्या गर्भगृहांत, ध्यानाच्या हृदयगह्वरांत किंवा वैराग्याच्या शून्य अेकाकिते-मधें भगवानाचें, आपल्या अिष्ट देवतेचें दर्शन होणार नाहीं. अमीर आणि गरीब जेथें अेकत्र होतात, आबालवृद्ध सर्व भेद विसरतात अशा मानवी मेळ्यांत, राजपथावर, यात्रेच्या समुदायांत जीवन कृतार्थ होतें आणि भगवंतांचें दर्शन होतें. सर्वांशीं अेकरूप होणें, स्वतःला विसरून जाणें हा प्रेमयुक्त निःस्वार्थ सेवेचा मार्गच खरा आहे, विश्वात्मैक्याचा नित्य अनुभव करणें ही खरी साधना आहे. सुतकी विरक्ति ही खरी साधना नसून निरपवाद अनुरक्ति आणि प्रेमैक्याची मस्ती हीच खरी साधना आहे ही युगवाणी कवींनीं परोपरीनें गायिली आहे.

वैराग्य साधने मुक्ति से आमार नया.

# परीचा परिचय

१

राजपुत्राचें वय विशी ओलांडायला आलें. देशविदेशाहून विवाहाच्या सांगण्या येअूं लागल्या.

पुरोहित म्हणाले, 'बाल्हिक राजाच्या मुलीचें रूप म्हणजे रूप आहे. जणूं पांढऱ्या गुलाबांची पुष्पवृष्टीच.'

राजपुत्र तोंड फिरवून बसे, अुत्तरच देत नसे.

दूत येअून म्हणाला, 'गांधार राजाच्या मुलीच्या अंगाअंगांतून लावण्य ओसंडत आहे, जणूं द्राक्षलतेवरील द्राक्षांचा घोसच.'

राजपुत्र शिकारीच्या मिषानें वनांत निघून जाअी. दिवस गेला, आठवडा गेला तरी परतत नसे.

आणखी अेक दूत म्हणाला, 'काम्बोजच्या राजकन्येला ह्या पाहूनच येतों आहें. पहांटेच्या क्षितिजरेषेप्रमाणें बांकदार आहेत तिच्या पापण्या, दंवानें स्निग्ध, प्रकाशानें अुज्ज्वल.'

राजपुत्र भर्तृहरीचें शतक वाचूं लागे, पोथीवरून डोळे वरच अुचलीत नसे.

राजा म्हणाला, 'कां बरं असं करतो? बोलवा बघूं मंत्र्याच्या मुलाला.'

मंत्र्याचा मुलगा आला. राजा म्हणाला, 'तूं तर माझ्या मुलाचा सवंगडी आहेस. तो लग्नाविषयीं अितका अुदासीन कां तें खरें खरें सांग पाहूं.'

मंत्रीपुत्र म्हणाला, 'महाराज, जेव्हांपासून तुमच्या मुलानें परीस्तानाची गोष्ट अैकली आहे तेव्हांपासून त्याच्या मनानें घेतलें आहे कीं लग्न करावें तर परीशींच.'

२

राजानें हुकूम सोडला कीं परीस्तानाचा शोध लावायलाच हवा. जाडे जाडे पंडित पाचारण्यांत आले. जिथें जिथें जितक्या म्हणून पोथ्या मिळाल्या त्या सर्वच त्यांनीं पालथ्या घातल्या. मान हलवीत

म्हणाले, 'पोथ्यांच्या कोणत्याहि पानावर परीस्तानाचा पत्ता मिळत नाहीं.'

तेव्हां राजसभेंत सौदागरांना आणण्याचें फर्मान सुटलें. ते म्हणाले, 'समुद्रपारचीं कितीतरी द्वीपें आम्ही पालथीं घातलींत. अेला द्वीप, मरीच द्वीप, लवंग-लतांचा देश. आम्ही जातों मलयद्वीपीं चंदन आणायला, मृगनाभी-कस्तूरीच्या शोधांत जातों कैलासींच्या देवदारूवनीं. पण कुठेंहि परीस्तानाचा पत्ताच लागला नाहीं आजवर.'

राजा म्हणाला, 'बोलवा मंत्र्याच्या मुलाला.'

मंत्रीपुत्र आला. राजानें त्याला विचारलें, 'परीस्तानाची कहाणी राजपुत्रानें अैकली तरी कोणाकडून?'

मंत्रीपुत्र म्हणाला, 'तो आहेना अेक नवीन वेडा, जो हातांत बांसरी घेअून वनोवनीं हिंडत असतो. राजपुत्र शिकारीला जातो ना तेव्हां अैकतो तो त्याच्याजवळ परीस्तानाच्या गोष्टी.'

राजा म्हणाला, 'असं होय? बोलवा मग त्याला.'

नवीन वेडा मूठभर वन्य फुलांचा नजराणा ठेअून राजासमोर अुभा राहिला. राजानें त्याला विचारलें, 'परीस्तानाची माहिती तुला कुठून मिळाली?'

तो म्हणाला, 'तिथें तर मी नेहमींच जात येत असतों.'

राजानें विचारलें, 'ती जागा आहे तरी कुठें?'

वेड म्हणाला, 'तुमच्या राज्याच्या सीमेवरील चित्रगिरि पहाडाच्या पायथ्याशीं काम्यक सरोवराच्या कांठीं.'

राजानें प्रश्न केला, 'तिथें पऱ्या दिसतात का?'

वेडा म्हणाला, 'दिसतात, पण ओळखल्या जात नाहींत. कारण त्या छद्मवेशांत असतात. केव्हां केव्हां जेव्हां त्या निघून जातात तेव्हां आपली ओळख ठेअून जातात. मग त्यांना पुनः धरून आणण्याचा मार्गच अुरत नाहीं.'

राजानें विचारलें, 'मग तूं त्यांना कसा काय ओळखतोस?'

वेडा म्हणाला, 'कधीं अेखादा सूर अैकून, कधीं अेखादा प्रकाश पाहून.'

राजा त्रासून म्हणाला, 'येथून तेथून सगळाच वेडेपणा आहे. द्या याला घालवून.'

३

वेड्याची गोष्ट राजपुत्राच्या मनीं खोल जाअून रुजली.

फाल्गुनमासीं डहाळी डहाळी वरून शालफुलांची कोण झुंबड; आणि शिरीषाच्या फुलांनीं तर वनाचा कोनाकोपरा शहारून सोडला होता.

राजपुत्र चित्रगिरीवर जाण्यासाठीं अेकटाच निघाला.

सर्वांनीं विचारलें, 'कुठें जाता आहांत?'

त्यानें कांहींच अुत्तर दिलें नाहीं.

गुहेंतून अेक झरा निघून काम्यक सरोवराला जाअून मिळाला होता. खेड्यांतले लोक त्याला म्हणत 'अुदास–झरा'. त्या झऱ्याच्या कांठीं असलेल्या अेका पडक्या मंदिरांत राजपुत्रानें आपलें ठाणें मांडलें.

महिना अेक निघून गेला. झाडाझाडावर फुटलेल्या पालवीचा रंग आतां गाढ होअूं लागला होता आणि फुलांच्या सड्यानें वनपथ झांकले गेले होते. अशा समयीं अेके दिवशीं पहांटेच्या स्वप्नांत राजपुत्राच्या कानीं बांसरीचा अेक सूर पडला. जाग येतांच राजपुत्र म्हणाला, 'आज भेट होअील वाटतें.'

४

तसाच घोड्यावर चढला आणि झऱ्याच्या कांठाकांठानें काम्यक सरोवराच्या तीरीं येअून पोंचला. पहातो तों, पहाडी लोकांची अेक पोर पद्मवनाच्या कडेला — पाण्यांत पाय सोडून पायांच्या हालचालीनें तरंग अुठवीत पद्मांना नाचवीत — बसली होती. तिची घागर भरलेली होती. पण तिचें घाटावरून अुठण्याचें लक्षण दिसत नव्हतें. सांवळी पोर.

कानावरील काळ्या कुळकुळीत केसांमध्यें तिनें अेक शिरीषाचें फूल माळलें आहे. गोरज मुहूर्तावर अुगवलेला जणूं पहिला ताराच.

राजपुत्र घोड्यावरून अुतरला आणि म्हणाला, 'तुझ्या कानावरलें तें शिरीष फूल देतेस का मला ?'

जी हरिणी भयभीत होत नसते, तीच जणूं ही हरिणी. मान वेळावून तिनें अेक वेळ राजपुत्राच्या तोंडाकडे निरखून पाहिलें. तेव्हां तिच्या काळ्याभोर डोळ्यांवर अेक कशाची तरी छाया अधिकच काजळून निघाली — झोंपेंतलें स्वप्नच जणूं तें अेक, दिगन्तावर जणूं प्रथम श्रावण मेघांचा संचार.

कानावरील फूल काढून घेअून राजपुत्राच्या हातांत देत मुलगी म्हणाली, 'हें घे.'

राजपुत्रानें तिला विचारलें, 'कुठली ग तूं परी आहेस मला खरें खुरें सांग.'

हें अैकून अेकदां तिच्या चेहऱ्यावर विस्मय चमकून गेला. त्यानंतर आश्विनांतल्या अकल्पित वृष्टीप्रमाणें तिचें अेकसारखें हसण्यावर हसणें, जें कांहीं केल्या ओसरेचना.

राजपुत्राला वाटलें, 'आपलें स्वप्न फळलें खरें — या हास्याचा सूर बांसरीच्या त्या सुराशीं कसा मिळता आहे.'

राजपुत्र घोड्यावर चढला आणि आपले दोन्ही हात पुढें करून म्हणाला, 'ये.'

ती त्याचा हात धरून घोड्यावर चढून बसली; मागचा पुढचा कसलाच विचार तिला आला नाहीं. पाण्यानें भरलेला तिचा घडा घाटावर तसाच पडून राहिला.

शिरीषाच्या डहाळीवरून कोकिळेचा स्वर आला, 'कुहू – कुहू – कुहू.'

राजपुत्रानें मुलीला हळूंच कानांत विचारलें, 'काय ग तुझं नांव.'

ती म्हणाली, 'माझें नांव काजरी.'

अुदास झऱ्याच्या कांठच्या त्या पडक्या मंदिरांत दोघेंहि आलीं. राजपुत्र म्हणाला, 'आतां तुझा हा छद्मवेश फेंकून दे.'

ती म्हणाली, 'आम्ही अरण्यांतील मुली. आम्हांला हो छद्मवेश कसला ?'

राजपुत्र म्हणाला, 'मी तुझें परीचें स्वरूप पाहूं अिच्छितों.'

परीचें स्वरूप ! पुन: तेंच हंसूं आणि हंसूंवर हंसूं. राजपुत्र विचार करूं लागला, 'हिच्या हास्याचा सूर या झऱ्याच्या सुराशीं अगदीं मिळतो. तेव्हां ही झाली माझी झरीची परी.'

५

राजाच्या कानीं बातमी पोंचली कीं राजपुत्राचें परीशीं लग्न झालें. राजवाड्यांतून घोडे आले, हत्ती आले, मेणे पालख्या आल्या. काजरीनें विचारलें, 'हें सर्व कशासाठीं ?' राजपुत्र म्हणाला, 'तुला आतां राजवाड्यांत यावें लागणार.'

तिचे डोळे पाणावले. आतां तिला आठवलें, तिची घागर तिथेंच सरोवराच्या कांठीं पडून आहे; तिला स्मरलें, आपण आपल्या घरच्या अंगणांत गवती बीं वाळत ठेअून आलों आहोंत; तिला आठवलें, तिचे वडील, तिचा भाअू शिकारीला गेले आहेत, त्यांचीं आतां परतण्याची वेळ झाली आहे; तिला आठवण झाली, तिच्या लग्नाचा अहेर द्यायचा म्हणून तिची आअी झाडाखालीं माग लावून कापड विणत आहे आणि गुणगुणत गाणें गात आहे.

ती म्हणाली, 'नाहीं. मला नाहीं यायचं.'

परंतु ढोल वाजले, ताशे झडले, वाजली सनअी, वाजली बांसरी. तिचे शब्द कुणालाच अैकूं गेले नाहींत.

मेण्यामधून अन्त:पुरासमोर काजरी जेव्हां अुतरली तेव्हां पट्टराणी कपाळावर हात मारून म्हणाली, 'अशी कशी हो ही परी !'

राजाची मुलगी म्हणाली, 'अिश्‌, शरम वाटते बाअी !'

पट्टराणीची दासी म्हणाली, 'परीचा वेश पण वेशच आहे.'

राजपुत्र म्हणाला, 'चूप बसा. तुमच्या घरीं परी छद्मवेशांत आली आहे.'

६

दिवसामागून दिवस जाअूं लागले. राजपुत्र चांदण्या रात्रीं अंथरुणांत जागून अुठून बघे कीं काजरीचा छद्मवेश कांहींसा गळून पडला आहे किंवा नाहीं. दिसून येअी कीं काळ्या मुलीचे काळेभोर केस कसे मोकळे पडलेले आहेत. आणि तिचा देह म्हणजे काळ्या पाषाणाची अगदीं अणी-शुद्ध कोरीव प्रतिमाच जणूं. राजपुत्र शान्त मनानें विचार करी, 'शेष रात्रीच्या अंध:काराआड लपलेल्या अुषेप्रमाणें माझी ती परी कुठें लपून राहिली ?'

राजपुत्र आपल्या स्वकीयांसमोर लज्जित झाला. अेके दिवशीं तो मनांतल्या मनांत थोडा रागावलाहि. पहांटे जेव्हां काजरी बिछाना सोडून जाअूं लागली तेव्हां तिचा हात जोरानें घट्ट धरीत राजपुत्र म्हणाला, 'आज तुला सोडणार नाहीं. आपलें खरें रूप दाखव. मला पहायचें आहे.'

या गोष्टी अैकून वनामध्यें जसें हास्य स्फुरलें होतें, तसलें हास्य आतां मात्र स्फुरेना. पहातां पहातां तिचे डोळे डबडबून आले.

राजपुत्र म्हणाला, 'तूं मला अशीच शेवटपर्यन्त फसवीत रहाणार होय ?'

ती म्हणाली, 'नाहीं, या पुढें नाहीं.'

राजपुत्र म्हणाला, 'मग येत्या कार्तिकी पौर्णिमेला परी सर्वांना दिसूं दे.'

७

पौर्णिमेचा चंद्र आतां मध्य आकाशांत झळकत आहे. राजवाड्याच्या महाद्वारावरील नौबतीनें मध्यरात्रीचा मंद-मधुर सूर छेडला.

राजपुत्र वराचा साज सजून हातांत वरमाळ घेऊन अन्तःपुरांत आला, परी-वधूशीं आज त्याची शुभदृष्टि व्हायची आहे.

शयन मंदिरांत अंथरुणावर शुभ्र आच्छादन होतें. त्यावर होती पांढऱ्या शुभ्र कुन्द कळ्यांची शेज; आणि त्यावर खिडकींतून येणारें शुभ्र चांदणें पडलें होतें.

आणि काजरी ?

ती कुठेंच नव्हती.

तिसऱ्या प्रहरची सनअी वाजली. चंद्र पश्चिमेकडे ढळला. अेक अेक करतां सर्व राजपरिवारानें घर भरून निघालें.

'परी कुठें आहे ?'

राजपुत्र म्हणाला, 'निघून जाऊनच पऱ्या आपला परिचय ठेऊन जातात. मग पुनः त्यांचें दर्शन घडत नसतें.'

## निरूपण — परीर परिचय

कांहींच थांग लागूं न देतां फक्त चुटपुट लावणारी ही अेक सुंदर गोष्ट आहे. नवीन वेड्यानें (हें नांवहि मोठें मौजेचें आणि नवीन आहे.) जाहीर केलें कीं अमुक अमुक ठिकाणीं पऱ्या आहेत, पण दिसतात तोंपर्यन्त ओळखतां येत नाहींत. आतां असें म्हणणारा वेडा, का त्याच्या म्हणण्याचा खरा अर्थ न समजणारे लोक वेडे, याचा विचारच केला पाहिजे.

त्रिकालदर्शी पुराणकारांनीं सांगून ठेवलें आहे कीं हिमालयाच्या पलीकडे मेरुपर्वत म्हणून अेक सोन्याचा पर्वत आहे. जे स्वर्ण-लोभी असतील त्यांना तो मातीचा दिसतो आणि जे संतोष-धन सुवर्ण-निस्पृह आहेत त्यांना मात्र तो सोन्याचा असलेला दिसतो.

हिमालयाच्या पलीकडे नव्हे पण हिमालयांतच नंदादेवी म्हणून अेक सुवर्णशिखर मीं पाहिलें आहे. त्यावेळेपुरता तरी मी संतोष-धन आणि सुवर्ण-निस्पृह होतों. संध्याकाळची वेळ होती, आकाश स्वच्छ होतें आणि नंदादेवीच्या शिखरावर सूर्याचीं सौम्य किरणें पडून त्यानें नंदादेवीचें सुवर्ण-शिखर प्रकाशित केलें होतें. तुम्ही जर सुवर्णलोभी असाल तर मला हंसून म्हणाल — नंदादेवीचें शिखर धोंड्यांमातीचेंच आहे, त्याचेवर नेहमीं बर्फ पडलेला असतो. तें शिखर नेहमीं पिठाच्या ढिगासारखें दिसतें. कापसाच्या ढिगासारखें म्हणा वाटल्यास. त्याला हस्तिदंताचीं, संगमरवरी दगडाची, वाटेल ती अुपमा द्या. संध्याकाळीं जेव्हां सूर्यकिरणें तिरपीं होतात तेव्हां साहजिकपणें नंदादेवीचें शिखर सोन्यासारखें चकाकूं लागतें. तुम्हीं मानत असाल कीं तुमचीच दृष्टि शाबूत आहे. मी म्हणेन — धनलोभी जगाची ती दृष्टि. तिला शुद्ध कसें म्हणतां येअील? मला तर तें शिखर अगदीं तापलेल्या सोन्यासारखें दिसलें. पण माझें म्हणणें तुम्हाला पटावयाचें नाहीं. न पटो. पण दुर्गासप्तशतीच्या कर्त्या ऋषीचें

म्हणणें तर तुम्हाला पटेल ना? तोहि मजप्रमाणेंच नंदा भगवती-विषयीं म्हणतो —

कनकोत्तम-कान्तिस्सा सुकान्ति-कनकाम्बरा।
देवी कनक-वर्णाभा कनकोत्तम-भूषणा।।

नवीन वेड्यानें सांगितलें — कामना जेथें अत्यंत अुद्दीपित होते अशा काम्यक सरोवराच्या कांठीं पऱ्या हिंडतांना दिसतात. त्या हजर असतांना पऱ्या म्हणून ओळखतां येत नाहींत. त्या समोरून नाहींशा झाल्या म्हणजेच ओळखतां येतें कीं आपल्याला परींचें दर्शन घडलें.

राजवाड्याच्या रुद्ध वातावरणांत वाढलेल्या राजपुत्राच्या मनानें घेतलें कीं आपण अेखाद्या अशा परीशीं विवाह करावा. त्याला परीस्तान सांपडलें, परीहि सांपडली. 'शुक्ति-रजत्' न्यायानें कां होअीना, ज्याला रुपें सांपडलें तो स्वतःपुरता तरी धनवानच आहे आणि जर त्याची ही समजूत कधींहि दूर झाली नाहीं तर तो अखंड धनवानच असणार. राजपुत्र जर काम्यक सरोवराच्या कांठीं कायमचा रहाता तर त्याला कधींहि खरें दर्शन न देणारी परी मिळालीच होती. पण बिचारा होता दोन परस्पर–विरोधी जगांचा रहिवाशी. त्याला राजधानीला जावें लागलें. आअी बाप, बहीण भाअू, दास दासी या सर्वांच्या जगाचा आणि स्वतःच्या परी-जगाचा मेळ घालणें त्याच्या नशिबीं आलें. नवीन वेड्याला ठाअूक होतें कीं असा मेळ बसूं शकत नाहीं. तो स्वतः वेडा असेल. पण त्याचें सूत्र शहाणपणाचें होतें. त्यानें स्पष्ट केलें होतें कीं पऱ्या दिसतात पण ओळखतां येत नाहींत. त्या नष्ट झाल्यानंतरच त्यांना ओळखावयाचें असतें.

नातेवाअिकांच्या कुतूहलानें राजपुत्राच्या मनाची अस्वस्थता वाढविली. त्यानें परीला आग्रह केला. आणि स्वतःचें रूप प्रगट करण्यासाठीं पुरेशी मुदतहि दिली. 'तुझी प्रतारणा यापुढें मी सहन करणार नाहीं,' असेंहि त्यानें बजावलें. बिचारीनें डबडबणाऱ्या डोळ्यांनीं तें कबूल केलें.

तिनें स्वतः चालवलेली अशी प्रतारणा नव्हतीच कीं जी तिनें परत घ्यावी. पण राजपुत्रानें स्वतः होऊन करून घेतलेल्या प्रतारणेमधून तिला मुक्त व्हावयाचें होतें. ती गेली. केव्हां गेली, कशी गेली, कुठें गेली, पळून गेली का मरून गेली हे प्रश्न विचारूं नका. ती गेली हें खरें. बिचारी मुक्त झाली. प्रतारणेपासून आणि चार दिवसांच्या राज-विलासी, अस्वस्थ सुख-स्वप्नांतून.

आणि राजपुत्राची प्रतारणा म्हणा किंवा समजूत म्हणा किंवा अनुभूति म्हणा, दृढ झाली, कीं आपली झरीची परी परीधर्माला जागली खरी. अदृष्ट होऊनच तिनें आपल्या परीपणाचा परिचय दिला.

चर्मचक्षूनें आणि तर्कबुद्धीनें पहाणारे म्हणतील गोष्ट जितकी करुण तितकीच सोपी आहे. राजपुत्र अेका वेड्याच्या नादीं लागून वेडा झाला. चांगल्या चांगल्या अप्सरेसारख्या राजकन्या सांगून आलेल्या त्यानें सोडून दिल्या आणि वन्यप्रदेशांतील अेका खेडवळ मुलीला परी समजून तिच्याशीं लग्न केलें. तेथें जर तो सामान्य तरुण म्हणून कायमचा राहिला असता तर कदाचित् खरोखरच त्याला परीस्तानचें सुख मिळालें असतें. खेडवळ मुलीला वाटलें काममोहित झालेला हा तरुण ठराविक पद्धतीनें आपली स्तुति करीत आहे. तिला वाटलें कीं हा खरोखरच आपलेवर प्रेम करीत आहे. जो कल्पनावेडा होता तो तिला प्रेमवेडा वाटला आणि म्हणूनच मागचा पुढचा कसलाच विचार न करतां ती त्याचेबरोबर निघाली. हा राजपुत्र आहे असें तिला कसें समजावें? पुढें जेव्हां हत्ती घोडे, पाअिक प्यादे, पालखी मेणा अित्यादि लवाजमा तिनें पाहिला तेव्हां ती गोंधळली. तिला प्रेमजीवन हवें होतें. धन-जीवन नको होतें. तिनें सांगितलें — मी सरळ आरण्यक आहें. छद्मवेश जाणत नाहीं. पण तशानें राजपुत्राची खात्री थोडीच होणार होती?

तिला जबरदस्तीनें राजवाड्यांत नेण्यांत आलें. तेथें कोणीच तिचा स्वीकार करीनात. आणि राजपुत्र? तिला दिसून आलें कीं राजपुत्रानें तिच्याशीं लग्नच केलें नव्हतें. तिच्यामध्यें भासणाऱ्या परीशीं त्यानें लग्न लावलें होतें. बिचारीची फसगत झाली ती वेगळी. आणि तिच्यावर आरोप आला कीं ती प्रतारणा करणारी

परी आहे. तिनें हेंहि पाहिलें कीं शब्दांनीं सांगून राजपुत्राला कांहीं समजणार नाहीं. त्याला **monomania** झाला आहे. त्याला अेका कल्पनेचें वेड लागलें आहे. बिचारी खेडवळ मुलगी. फसगतींतून अुत्पन्न होणारी निराशा कोणाशीं बोलून दाखवावी म्हटलें तर जीवाभावाचें येथें कोणी नाहीं, सल्ला देणारें दूरच राहो. ज्याचेशीं लग्न केलें तो आपल्याला ओळखीत नाहीं. अशा स्थितींत तिनें आपलें जीवन भगवंताचे चरणीं वाहिलें आणि आपल्या अश्रूंनीं त्या दानाचें पाणी सोडलें. ती तिथून नाहींशी झाली. कशी नाहींशी झाली याचा तपास करण्याचें देखील राजपुत्राला किंवा कोणालाच सुचलें नाहीं. कारण त्यांचेजवळ अुलगडा तयार होताच — परी होती, अदृश्य झाली.

ती घरीं परत गेली असेल असें कांहीं केल्या मानवत नाहीं. नखरा, कूड-कपट, लज्जा, विभ्रम कांहींच न जाणणारी, सरळ विश्वासानें आत्मार्पण करणारी आणि पुढें आलेला हात धरून घोड्यावर बसणारी बिचारी काजरी. अेवढा मोठा आघात झाल्यानंतर पुनः पूर्वीच्या जगांत जाणें तिला शक्यच नव्हतें. ती भगवंताच्या चरणीं गेली हेंच खरें.

खरोखर या अेका लहानश्या गोष्टींत दोन प्रचंड शोकांतिका (**tragedies**) सामावलेल्या आहेत. वेडानें भारलेल्या राजपुत्रासारख्या तरुणाशीं लग्न करून काजरीप्रमाणेंच नष्टजीवन झालेल्या तरुणी जगांत कितीतरी असतील. त्यांना आणि त्यांची फसगत होअूं देणाऱ्यांना ही रूपकथा अर्पण असो.

# प्राण आणि मन

## १

माझ्या खिडकी समोरून लांबवर गेला आहे लाल मातीचा रस्ता. त्याचेवरून भारानें भारावलेली बैलगाडी चालते, संथालांच्या मुली डोअीवर गवताचा भारा घेअून हाटीं बाजारीं जातात, संध्याकाळीं हंसत खिदळत घरीं परततात.

परंतु माणसांच्या या रहदारीच्या रस्त्यावर आज माझें चित्त नाहीं. जीवनाचा जो अंश अस्थिर, नाना चिंतांनीं अुद्विग्न, नाना कर्मचेष्टांमुळें चंचल, तो आज माझ्या पुरता झांकला गेला आहे. कारण आज माझें शरीर आहे रुग्ण आणि मन आहे निरासक्त.

लाटांचा समुद्र म्हणजे वरवरचा समुद्र; आंत आंत अगदीं तळाशीं जिथें पृथ्वीची गभीर गर्भशय्या असते तिथल्या गोष्टींचा या लाटा आपल्या घोटाळ्यानें विसर पाडतात. लाटा जेव्हां शांत होतात तेव्हां समुद्र आपल्या गोचराबरोबर अगोचराशीं आणि आंतल्या तळाबरोबर वरच्या तळाशीं अखंड अैक्यामध्यें स्तब्ध होअून विराजतो.

त्याचप्रमाणें माझ्या सचेष्ट प्राणाला जेव्हां सुटी मिळाली तेव्हां त्या खोलांतल्या प्राणामध्यें मला स्थान मिळालें, जिथें आहे विश्वाच्या आदिकालाचें लीलाक्षेत्र.

जोंपर्यन्त वाटसरू पथिक होतों तोंपर्यन्त रस्त्याच्या कडेच्या त्या वटवृक्षाकडे पहाण्याअितकाहि मला अवसर मिळत नसे; आज रस्त्याला विसरून खिडकीसमोर आलों तेव्हां त्याची माझी दृष्टभेट घडली.

माझ्या तोंडाकडे पाहून तो अधून मधून जणूं अस्थिर होअी आणि जणूं म्हणूं पाही, 'लक्षांत आलं नाहीं होय ?'

मी आश्वासन देत म्हणालों, 'सगळं कांहीं लक्षांत येतं, सगळं कांहीं अुमजतं. तूं असा अुगीच व्याकुळ मात्र होअूं नकोस.'

तो पुनः अंमळ शान्त होतो. पण पुनः लगेच अधिकच अस्थिर होतो आणि तीच पूर्वीची झळझळ, सळसळ, खळखळ चालूं लागते.

पुनः त्याला मी गोंजरल्यागत म्हणालों, 'होय रे, तुझीच गोष्ट खरी आहे. मीहि तुझाच खेळगडी खरा. लक्षावधि वर्षांपासून याच मातीच्या घरकुलांत मीहि घोटाघोटांनीं सूर्याचा प्रकाश प्यालों आहें, धरती-मातेच्या स्तन्य-रसामधेंहि मी तुझा भागीदार होतोंच.'

तेव्हां सहसा त्याच्या अंतरांतून वाहणाऱ्या वाऱ्यामधून शब्द अैकूं येत, 'हो हो हो'. जणूं बोलत आहे तो.

जी भाषा रक्ताच्या सळसळाटाच्या स्वरानें माझ्या हृत्पिंडांतून गुंजते, जी प्रकाश आणि अंधकाराचा निःशब्द आवर्तन ध्वनि होय, तीच भाषा त्याच्या पर्णापर्णांतून मर्मराच्या रूपानें मजजवळ येअून पोंचते. ही भाषाच चराचर विश्वाची खरी, अधिकृत भाषा होय.

'आहें, आहें; मी आहें; आम्ही आहोंत.' हाच या भाषेचा मूलभूत संकेत आहे.

ही अेक अत्यंत आनंदाची गोष्ट होय. या आनंदानें विश्वांतील अणुपरमाणु सुद्धा थयथया नाचत असतात.

आज त्या वटवृक्षाबरोबर माझा त्याच अेकमेव भाषेंत, त्याच अेकमेव आनंदाच्या गोष्टीचा परस्पर विनिमय चालला आहे.

तो मला म्हणतो, 'आहेस ना रे बाबा?'

मी पडसाद देतों, 'आहें कीं रे, जिवलगा.'

अशा प्रकारें 'आहे' ची 'आहे' शीं अेकाच तालांत अेकसारखी टाळी वाजत आहे.

२

त्या वटवृक्षाबरोबर जेव्हां माझें संभाषण चाललें होतें, ते वसंताचे दिवस होते. त्याचीं पानें कोंवळीं होतीं. त्यांच्या असंख्य फटींतून निसटून आलेला आकाशांतला पळपुटा प्रकाश गवतावर पडून पृथ्वीवरील त्यांच्या छायेला गुपचुप आलिंगनें देत होता.

त्यानंतर आषाढी मेघ येऊन पोंचले; त्याच्या पानांचा रंग मेघांप्रमाणेंच घन झाला. आज त्याच पर्णराजि अनुभवी माणसांच्या बुद्धिप्रमाणें गहन झाल्या आहेत. त्यांच्या कुठल्याहि फटींतून बाहेरच्या प्रकाशाच्या प्रवेशाला अवकाशच उरला नव्हता.

तेव्हाचें झाड होतें गरिबा घरच्या मुलीप्रमाणें; आजचें झालें आहे श्रीमंता घरच्या गृहिणीप्रमाणें; जणूं परिपूर्ण परितृप्त चेहरा.

आज सकाळीं तो आपला पाचूचा वीस पदरी हार झळाळीत मला म्हणाला, 'डोक्यावर असा दगडाविटांचा बुरखा ओढून कशाला बसला आहेस? माझ्याप्रमाणें अगदीं पुरेपूर बाहेर येना.'

मी म्हणालों, 'माणसाला आंत बाहेर अशा दोन्ही बाजू सांभाळून चालावें लागतें.'

झाड हलत डुलत म्हणालें, 'कांहीं कळत नाहीं बुवा.'

मी म्हणालों, 'आम्हांला दोन जगें आहेत, अेक आंतलें नि अेक बाहेरलें.'

झाड म्हणालें, 'बापरे, मग आंतलें जग असतें तरी कुठें?'

'आमच्या स्वतःच्याच घेराव्यांत.'

'तिथें काय करीत असतोस?'

'सृष्टि रचीत असतों.'

'सृष्टीची रचना आणि घेराव्यांत! काय बोलतोस तें समजणें-कठिण.'

मी म्हणालों, 'जशी तीरांमध्यें बांधली जाऊनच नदी होते त्याच-प्रमाणें घेराव्यामध्यें घेरली जाऊन सृष्टीची रचना होते. अेकच वस्तु घेराव्यांत सांपडली, म्हणजे कुठेंशी ती होते हिऱ्याचा खडा तर कुठेंशी होते वटवृक्ष.'

झाड म्हणालें, 'तुझा तो घेरावा घेरावा आहे तरी काय?'

मी म्हणालों, 'तें आहे माझें मन. त्यामधें जें जें घेरलें जातें तेंच नवनव रूपानें सृष्ट होऊन बाहेर येतें.'

झाड म्हणालें, 'तुझी ती कुंपणानें घेरलेली सृष्टि माझ्या चंद्र-सूर्यांच्या समोर केवढीशी दिसत असेल.'

मी म्हणालों, 'चंद्रसूर्यांच्या मापानें तिचें माप काढतां येत नाहीं. कारण चंद्रसूर्य आहेत बाहेरच्या वस्तु.'

'मग कोणत्या मापानें मापतां येअील ?'

'सुखाच्या मापानें — विशेषें करून दुःखाच्या.'

झाड म्हणालें, 'हा पूर्वेचा वारा माझ्या कानीं कानीं बोलतो, आणि माझ्या प्राणा-प्राणांतून त्याला अुत्तर मिळतें. पण तूं ज्या कशाची गोष्ट बोललास ती मात्र मी मुळींच समजूं शकलों नाहीं.'

मी म्हणालों, 'आणि तें समजावूं तरी कसें ? तुझ्या त्या पूर्वेच्या वाऱ्याला माझ्या कुंपणामधें घेरून वीणेच्या तारेंत बांधून ठेवतों, तेव्हां तोच वारा अेक सृष्टि सोडून अेकदम दुसऱ्याच अेका नव्या सृष्टींत जाअून पोंचतो. ही सृष्टि कोणत्या आकाशांत जाअून वसते — कोणत्या विराट् चित्ताच्या स्मरणाकाशांत, हें मलाहि माहीत नसतें. वाटतें कीं वेदनेचें अेक वेगळेंच आकाश असावें. आणि तें मापानें मोजण्याजोगें नसतें.'

'आणि त्याचा काळ ?'

'त्याचा काळहि घटनेचा काळ नसतो. त्याला वेदनेचा काळ म्हणायला हवा. आणि म्हणूनच तो काळहि संख्येच्या मर्यादेबाहेरचा असतो.'

'दोन दोन आकाश आणि दोन दोन काळांत वावरणारा प्राणी आहेस तूं, भारीच अद्‌भुत. पण तुझी ती आंतली गोष्ट मात्र मुळींच लक्षांत येत नाहीं.'

'न का येअीना.'

'माझ्या बाहेरच्या गोष्टी तरी तुला नीट कळतात का ?'

'तुझ्या त्या बाहेरच्या गोष्टी माझ्यांत शिरून ज्या गोष्टींचीं रूपें धारण करतात, त्यांना 'कळणें' मानलें तर कळणें, गान मानलें तर गान, कल्पना मानल्या तर कल्पना.'

३

झाड आपल्या सर्व शाखा प्रशाखा अुंचावून म्हणालें, 'जरा थोडा थांब. पण तूं आपला भारीच कीस काढीत बसतोस, आणि तुझी टकळीहि बरीच बरीच चालते.'

त्याचें म्हणणें अैकून मला वाटलें, 'बेटा म्हणतोय तर खरंच.'

मी म्हणालों, 'चूप बसावं म्हणून तर येतो तुझ्याजवळ, पण बेटी जन्मखोड चूप बसल्याबसल्याहि जीभ वळवळायला लावतेच; जसे कुणी कुणी झोंपेंतहि चालतात ना, तसेंच.'

मी कागद पेन्सिल भिरकावून दिली आणि त्याच्याकडे अनिमेष नेत्रांनीं पहातच राहिलों. त्याचीं नितळ पानें अेखाद्या अुस्तादाच्या बोटांप्रमाणें प्रकाश-वीणेवर द्रुतताल छेडूं लागलीं.

सहसा माझें मन म्हणालें, 'हें जें सगळें तूं पहातोस आणि हें जें सगळें मी कल्पितों–चिंतितों यांच्या मधला दुवा आहे तरी कुठें?'

मी त्याला धमकावीत म्हणालों, 'पुनः तुझे प्रश्न? चूप बैस.'

मी गप्प बसलों आणि स्थिर दृष्टीनें पहात राहिलों. असाच वेळ वाहूं लागला.

झाड म्हणालें, 'मग समजलास ना सगळं?'

मी म्हणालों, 'होय, समजलों.'

४

तो दिवस असाच मुकाटपणानें घालविला.

दुसरे दिवशीं मनानें मला विचारलें, 'काल त्या झाडाकडे पहातां पहातां अचानक कांहीं तरी बोलून गेलास, "समजलों; समजलों." काय समजलास रे, सांग पाहूं.'

मी म्हणालों, 'आपल्यांतच मनुष्याचा प्राण नाना नाना कल्पनांनीं कसा अगदीं गढूळ झाला आहे. म्हणूनच प्राणाचें खरें निखळ रूप पहावयाचें झालें तर पहावें लागतें त्या गवताकडे, त्या झाडाकडे.'

'काय पाहिलेंस?'

'पाहिलें कीं हा प्राण आपल्यांतच आपला कोण आनंद अनुभवतोय! आपल्याच पानांपानांतून, फुलांफुलांतून, फळाफळांतून किती काळजीपूर्वक त्यानें किती किती तरी आकार धारण केले आहेत, किती किती तरी रंग माखले आहेत, किती तरी गंध आणि किती तरी रस! म्हणूनच त्या वडाकडे बघून शांतपणें बोललों होतों, 'हे वनस्पते, पृथ्वीवरील प्रथम प्राण्यानें जन्मल्याबरोबर जो आनंदध्वनि केला होता, तोच तुझ्या शाखांशाखांतून प्रगट होत आहे. तेंच आदि युगाचें सरल हास्य तुझ्या पानांपानांवर झळकत आहे. माझ्यांतलाहि तोच प्रथम प्राण आज अस्वस्थ झाला आहे. कल्पनेच्या जाळ्यांत तो आजवर बन्दी होअून पडला होता. तूं त्याला आज साद घातलास, म्हणालास, "अरे येना रे असा प्रकाशांत, वाऱ्यांत; आणि माझ्याप्रमाणेंच घेअून येना तुझी ती रूपाची कुंचली, रंगांच्या वाट्या, रसांचे प्याले".'

माझें मन क्षणभर चूप बसलें. नंतर कांहींसें दुःखित होत्सातें म्हणालें, 'तूं त्या प्राणाच्या गोष्टींचेंच सारखें केवढें स्तोम माजवीत असतोस आणि मी जो हा अेवढा मोठा अुपकरणांचा मेळावा गोळा केला आहे त्याच्या गोष्टी तितक्याच खुलवून खुलवून कां बोलत नाहींस?'

'त्याच्या गोष्टी त्या काय बोलायच्या! त्यानें स्वतःच स्वतःच्या टंकारानें, झंकारानें, हुंकारानें, केंकारानें आकाश कंपायमान करून सोडलें आहे. त्याच्या भारानें, त्याच्या गुंतागुंतीनें, त्याच्या जंजाळानें पृथ्वीचें हृदय कसें अगदीं व्यथित झालें आहे. सुचत सुद्धा नाहीं कीं याचा अंत आहे तरी कुठें. थरावर आणखी कितीतरी थर चढायचे आहेत, गांठीवर आणखी किती गांठी बसायच्या आहेत कोण जाणे. अशा सर्वच प्रश्नांचीं अुत्तर होतीं त्या झाडाच्या पानापानांत.'

'अस्सं होय! काय अुत्तरें होतीं सांग ना.'

'तो म्हणतो, प्राणविरहित जें तें सगळें मात्र स्तूप, सगळें केवळ ओझें. प्राणाचा स्पर्श झाला मात्र कीं अुपकरणें अुपकरणांत आपोआपच समावून जातात आणि त्यांचें अेक अखंड असें सुन्दरसें रूप बनतें. तोच सुन्दर नटला आहे असा वनविहारी होअून आणि त्याचीच बांसरी वाजते आहे त्या या वडाच्या छायेछायेंतून.'

५

ती केव्हांची तरी कोणतीशी अुत्तर रात्र होती.

प्राणानें आपली सुप्तिशय्या सोडली आणि या निश्चेष्ट जगाच्या विस्तीर्ण मैदानामधून अज्ञाताच्या शोधार्थ तो पहिल्या प्रथमच बाहेर पडला होता.

या वेळेपर्यन्त त्याचें शरीर नव्हतें झालें क्लान्त कीं नव्हती शिवली त्याच्या मनाला कसलीच चिन्ता. त्याच्या राजपुत्राच्या वेषावर नव्हती चढली धूळ कीं नव्हतें पडलें छिद्र.

आजच्या या आषाढाच्या सकाळीं, त्याच अक्लान्त, निश्चिन्त, अम्लान प्राणाचें दर्शन घडलें, त्या वडाच्या झाडामध्यें. आपल्या शाखा डोलवीत त्यानें म्हटलें, 'नमस्कार.'

मी म्हणालों, 'गड्या राजपुत्रा! मरुदैत्याबरोबरचा तुझा लढा कसा काय चालला आहे सांग पाहूं.'

तो म्हणाला, 'अुत्तम चाललाय. अेकदां चहूंकडे नीट न्याहाळून पहा ना.'

न्याहाळून पाहिलें—अुत्तरे कडील मैदान तृणानें आच्छादित झालेलें आहे. पूर्वेकडील शेत अंकुरांनीं फुललेलें आहे. दक्षिणेकडील तळ्याच्या कांठा कांठानें ताडांची रांगच्या रांग फैलावली आहे, तर पश्चिमेकडील भाग शाल–ताल–मोहानें आणि आम-जाम-खजूरानें अितका कांहीं खचून भरला आहे कीं दिगंताचे तोंडहि दिसायची मारामार.

मी म्हणालों, 'राजपुत्रा, धन्य आहेस तूं. तूं कोमल आहेस तसा किशोरहि आहेस, आणि दैत्य जितका प्रवीण तितकाच कठोरहि आहे; तुझी मूर्ति लहान, तुझा भाता लहान, आणि तुझे तीरहि लहान, आणि तो म्हणजे कोण अजस्त्र; त्याचें चिलखतहि जाड आणि त्याची गदाहि चांगलीच भरभक्कम. तरीहि तुझीच ध्वजा सर्वत्र फडकत असलेली दिसत आहे. दैत्याच्या पाठीवर तूं आपला पाय भरभक्कम

रोंवला आहेस. खडक तुझ्यापुढें नरम येतात, आणि धुळीनें तर जणूं कायमची शरणचिठ्ठीच लिहून दिली आहे.'

वड म्हणाला, 'तूं अित-अितका समारोह पाहिलास तरी कुठें ?'

मी म्हणालों, 'तुझा लढा म्हणजेच शान्ति, तुझें सतत कर्म म्हणजेच विश्रांति. तुझा विजय दिसतो नम्रतेच्या मूर्तींत. आणि म्हणूनच तर तुझ्या छायेखालीं साधक येअून बसतात, तुझा तो सहज आणि सोपा असा युद्ध-जयाचा मंत्र आणि तितक्याच सहजतेनें अधिकार-प्राप्त असा तह समजून शिकून घेण्यासाठीं. प्राण हें सगळें कशा पद्धतीनें करीत असतो त्याचें शिक्षण देणाऱ्या पाठशाला तूं अरण्या अरण्यांतून अुघडल्या आहेस आणि म्हणूनच जे क्लान्त, ते तुझी छाया शोधतात; जे आर्त, ते तुझी वाणी अैकायला येतात.'

माझी ही सगळी वाखाणणी अैकून वडाच्या अंतरांतला पुरुष भारीच खुश झाला, आणि म्हणाला, 'मी तर मरुदैत्याशीं लढा घ्यायला म्हणून बाहेर पडलों आहेंच, पण माझा अेक धाकटा भाअूहि कोणत्या तरी लढ्याच्या मोहिमेवर कुठेंतरी निघून गेला आहे. त्याचा आजवर मला कांहींच पत्ता कसा तो लागला नाहीं. कांहीं वेळापूर्वी तूं त्याचीच का गोष्ट बोलत होतास ?'

'होय, त्यालाच आम्ही 'मन' असें नांव दिलें आहे.'

'तो माझ्यापेक्षांहि अधिक चंचल वृत्तीचा आहे. कशामुळेंहि त्याला संतोष कसा तो होतच नाहीं. त्या 'चंचला' ची कांहीं खबरबात तूं मला देअूं शकशील काय ?'

मी म्हणालों, 'कां नाहीं, थोडी फार देअूं शकेन कीं. तुझा लढा चालतो जगण्यासाठीं, त्याचा लढा चालतो मिळवण्यासाठीं; आणि कांहींसा दूरवर आणखी अेक लढा चालला आहे तो देअून टाकण्यासाठीं. तुझा लढा तो प्राणहीना—स्थावराविरुद्ध, त्याचा लढा जंगम जोखडा विरुद्ध तर आणखी अेक लढा आहे परिग्रहा—संचयाविरुद्ध. शिवाय लढा तर सारखा गुंतागुंतीचाच होअूं लागला आहे. जो या व्यूहांत शिरला त्याला त्या व्यूहाचा भेद करून बाहेर येण्याचा मार्गच सांपडत

नसतो. हार आणि जीत यांचा पत्ताच लागत नसल्यामुळें जीव कसा भांबावून जातो. आणि अशा या द्विधा परिस्थितींत तुझी ती हिरवी पताका योद्ध्यांना आश्वासनरूप होते आणि म्हणते, "जय होवो, प्राणाचा जय होवो." या गानाची तान सारखी अुंचावतच जाते. कोणत्या सप्तकांतून कोणत्या सप्तकांत चढते कांहींच कळत नाहीं. अशा या स्वर-संकटकाळीं तुझा तंबोरा साधे असे सरळ सूर छेडतो, 'भय नाहीं, भय नाहीं.' आणि पुन: म्हणतो, 'हाच खरा आदिसूर — आदिम प्राणाचा सूर मीं लावून ठेवला आहे. सगळेच अुन्मत्त आलाप याच सुरांतून सुन्दराच्या ध्रुपदांत आनंद-गानीं येअून मिळतात. आणि अशा प्रकारें सर्व मिळणें आणि सर्व देणें फुलांप्रमाणें फुलून निघेल आणि फळांप्रमाणें फलित होअील.'

## निरूपण — प्राण-मन

हातपाय चालवण्याची सोय नसली म्हणजे मनुष्य डोकें चालवतो, कल्पना चालवतो. आकाशांत पंख फडफडवण्याची सोय नसली म्हणजे मनुष्य कल्पनेच्या आकाशांत भराऱ्या मारतो. समुद्रांत बुडी मारून मोती काढतां येत नसले म्हणजे मनुष्य चिंतनांत बुडी मारून तत्त्व-मौक्तिकें बाहेर काढतो. प्रवास करण्याची मना असली म्हणजे मनुष्य स्मरणानें त्रिखंड हिंडून येतो. रविबाबू आजारी पडले आणि अंथरुणाला खिळले म्हणजे तत्त्व-चिंतनाच्या भराऱ्या मारूं लागतात. भौतिक तत्त्वज्ञान, गूढ मनोव्यापार, साधकांचे आदर्श विहार यांच्या वातावरणांत ते वावरूं लागतात.

या विहारासाठीं आजारीच पडलें पाहिजे असें नाहीं. पाय बांधून प्रवास करण्याची सोय मनुष्याजवळ आहे. जेव्हां तो वाहनांत बसतो किंवा जहाजावर आरूढ होतो, तेव्हां तुरग-गतीपेक्षां वेगानें जात असूनहि त्याला अगदीं कोंडल्यासारखें होतें. शरीराचा वेग खुंटला म्हणजे मनाचा वेग वाढतो. जणूं काय वाहनाची गति डोक्यांत शिरते. अशाच कारणामुळें रविबाबूंनीं 'पश्चिम यात्रीर डायरी' लिहून काढली आहे. केव्हां केव्हां अडकून पडले म्हणजे ते गोष्टीहि लिहितात. मला वाटतें अशा प्रसंगीं लिहिलेल्या गोष्टींमध्यें देखील वर सांगितलेलें वातावरण दिसत असलें पाहिजे.

रविबाबू म्हणतात, समुद्राचें पाणी अशान्त असलें म्हणजे त्याच्या पृष्ठभागावर लाटा येतात, त्याचा आरशासारखा पारदर्शक चेहरा सुरकुतून जातो आणि मग वरवरच्या तुफानाच्या आंत कशा प्रकारची गंभीर परिस्थिति आहे याचा मागमूस लागत नाहीं. तेंच पाणी जेव्हां संथ होतें तेव्हां वरची, मधली, खालची आणि तळाची अशा सगळ्याच खोल्या पारदर्शक होतात आणि अितिहासाचीं सर्व युगें अेकदमच प्रकट व्हावींत किंवा सरळ बोगद्याच्या भिंती या टोकापासून त्या टोकापर्यन्त अेकदमच चपट किंवा सपाट झालेल्या दिसाव्यात तशासारखें मनो-व्यापाराचें आणि सृष्टि-व्यापाराचें युगपत् दर्शन होतें.

त्यांच्या घराजवळ अेक पुराणपुरुष अुभा आहे. लोक त्याला अश्वत्थ म्हणतात. कवि त्याला प्राणाचा आद्य आणि सनातन अवतार मानतात. त्या प्राणदेवतेशीं कवीची मनोदेवता बोलूं लागली. दोहोंच्या भूमिका निरनिराळ्या. चित्राला ज्याप्रमाणें मूर्तीची खोली कळत नाहीं, मूर्तीला ज्याप्रमाणें सजीव व्यक्तीचें चैतन्य अुमगत नाहीं, सचेतनाला ज्याप्रमाणें आत्म्याचा साक्षात्कार दुर्लभ असतो, त्याचप्रमाणें हा अ-सम-सहयोग होता. कवींनीं यांतून अेक सुंदर आणि बोधप्रद रूपकथा निर्माण केली आहे. कथा म्हणण्यापेक्षां वार्तालाप किंवा प्रसंग म्हटलेलें बरें.

प्राणाला अस्तित्वाचा, विस्ताराचा आणि अहं-प्रत्ययाचाच आनंद असतो. चवचाल मन याच्या पुढें जातें. त्याला सर्व कांहीं समजून घ्यावयाचें असतें. प्रत्येक वस्तूवर आपला अधिकार बसवावयाचा असतो, प्रयोग करून पहावयाचा असतो. तोडण्या-घडण्याची भानगड केल्यावांचून त्याचा क्षणहि जात नाहीं. दिवाणखान्यांत मुलांच्या कोलाहलापुढें आजीची गोष्ट कानीं पडणें जसें कठीण होतें, तसेंच मनाच्या या चुळबुळीमुळें, अुपद्-व्यापामुळें किंवा अुठाठेवीमुळें प्राणाची सार्वभौम क्रिया ध्यानांतच येत नाहीं.

मनुष्याचें मन अुद्विग्न झालें, निराशेनें घेरलें गेलें आणि जीवन-पराङ्मुख झालें तरीहि मनुष्य आत्महत्या कां करीत नाहीं याचें कारण अेवढेंच कीं मनाचा व्यापार जीवन-सागराच्या केवळ पृष्ठभागावरील वादळासारखा आहे. त्या सागराच्या आंत खोलवर प्राण आपल्या सनातन संतोषानें नांदत आहे. तो जोंवर गडबडला नाहीं तोंवर आत्महत्येचा संकल्प मनांतल्या मनांतच रहावयाचा.

प्राणाची मुख्य क्रिया म्हणजे त्याचा स्वाश्रय होय. मनुष्य मेला असतां त्याला अुचलायला चार माणसें लागतात, कारण त्याचा देह अर्थात् मुडदा हें अेक ओझें असतें. पण तेंच शरीर जिवंत असलें म्हणजे तें स्वत:ला सांभाळतें, अितकेंच नव्हें तर सहजासहजीं अुड्याहि मारतें; अितरांचें ओझेंहि अुचलूं शकतें आणि कर्तबगारीचा आत्मविश्वास वाढतांच नृत्याच्या द्वारा प्राणानंद कलात्मक रीतीनें प्रकट करतें. हत्तीला धावतांना कधीं पाहिलें आहे काय? त्याच्या पायांना आपल्या

शरीराचें ओझें मुळींच वाटत नाहीं. लहान मुलें ज्या आनंदानें अुड्या मारतात तोच आनंद हत्तीच्या धावण्यांत दिसून येतो. खरोखर प्राण हा स्वाश्रयी आहे. तो प्राण निघून गेला म्हणजे मागें रहाणारें कलेवर 'सर्वंसहा' भूमीला देखील भाररूप होअून जातें.

रविबाबूंना प्राण आणि मन या दोन तत्त्वांच्याच गोष्टी करावयाच्या होत्या. त्यांत देखील त्यांना ठाअूक होतें कीं प्राणाला मन ही वस्तु अज्ञेय आहे. प्राणाचा तो धाकटा भाअू अतिशय चंचल, नेहमीं अस्वस्थ आणि संतोषाला पारखा. त्याचें आंतरिक जग प्राणाला कसें कळावें? आणि म्हणूनच रविबाबूंनीं प्राण आणि मन यांच्या पलीकडील तिसऱ्या आत्म-तत्त्वाचा केवळ ओझरता अुल्लेख करून सोडून दिलें आहे. प्राणाचा आनंद असण्यांत आहे. मनाचा आनंद मिळविण्यांत आहे आणि आत्म्याचा आनंद सोडण्यांत, त्यागांत आहे (त्यक्तेन भुञ्जीथाः). तिघांच्या या तीन निष्ठा आहेत. तिसऱ्या निष्ठेचा, मननाच्या पूर्णतेपुरता ओझरता अुल्लेख करून ते विराम पावले आहेत.

तत्त्वज्ञानाला कलेचें रूप कसें द्यावें याचा ही कृति सुन्दर नमुना आहे. मात्र ती सुन्दर असली तरी परिपूर्ण असल्याची तृप्ति देत नाहीं. शेवटीं शेवटीं 'त्यागाचें कायसेसें सांगून गेले आहेत तें त्यांना पुनः अेकदां विचारलें पाहिजे, त्यांचेकडून पुनः अेखादी कृति मिळाली पाहिजे' अशी चुटपुट लागून रहाते. यांतच या कृतीची सार्थकता असेल.

कृतार्थता न मिळाल्यामुळेंच ही सार्थकता अुत्पन्न झाली असावी.

# स्वागत-गीत (आगमनी *)

१

तयारीची धावपळ चालूंच आहे. यांत रिकामपणाला अेवढाहि वाव नाहीं कीं चार दोन क्षण काढून विचार करावा कीं कशाची आहे ही सर्व तयारी.

कामाच्या अशा भरगच्च अवस्थेंतहि मी मनाला डिवचून म्हणालों, 'कोणी येणार आहे होय ?'

मन म्हणालें, 'थांबरे. मला जागेचा कबजा घ्यायचा आहे. सामानाची जुळवाजुळव करायची आहे. घर सोपे माडया बांधायच्या आहेत. अशा वेळीं आलतू फालतू प्रश्नांनीं भंडावूं नकोस.'

पुन: मी आपला चुपचाप कामाला लागलों. विचार येतो कीं जागेचा कबजाहि मिळेल, सामानासुमानाची जुळवाजुळव संपेल, घर सोपे माडया बांधायच्याहि बाकी अुरायच्या नाहींत, तेव्हां कदाचित मला अखेरचें अुत्तर मिळेल.

जागा तर सारखी वाढतेच आहे; सामानासुमानाची अुणीवहि तशी भासत नाहीं, अिमारतीचे सात मजलेहि पूर्ण झाले. तेव्हां मी म्हणालों, 'आतां तरी माझ्या प्रश्नाचें अुत्तर द्या कीं.'

मन म्हणालें, 'थांबरे बाबा. मला वेळच नाहीं.'

मी म्हणालों, 'कां ? आणखी जागा हवी होय ? कां आणखी घरं हवींत, कां आणखी कांहीं सामानसुमान हवंय ?'

मन म्हणालें, 'होय, हवंय. हवंय.'

मी म्हणालों, 'अजून पुरेसं झालं नाहीं वाटतं ?'

मन म्हणालें, 'अेवढयांत कसा मावेल ?'

मीं विचारलें, 'काय मावायचें, कोणाला मावायचं ?'

मन म्हणालें, 'त्याविषयीं मागाहून बोलूं.'

---

* बंगाली भाषेंत स्वागत गीतांना 'आगमनी' म्हणतात.

तरीहि मी आपला प्रश्न विचारलाच, 'तो फारच मोठा असेल नाहीं ?'

मन अुत्तरलें, 'खरंच, फारच मोठा आहे तो.'

अेवढी मोठी जागा, अेवढा मोठा वाडा, तोहि पुरायचा नाहीं त्याला, म्हणत म्हणत पुन: धडपडत, नेटानें कामाला लागलों. दिवसाचें जेवण बंद, रात्रीची झोंपहि बंद. जो पाही तो वाहवा करी आणि म्हणे, 'खरा कष्टाळू आहे हा !'

केव्हां केव्हां, कां कुणास ठाअूक, शंका येअी कीं बेटचा मनाला अस्सल गोष्टीचें अुत्तरच ठाअूक नसावें. आणि म्हणूनच कामाचें नांव पुढें करून अुत्तर टाळूं पहात आहे. अधींमधीं अेकअेकदां अिच्छा होते कीं, कामकाज बंद करावें नि कान लावून अैकावें कीं रस्त्यावरून कुणी येत तर नाहीं ना ? अशीहि अिच्छा होते कीं, आतां घर सोपे माडयांच्या भरीस न पडतां घरांत दिवा करावा, आणि सामानासुमानाची जुळवा-जुळव, सारवासारव करीत बसण्यापेक्षां फुलें अुमलायच्या आधींच अेखादी माळ गुंफून ठेवावी.

परंतु धीर कांहीं होत नाहीं. कारण माझा मुख्य कारभारी आहे माझें मन. तो रात्रंदिवस अेकसारखा आपलें दांडी-पारडें (तराजू) आणि माप-काठी ( गज ) घेअून वजनाच्या मानानें आणि गजाच्या मापानें सर्व वस्तूंची पारख करतो आणि सारखा बरळत असतो, 'आणखी न मिळालें तर चालायचें नाहीं.'

'कां चालायचें नाहीं ?'

'तो फार फार मोठा आहे ना, म्हणून.'

'कोण आहे हा फार फार मोठा ?'

बस, चिडिचप्प. अेक चकारहि नाहीं.

जेव्हां मी त्याला धरून बसतों नि म्हणतों, 'अशी टाळाटाळ करून चालायचें नाहीं, कांहींतरी अुत्तर द्यायलाच हवें.'

तेव्हां तो चिडून म्हणतो, 'अुत्तर द्यायलाच हवें, द्यायलाच हवें म्हणजे काय ? ज्याचा ठावठिकाणा कळत नाहीं, ज्याची खबरबात

मिळत नाहीं, ज्याचा अर्थ समजण्याचीहि मारामार, असल्याच्या गोष्टी पुढें करून तूं माझीं कामं मात्र दिरंगाअीवर टाकतोस. पण आतां माझी ही बाजू बघ बघूं. जाडीं जाडीं प्रकरणं, मोठीं मोठीं भांडणं, लढाया, लाठ्या बरछ्या भाले, शिपाअी शिपुर्डे यांनीं वेटाळ कसा अगदीं गजबजून निघाला आहे; मिस्त्री मजुरांनीं, चुना विटांनीं, लाकुड फाट्यांनीं अगदीं कशी पाय ठेवण्यापुरतीहि जागा ठेवली नाही. सगळं कसं अगदीं स्पष्ट, यांत नाहीं अंदाजाला जागा कीं अिशाऱ्याला मार्ग. मग अितक्या सगळ्याकडे दुर्लक्ष करून वारंवार तोच तो प्रश्न कां म्हणून ? '

हें सगळें अैकलें म्हणजे वाटूं लागतें कीं, 'मनच बेटें शहाणें, मी आपला मठ्ठ.' पुन: टोपल्या भरभरून विटा आणतों आणि रेती चुना कालवीत बसतों.

२

असेच दिवस वाहूं लागले. आणि माझा जमीनजुमला क्षितिजाच्याहि पल्याड गेला. अिमारतीचा पांचवा मजला पूर्ण होअून सहाव्या मजल्याच्या गच्चीची पिटाअी चालली आहे. अशा समयीं अेके दिवशीं पावसाळी ढग विरले — विरळ झाले, काळे ढग पांढरे झाले; कैलासाच्या शिखरावरून भैरवाच्या सुरांतून सुटीचा मोकळा वारा वाहूं लागला; मानस सरोवरांतील पद्मगंधानें दिवसरात्रीच्या दंड-प्रहारांना मधुमक्षिकेप्रमाणें मत्त करून सोडलें. वर दृष्टि वळतांच दिसून आलें कीं, माझ्या या सहामजली अिमारतीच्या अुद्धत भार-संभाराकडे पहात सारें आकाश जणूं हंसत आहे.

मी तर अगदीं व्याकुळ होअून गेलों आणि जो दिसेल त्याला विचारीत सुटलों, 'अहो आज कोणत्या पवन-देवडीवर नौबत झडते आहे सांगा पाहूं.'

ते म्हणत, 'चला चला, आम्हांला कामें आहेत.'

डोक्याभंवतीं कुंदकळ्यांची माळ बांधून कुणी अेक वेडा रस्त्याच्या कडेला अेका झाडाच्या बुंध्याला टेकून चुपचाप बसला होता. तो म्हणाला, 'आगमनीचा स्वर येअून पोंचला आहे.'

मी काय समजलों कुणास ठाअूक, आपला बोलून गेलों, 'मग आतां अुशीर नाहीं तर.'

तो हंसून म्हणाला, 'नाहीं, आलेच समजा.'

लगेच खतावणी-खात्यांत येअून मी मनाला म्हणालों, 'आतां काम बंद करा.'

मन म्हणालें, 'हें काय भलतंच, लोक आळशी म्हणतील ना!'

मी म्हणालों, 'म्हणूं देत.'

मन म्हणालें, 'तुला झालं तरी काय? कांहीं बातमीबितमी लागली आहे कीं काय?'

मी म्हणालों, 'होय, बातमी आली आहे.'

'कसली बातमी?'

पंचाअितच. स्पष्ट कांहीं बोलतां येत नाहीं, पण बातमी आली आहे खरी. मानससरोवराच्या तीरावरून प्रकाशाच्या वाटेनें हंसांचे थवेच्या थवे येअून पोंचलेत.

मन मान हलवीत म्हणालें, 'पण कुठें आहे त्या विराट रथाचें तें शिखर आणि त्याचा तो जंगी समारोह? कांहींच तर दिसत नाहीं कीं अैकूंहि येत नाहीं.'

हां हां म्हणतां आकाशाला कुणी तरी जणूं परीसाचा स्पर्श केला. सुवर्ण-प्रकाशानें चारी दिशा पुंजाळून निघाल्या. कुठून तरी स्वर आला —'दूत आलाय.'

मी जमिनीवर डोकें टेकून दूताला अुद्‌देशून विचारलें, 'आलेत वाटतें?'

चहूं बाजूनें स्वर अुठला —'होय, आले आहेत.'

मन गडबडून म्हणालें, 'काय करावं आतां. माझ्या सहामजली अिमारतीची तर जेमतेम पिटाअी चालली आहे, आणि साज सरंजाम तर अजूनहि येअून पोंचलेला नाहीं.'

अुत्तर मिळालें, 'अरे तोडा, फोडा, मोडा तुमची ती सहामजली अिमारत. करा, अुध्वस्त करा.'

मन म्हणालें, 'कां ? '

अुत्तर आलें, 'आज आगमनाचा दिवस आहे. तुमची ती अिमारत तर छाती फुलवून रस्ता अडवून बसली आहे.'

मन थक्क झालें.

पुनः स्वर निघाले, 'भिरकावून द्या तुमचा तो सारा साज सरंजाम.'

मन म्हणालें, 'कां ? '

'तुमच्या या सरंजामानें गर्दी करून सगळीच जागा अडवून धरली आहे.'

असो. कामाच्या दिवसांत बसल्या बसल्या सहामजली अिमारत अुभी केली. आतां सुटीच्या दिवसांत अेक अेक करीत साही मजले धुळीस मिळवून द्यावे लागत आहेत. कामाच्या दिवसांत हाट बाजारांतून साज सरंजाम आणून जमविला; आतां सुटीच्या दिवसांत त्या सगळ्यालाच रजा द्यावी लागत आहे.

पण कुठें आहे त्या विराट रथाचें तें शिखर आणि त्याचा तो जंगी समारोह ?

मनानें चहूंकडे न्याहाळून पाहिलें.

काय दिसलें असेल त्याला ?

शरद्-प्रभात-कालीन शुक्राची चांदणी.

फक्त अेवढेंच ?

होय, तेवढेंच. शिवाय त्याला दिसलें पारिजाताच्या वनांतील पारिजातांचीं फुलें.

फक्त अेवढेंच ?

होय, तेवढेंच; आणखी त्याला दिसला सकाळच्या वेळीं शेपटी अुडवीत वावरणारा दोयल पक्षी.

आणखीन् काय ?

अेक मूल. तें खळखळ हंसत खिदळत आओची कूस सोडून बाहेरच्या प्रकाशांत धांवत पळत निघून आलें.

तूं आगमन आगमन म्हणून जें कांहीं बोलत होतास तें याचेच विषयीं कां ?

होय, याचेसाठींच तर दररोज सनअी वाजते, पहांटेस अुजाडते.

याचे करितां का अेवढी थोरली जागा हवी होती ?

हो हो, तुझ्या या राजाकरितां हवी सातमजली अिमारत, तुझ्या प्रभूकरितां हवाय घर भरून साज सरंजाम. पण याचेकरितां आहे हें सबंध आकाश, सबंध पृथ्वी.

आणि तो विराट ?

तो तर यांतच, अेवढ्यांतच सामावलेला असतो.

मग हें मूल तुम्हाला कोणता बरं वर देअील ?

तें स्वतःच तर विधात्याचा वर होअून आलें आहे. सबंध जगाची आशा होअून, अभय होअून, आनंद होअून आलें आहे. त्याच्या न दिसणाऱ्या भात्यामध्यें छपलेलें असतें ब्रह्मास्त्र; त्याच्या हृदयांत दडलेली असते अमोघ शक्ति.

मनानें मला विचारलें, 'अगा कवे, कांहीं पहायला मिळालं का, कांहीं अुमगलं का ?'

मी म्हणालों, 'म्हणूनच तर घेतली आहे ना ही सुटी. अितके दिवस वेळच नव्हता. म्हणूनच आजवर पाहूंहि शकलों नव्हतों नि अुमजूंहि शकलों नव्हतों !'

## निरूपण — 'आगमनी'

रविबाबूंनीं जीवनदेवतेची अुपासना केली. पुष्कळ वर्षे केली. आयुष्यभर केली. त्यामुळें त्यांना जीवनदेवतेचें अनेकविध दर्शन घडलें. ज्याप्रमाणें नरसिंह मेहताला श्रीकृष्णाचा रास अेके रात्रीं पहावयास मिळाला आणि त्या रासलीलेचें वर्णन आणि महात्म्य तो जन्मभर गात राहिला त्याप्रमाणें रविबाबूंनीं आपल्या असंख्य गानांतून, अनेक नाटकांतून, कांहीं वेंचीव रूपक-कथांतून आणि आपल्या अुद्बोधक प्रवचनांतून आपल्या आराध्यदेवतेचें परोपरीनें वर्णन केलें आहे.

अुपनिषत्कालीन ऋषींना परब्रह्माचा साक्षात्कार होतांच ते लोकांना सांगत सुटले — लोक हो, तुम्ही ज्याची अुपासना करतां तें खरें परब्रह्म नव्हें, तें कसें आहे तें मी सांगतों, कारण तें मीं जाणलें आहे. ' तदेव ब्रह्म त्वं विद्धि, नेदं यदिदं अुपासते । वेदाहमेतं पुरुषं महान्तम् आदित्यवर्णं तमसः परस्तात् । तमेव विदित्वा अतिमृत्युमेति । नान्यः पन्था विद्यते अयनाय ।।' त्याचप्रमाणें रविबाबू जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांना आणि संस्कृतींना तारस्वरानें सांगतात कीं बापहो, तुमचा रस्ता चुकला आहे. तुमचें जीवनदर्शन अयथार्थ आहे. तुम्हांला वाटतें तसें जीवन जटिल नाहीं. कुटिल तर नाहींच नाहीं. तुम्हीं आडरस्त्यानें जाअून आपली साधना जटिल केली आहे. म्हणूनच तुम्हांला वाटतें कीं जीवनदेवता देखील गूढ आहे. तुमच्या अुपासनेनें जीवनदेवता प्रसन्न व्हायचें बाजूला राहिलें, पण तिचा कोंडमारा होत आहे.

पाश्चात्य संस्कृति विश्वविजयी होत असलेली पाहून जगाचे डोळे दिपले. पाश्चात्यांचें तर डोकेंच फिरलें. अशा वेळीं हें जें मोठें दिसत आहे तें सर्व पोकळ आहे, हा जो जोर दिसतो तो दारूच्या नशेसारखा आहे असें जगाला सांगण्याची ज्या थोड्या महात्म्यांनीं हिंमत केली त्यांतच रविबाबूहि आहेत. मुक्त-धारा, रक्तकरबी वगैरे त्यांचीं नाटकें

तर ह्या संदेश देत आहेतच, पण त्यांचीं कितीतरी प्रवचनें हीच गोष्ट प्रत्यक्षपणें सांगत आहेत. गीतांजलि, नैवेद्य वगैरे कवितासंग्रहांत देखील याच भावाचीं अनेक गीतें सांपडतील.

'आगमनी' या रूपकात्मक संभाषणाचा भावार्थ वर सांगितलेल्या साहित्याच्या परिशीलनानंतर सहज ध्यानांत येतो. येथें कवीनें स्वतःला स्वतःच्या किंवा मानवजातीच्या मनाहून अलग कल्पिलें आहे. मन भौतिक संस्कृति वाढविण्याच्या मागें लागलें आहे. शक्ति वाढवा, संपत्ति, विस्तार वाढवा, डोलाऱ्याची अुंची वाढवा, आंतील सरंजाम वाढवा, वाढवत चला. वाढवण्याला कसलीच मर्यादा ठेवूं नका.

पण हें सर्व कशासाठीं असें जर त्याला विचारलें तर त्याचें अुत्तर असतें कीं तें विचारूं नका. पाश्चात्यांनीं अर्थशास्त्र, समाजशास्त्र, राजकारण, समाजकारण, सगळीं शास्त्रें वाढवलीं, विज्ञानाच्या मदतीनें प्रकृति-विजय केला. पण अेवढा मोठा दिग्विजय मिळवून देखील हें सर्व कशासाठीं याचा मात्र त्यांनीं संतोषकारक विचार केला नाहीं.

केव्हां केव्हां शंका येते कीं या संस्कृतीला जीवन-रहस्य कळलेंच नाहीं. पण तिचा तो मोठा व्याप, तिचें तें सामर्थ्य आणि तिची ती कर्तबगारी सगळें पाहून केव्हां केव्हां वाटतें कीं आपणच मूर्ख, म्हणून आपल्याला हें सर्व पटत नाहीं. अेवढी मोठी तयारी, अेवढा मोठा जगड्व्याळ व्याप, हें सर्व व्यर्थ कसें असेल? पण जी गोष्ट विज्ञानाला समजत नाहीं, तत्त्वज्ञानाला अुमगत नाहीं ती गूढतेचा ठाव पहाणाऱ्या कवीला अंधुक का होअीना पण आपोआप कळत असते. कवीनें मनाची ताबेदारी स्वीकारली असल्यामुळें मन सांगेल तशी वेठ तो करीत राहिला. पण मनांतील शंकेला आणि अेका अज्ञात श्रद्धेला त्यानें मरूं दिलें नाहीं. शेवटीं रात्र पहांटली. आगमनीचीं गीतें अैकूं येअूं लागलीं. नवजीवनाची प्रभात झाली आणि त्यांतून निघालें काय? आकाशांत शुक्राची चांदणी, पृथ्वीच्या पोटांतून अेक लहानसें फूल, या दोहोंमध्यें येरझाऱ्या घालणारें अेक अुत्साहमूर्ति पांखरूं आणि या सर्वांशीं स्वतःचा अभेद अनुभवणारें खेळकर मूल.

सर्वांनाच आश्चर्य वाटलें कीं अेवढी सर्व तयारी आणि त्यांतून अवढासा अगदींच सामान्य नित्यपरिचित अवतार! विजा कडाडल्या नाहींत, भूकंप झाला नाहीं, धूमकेतु अुगवले नाहींत, आकाशपाताळ अेक झालें नाहीं. पहांट फुटावी तशी फुटली, फुलें फुलावीं तशी फुललीं. बातमीदार फुलपांखरांनीं नेहमींप्रमाणें सर्वांच्या मुलाखती घेतल्या. तरीपण आंतून वाटूं लागलें कीं युग-परिवर्तन झालें आहे, नवीन प्राण जन्माला आला आहे. आणि हें सर्व आजवर अुभारलेल्या अिमारतीच्या मदतीमुळें नव्हें तर ती अिमारत वेळींच जमीनदोस्त केली म्हणून! आंधळेपणानें भलीमोठी पूर्वतयारी करावी आणि तीच अडगळ किंवा आडकाठी म्हणून ठरावी.

आजकालची आत्म-विमुख, जीवन-द्रोही, जटिल संस्कृति कितीहि माजली असली तरी शेवटीं तिचें असेंच होणार आहे. आणि तिला जमीनदोस्त केल्यानंतरच तिच्या किमती खतांतून जीवन-देवतेची नित्यनूतन संस्कृति फुलणार आहे.

# स्वर्ग-मर्त्य

## गान

मातीच्या दीपासि लाभतो मातीचाच निवारा
ज्योत तयाची पहावया परि अनिमिष सायंतारा.
स्थिरावते कधिं ज्योत प्रियेच्या व्याकुळ नजरे परी
कधीं थरारे माअुलिच्या भय व्याकुल प्राणांपरी
हीच ज्योत श्यामल धरणीच्या हृदयीं मिणमिण करी
हीच ज्योत पळ चपळ हवेमधिं वेदनार्त, कांपरी
नभीं अुतरला सायंतारा आशीर्वच घेअुनी
अमरशिखा हो व्याकुळ जळण्या मर्त्य दीपकांतुनी.

अिन्द्र —हे सुरगुरो, अेकेकाळीं दैत्यांहातीं आम्ही स्वर्ग गमावला होता. तेव्हां देव आणि मानव मिळून आम्ही स्वर्गाकरितां लढलों होतों आणि स्वर्गाला सोडवून आणलें होतें. परंतु आतांची आमच्यावरची ही विपत्ति त्याहूनहि अधिक मोठी आहे. हा अेक मोठाच चिंतेचा विषय झाला आहे.

बृहस्पति — महेन्द्र, आपल्या म्हणण्याचा मतितार्थच माझ्या नीट ध्यानांत आला नाहीं. स्वर्गावर अशी विपत्ति तरी कोणती येअून पडली आहे कीं आपल्याला तिची अितकी भीति वाटावी ?

अिन्द्र — अहो, स्वर्ग राहिलायच कुठं !

बृहस्पति — म्हणजे, याचा अर्थ तरी काय ? मग आपण आहोंत तरी कुठें ?

अिन्द्र — आम्ही आहोंत आपले सरावाचे जोरावर टिकून. स्वर्ग केव्हां नि कसा क्रमाक्रमानें क्षीण होअून, छाया होअून, लुप्त होअून गेला तें कळलें सुद्धां नाहीं.

कार्तिकेय — असें कसें म्हणतां देवराज ? स्वर्गांतलीं सगळीं अनुष्ठानें तर आपल्या योग्य समारोहानें चालूंच आहेत.

अिन्द्र — अनुष्ठानें नि समारोह अुलट भरमसाट वाढलीं आहेत, दिवस संपतांना जसा सूर्यास्ताचा समारोह वाढतो ना, त्याप्रमाणें. त्यानंतर अंधार. आपल्याला विदितच आहे देवसेनापति ! कीं, स्वर्ग अितका कांहीं मिथ्या झाला आहे कीं, त्याला आतां कोणच्याहि प्रकारच्या विपत्तींचें भय कसें तें अुरलें नाहीं. दैत्यांनीं, अलीअलीकडचीं किती तरी युगें झालीं, त्यावर आक्रमण सुद्धा केलें नाहीं तें ध्यानांत घ्या. आक्रमणा-जोगं अुरलं आहे का कांहीं ? पूर्वीं मधें मधें स्वर्गाचा पराभवहि होअी, तरी स्वर्ग अुरून असे. पण जेव्हांपासून . . . .

कार्तिकेय — आतां आपलें म्हणणें कांहींसें लक्षांत येतें खरें.

बृहस्पति — स्वप्नांतून जाग येतांच जसें स्वप्न पहात असल्याचें ध्यानीं येतें तसेंच अिन्द्राच्या गोष्टी अैकूनहि वाटतें कीं आपण अेका मायेमध्यें होतों जिची धुंदी अजूनहि पूर्णपणें अुतरलेली नाहीं.

कार्तिकेय — मला काय वाटतें तें सांगूं का ? भात्यामधें बाण आहेत व त्या बाणांचा बोजाहि मी वहन करीत आहें. शिवाय सगळें लक्षहि बाणामध्येंच गुंतलेलें असल्यामुळें वाटतें कीं सर्व कांहीं यथा-स्थित आहे. अशा वेळीं जणूं कुणीसें बोललें, ' अेकदां तुमच्या सभोंवार पहा तर खरें. ' पहातों तों शर आहेत पण लक्ष्य करण्याजोगें कांहींच दिसेना. स्वर्गाचें लक्ष्यच हरपलें आहे.

बृहस्पति — कां असं व्हावं बरं ? याचं कारण शोधायला हवं.

अिन्द्र — ज्या मातींतून रस शोषून स्वर्ग आपलीं फुलें फुलवीत असे त्याच मातीशीं असलेला त्याचा संबंध आतां विच्छिन्न झाला आहे.

बृहस्पति — माती असें आपण कोणाला अुद्देशून बोललांत ?

अिन्द्र — पृथ्वीला. आपल्याला आठवतच असेल कीं अेकेकदां मनु-ष्यानें स्वर्गांत येअून देवकार्यांत मदत केली होती आणि देवांनीं पृथ्वीवर अुतरून मनुष्याच्या संघर्षांत अस्त्र धारण केलें होतें. तेव्हां स्वर्ग आणि मर्त्य दोन्ही सत्यरूप झालीं होतीं आणि म्हणूनच त्या युगाला सत्ययुग म्हणत. अशा पृथ्वीशीं स्वर्गाचा संबंधच जर न राहिला तर स्वर्ग केवळ आपल्या अमृताच्या बळावर जिवंत तरी राहील का ?

कार्तिकेय — आणि पृथ्वीसुद्धा जायच्याच बेतांत आहे ना देवराज? आणि मनुष्यहि मातीशीं अितका कांहीं मिसळून गेला आहे कीं त्याचा आपल्या पुरुषार्थावरचा विश्वासहि अुरला नाहीं. केवळ वस्तूचाच काय तो त्याला भरंवसा वाटतो. वस्तूसाठीं सारखी मारामारी, कापाकापी माजली आहे. स्वर्गाचा ओढा नाहींसा झाल्यामुळें आत्मा देखील वस्तूचा भेद करून प्रकाशाकडे धावूं शकत नाहीं.

बृहस्पति — पृथ्वीशीं स्वर्गाचा संबंध पुनः सांधायला हवा.

कार्तिकेय — परंतु ज्या मार्गानें देवगण पृथ्वीवर अुतरत असत, बरेच दिवस झाले, त्या मार्गावरील पावलें देखील लोपलीं आहेत. मला वाटलें होतें, बरेंच झालें. असाहि विचार आला होता कीं, निदान आतां तरी सिद्ध होअील कीं स्वर्ग निरपेक्ष आहे, निरवलम्ब आहे. स्वर्ग आपल्या मध्येंच आपला स्वयं-पूर्ण आहे.

अिन्द्र — अेके काळीं सगळ्यांचाच तसा विश्वास होता. परंतु आतां कळून चुकलें कीं पृथ्वीच्या प्रेमावरच स्वर्ग वांचूं शकतो. नाहींतर स्वर्ग वाळून जायचा. अमृताच्या अभिमानामुळें ही गोष्ट आम्ही विसरलों होतों, म्हणूनच पृथ्वीवर अुतरण्याच्या देवांच्या मार्गाचा मागमूसहि अुरला नाहीं.

कार्तिकेय — दैत्यांच्या पराभवानंतर आम्ही स्वर्गाला कडेकोट बंदोबस्तानें कसून बांधून सुरक्षित राखला होता. तेव्हांपासून स्वर्गाचें अैश्वर्य स्वर्गांतच साचूं लागलें. अितरत्र त्याचा असा अुपयोगहि होअीना कीं त्याचा क्षयहि होअीना. युगानुयुगें निर्विघ्नपणें त्याची सारखी अुन्नतीच होत आली खरी, पण अशानें तो बाहेरच्या अितर सर्वांपासून चांगलाच दुरावत गेला आणि म्हणूनच स्वर्ग आज अगदीं अेकाकी पडला आहे.

अिन्द्र — अुन्नति होवो किंवा दुर्गति होवो. पण ज्या कशामुळेंहि आपल्या अंवती भंवतीशीं आपला विच्छेद घडतो त्यामुळेंच आपल्यांत व्यर्थता येते. क्षुद्रापासून महत् जेव्हां अत्यंत दूरवर निघून जातें तेव्हां त्याचें महत्त्व निरर्थक होअून स्वतःलाच स्वतः तें अेक भाररूप मात्र होअून रहातें. स्वर्गाचा प्रकाश आज आपल्या मातीच्या प्रकाशापासून विलग झाल्यामुळें त्यानें ‘चकव्या’ चें रूप धारण केलें आहे — लोकवस्तीच्या

आटोक्याच्या बाहेर जाऊन तो स्वत:च्याहि आटोक्याबाहेर गेला आहे. मालवून जाण्याच्या शिक्षेपेक्षांहि ही शिक्षा अधिक भयंकर होय. देवलोक स्वत:ला अति-विशुद्ध ठेवायला गेला आणि आपल्याच सोवळेपणाच्या भव्य कोटामध्यें स्वत:ला बंदी करून बसला. तोच दुर्गम कोट फोडून गंगेच्या प्रवाहाप्रमाणें मलिन मर्त्यामध्यें त्याला प्रवाहित करूनच त्याचें बंधन दूर व्हायचें. त्याचें तें स्वातंत्र्याचें वेष्टन छिन्नभिन्न करण्याकरितांच माझें मन आज असें विचलित झालें आहे. स्वर्गाला घेरला राहूं देणें योग्य होणार नाहीं. बृहस्पते, मलिनांबरोबर, पतितांबरोबर, अज्ञान्यांबरोबर, दु:खितांबरोबर त्याला मिसळूं द्यावा लागेल.

बृहस्पति — तर मग आपला काय करायचा विचार आहे?

अिन्द्र — पृथ्वीवर जावें म्हणतों.

बृहस्पति — पण तो जावयाचा मार्गच तर बंद आहे ना. आणि हेंच तर दु:ख आहे.

अिन्द्र — पण देवांच्या स्वरूपांत पृथ्वीवर जाणें कांहीं जुळायचें नाहीं आतां. मनुष्य होअून जन्म घ्यावा लागेल. नक्षत्र जसें तुटून पडून आपला आकाशांतील सर्व प्रकाश आकाशांतच मालवून टाकून माती होअून मातीला आलिंगायला जातें, तसाच मीहि पृथ्वीवर जाअीन.

बृहस्पति — आपल्याला जन्म घेण्याजोगा वंश पृथ्वीवर आहे तरी का?

कार्तिकेय — वैश्य आजकाल राजा झाला आहे, क्षत्रिय वैश्याच्या सेवेंत राहून लढाया लढतो, आणि ब्राह्मणांनीं वैश्याचें दासत्व स्वीकारलें आहे.

अिन्द्र — कुठें जन्म घ्यावा हें का माझ्या अिच्छेच्या आधीन आहे? जिथली ओढ मला ओढून नेअील तिथेंच माझें स्थान होअील.

बृहस्पति — आपण अिन्द्र होतों ही जाणीव —

अिन्द्र — या जाणिवेला मारून टाकून मर्त्यवासी होअून मगच मर्त्याची साधना करूं शकेन.

कार्तिकेय — अितके दिवस आम्ही पृथ्वीचें अस्तित्व पार विसरलों होतों. आज आपल्या या गोष्टी अैकून अेकाअेकीं मन कसें व्याकूळ होअून

गेलें आहे. ती तन्वी श्यामा धरणी सूर्योदय आणि सूर्यास्ताच्या द्वारानें स्वर्गाकडे किती अधीर नयनांनीं पहात असते. त्या भीरूचें भय नाहींसें करण्यांत कोण आनंद! त्या व्यथितेच्या मनांत आशेचा संचार करण्यांत केवढा गौरव! त्या चन्द्रकान्तमणि-किरीटिनी नीलाम्बरी-सुन्दरीला आपण राणी आहोंत याचा कसा बरें विसर पडला? तिला पुनः जाणीव करून द्यायला हवी कीं ती देवांच्या आराधनेचें निधान आहे. स्वर्गाची चिरदयिता आहे.

अिन्द्र — मी तिथें जाअून तिथल्या मलयानिलांतून ही गोष्ट वाहती सोडूं अिच्छितों कीं, तिच्या विरहामुळेंच स्वर्गाच्या अमृताला चव अुरली नाहीं, आणि नन्दनवनांतील पारिजात म्लान झाला आहे. तिला वेष्टून असलेला समुद्र म्हणजे स्वर्गाचे अश्रूच. त्यांच्या त्या विच्छेद-क्रंदनाला त्यानेंच तर अनन्त करून ठेवलें आहे.

कार्तिकेय — देवराजांची अनुमति असेल तर आम्हीहि पृथ्वीवर जाअूं अिच्छितों.

बृहस्पति — तिथल्या मृत्यूच्या अवगुंठनामधून अमृताच्या ज्योतीला अेकदां पाहून यावें म्हणतों.

कार्तिकेय — वैकुंठींच्या लक्ष्मीनें आपल्या मातीच्या घरांत जो नित्यनूतन लीलेचा विस्तार केलेला आहे त्याच्या रसापासून आम्ही कां म्हणून वंचित रहावें? मलाहि वाटूं लागलें आहे कीं, माझी पृथ्वीला गरज आहे. मी तेथें नसलेला बघूनच मनुष्य स्वार्थाकरितां निर्लज्ज होअून युद्धें करीत आहे, धर्माकरितां नव्हें.

बृहस्पति — आणि मी नाहीं म्हणूनच तर मनुष्य व्यवहाराकरितां ज्ञानाची साधना करतो आहे. मुक्तीकरितां नव्हे.

अिन्द्र — तुम्हां सर्वांनाच तिथें जावयाचा योग यावा म्हणूनच मी पुढें जात आहें — वेळ होतांच तुम्हीं सर्व पिकलेल्या फळाप्रमाणें आपापल्या माधुर्य भारानें अनायासेंच मर्त्यलोकांत गळून पडाल. तोंपर्यन्त धीर धरा.

कार्तिकेय — आम्हांला केव्हां कळेल, महेन्द्र, कीं आपली साधना सार्थ झाली आहे?

बृहस्पति,— तें कां लपून रहाणार आहे? जेव्हां शंखाच्या जयघोषानें स्वर्गलोक निनादेल तेव्हां आपोआपच समजावें कीं —

अिन्द्र — नाहीं, जयघोष व्हायचा नाहीं, देवगुरो. पण जे दिवशीं स्वर्गाच्या डोळ्यांत करुणेचे अश्रु चमकूं लागतील तेव्हांच मानावें कीं पृथ्वीवर मला जन्म मिळाला आहे.

कार्तिकेय — म्हणजे तोंवर आपण तेथल्या धुळीच्या आवरणाआड कुठें लपून असाल तें कळायला आम्हांला कांहीं मार्गच नाहीं.

बृहस्पति — पृथ्वीवरची गोडीच तर या लपंडावांत आहे. अैश्वर्य तेथें दरिद्री वेषानें वावरतांना दिसून येतें. शक्ति तेथें अशक्ताच्या अंगाखांद्यावर खेळत वाढत असते, वीर्य तेथें पराभवाच्या मातींतूनच आपला जयस्तंभ अुभारीत असतें. संभव तेथें असंभवाच्या आंत दडून राहिलेला असतो. जें दिसतें त्यालाच पृथ्वीवर मानूं जातां अुलट दिशाभूलच होते. जें दिसत नाहीं त्यावरच चिरकाळ भरवसा ठेवून वागायला हवें.

कार्तिकेय — पण सुरराज, आपल्या ललाटावरील चिरअुज्ज्वल ज्योति आज म्लान कां झाली आहे?

बृहस्पति — मर्त्य लोकीं जन्म घेण्यांत जो गौरव आहे त्या गौरवाची प्रभा आज अधिकच अुज्ज्वल होवो.

अिन्द्र — देवगुरो, जन्म घेण्यांत जी व्यथा असते ती या क्षणापासूनच मला पीडित करूं लागली आहे. आज मी दुःखाच्याच अभिसारार्थ बाहेर पडलों आहें — त्याचेंच आव्हान मला ओढून नेत आहे. शिवाबरोबर सतीचा जसा विघड झाला होता तसाच स्वर्गाच्या आनन्दाबरोबर पृथ्वीच्या व्यथेचा विघड घडला आहे — त्याच विच्छेदाचें दुःख अितक्या दिवसांनंतर आज माझ्या मनांत राशीकृत झालें आहे. त्याच व्यथेला हृदयासरशी कवटाळायला मी चाललों आहें. प्रेमाच्या अमृतानें मी त्या व्यथेला भाग्यशाली करीन. मला निरोप द्यावा.

कार्तिकेय — महेन्द्र, आमच्या साठींहि अशी कांहीं सोय करून ठेवा कीं जेणें करून आम्ही तिथें तुम्हांला सहज भेटूं शकूं. स्वर्ग आज दुःखाच्या मोहिमेवर बाहेर पडो.

बृहस्पति — आम्ही मार्ग मोकळा होण्याची वाट पहात राहूं देवराज. स्वर्गांतून बाहेर पडण्याचा मार्ग मोकळा करून द्या, नाहींतर आमची सुटका नाहीं.

कार्तिकेय — सुटका करा, देवराज, स्वर्गाच्या बंधनांतून आमची सुटका करा — मृत्यूकरवीं आमचा मार्ग मोकळा करवा.

बृहस्पति — तुम्ही स्वर्गराज आहांत. आज स्वर्गाचा तपोभंग करून तुम्ही घोषणा करा! कीं स्वर्ग पृथ्वीचाच आहे.

कार्तिकेय — आजवर ज्यांनीं ज्यांनीं म्हणून स्वर्गाच्या कामनेनें पृथ्वीचा त्याग करण्याची साधना केली, त्यांना त्यांना चिरकाळापासून पृथ्वीवर परत पाठविण्याचेच घाट तुम्ही घालीत आलांत — आज खुद्द स्वर्गालाच तुम्हीं त्या मार्गावर घेऊन जायला हवें.

अिन्द्र — या विघ्नांतच मुक्तीचा मार्ग —

बृहस्पति — जी मुक्ति स्वेच्छेनें — आनंदानें चिरकाल असल्या विघ्नांना तोंड देत आली आहे.

### गान

हे पथिका, ते पहा निघाले, ते पहा निघाले,<br>
तुझे सोबती टोळद्या टोळद्यांनीं निघाले.<br>
मी अन्यमनस्क होअून अेका कोपऱ्यांत पडून आहें.<br>
मी क्षणोक्षणीं चमकून, दचकून अुठतों,<br>
तोंच मला जळीं स्थळीं आकाशीं<br>
सहसा कुणाचा तरी पदध्वनि अैकूं येतो.<br>
हे पथिका, चालतां चालतां रस्त्यावरूनच तूं मला<br>
हांक मारून बोलावून घेअून जा.<br>
युगोयुगीं कितीदांतरी तूं माझ्या दारीं आला आहेस;<br>
म्हणूनच तर मला अेकाअेकीं<br>
माझ्या हृदयाच्या हृदयांत<br>
तुझी चाहूल लागते.

## निरूपण — स्वर्ग-मर्त्य

वेलीच्या अुंच मांडवावर अेक सुंदरसा भोपळा लटकत होता. आकाशाकडे पाहून तो म्हणतो — आकाशांत तरंगणाऱ्या या सूर्यचंद्रांत आणि माझ्यांत काय फरक आहे? या चंद्रासारखाच मीहि आकाशांत पिवळा जर्द लटकत आहे. अितक्यांत त्याचें लक्ष आपल्या देठाकडे गेलें. हिरमुसलें तोंड करून तो म्हणाला — या देठामुळेंच सर्व कांहीं बिघडलें आहे. मी पार्थिव आहें, जमिनीशी जखडलेला याची जाणीव करून द्यायला हा देठच कारण आहे. अेवढें बंधन जर दूर होअील तर मीहि या चंद्रसूर्यासारखाच आकाशस्थ गोल आणि दिव्य ज्योति होअीन.

अुत्कट वासना फुकट कशी जाणार? देठ तुटला. भोपळ्याच्या अगदीं मनासारखें झालें. पण —

रविबाबूंच्या कणिकांपैकीं अेक लहानशी गोष्ट जशी आठवली तशी वर लिहिली आहे. भोपळ्यानें पृथ्वीशीं असलेला आपला संबंध तोडतांच तो रप्कन खालीं पडला आणि व्यक्तित्वास मुकला. स्वर्गलोक आणि मर्त्यलोक म्हणे अेकेकाळीं अेकमेकाशीं जोडलेले होते. देव अनायासें पृथ्वीवर अवतरूं शकत आणि मानव सायासानें कां होअीना, स्वर्गाची सहल करून येअूं शकत. माणसांच्या लढायांत देव सहाय्य करीत यांत आश्चर्य तें काय! पण देवांवर तशीच बेतली तर कांहीं पुण्यश्लोक राजेदेखील स्वर्गीं जाअून, देवशत्रूंचा पराभव करून, देवराजाकडून झालेल्या गौरवानें धन्य होअून परत येत. पण पुढें स्वर्गाला वाटलें कीं यांत आपली अप्रतिष्ठा आहे. स्वर्गानें आपलें स्वतंत्र, अलिप्त, सार्वभौम अमरस्तान स्थापन केलें. स्वर्ग कांहीं मांडवावरील भोपळा नव्हता कीं ताबडतोब त्याचा कपाळमोक्ष व्हावा. पण स्वर्गाला त्याला हवें असलेलें पोषण मिळेना. स्वर्ग जसा निर्जर झाला तसा निर्जीवहि झाला. अिकडे स्वर्गप्रिया पृथ्वीदेखील झुरणीस लागली आणि म्हणूं लागली, 'विफल जगीं जीवित हें मम जाण.'

अशा प्रसंगीं देवराज अिन्द्र, देवगुरु-बृहस्पति आणि देवसेनापति कार्तिकेय यांचा झालेला संवाद कवींनीं संजय बनून नोंदून ठेवला आहे. संवादाचा सारांश देण्याचें कारण नाहीं. आणि सोपें ही नाहीं. आपल्या नशिबीं मरण लिहून ठेवलें आहे म्हणून पृथ्वीवरील माणसें दुःखी होतात, तर स्वर्गीचे अमर अिच्छितात कीं देवा 'मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां.' मरण आहे म्हणूनच जीवन फुलतें, समृद्ध होतें, कृतार्थ होतें. झोंपेवाचून जशी ताजगी नाहीं तसें मरणावांचून जीवन नाहीं. स्वर्ग आणि मर्त्य या लोकद्वयाचा विघड झाल्यानें ते दोन्ही लोक व्यर्थ झाले.

मनुष्य-जीवनांत देखील जेव्हां आदर्शाच्या आकाशांत मानव विहार करतो आणि जीवनाच्या वास्तवतेला विसरतो तेव्हां त्या गगनविहारामुळें जीवनविहार अगदीं संपुष्टांत येतो. हीच गोष्ट येथें कवीला विशद करून पटवावयाची आहे. पृथ्वीवरील क्षुद्र पणती आणि आकाशांतील दिव्य ज्योति या सख्ख्या बहिणी आहेत ही गोष्ट जेव्हां त्या विसरतात तेव्हां दिव्यज्योति देखील निष्प्रयोजन होतात. जीवनाच्या आदर्शानें आपलें डोकें हवें तेवढें अुंच करावें, पण त्याचे पाय मात्र वास्तवतेच्या भक्कम जमिनीवर अुभे असले पाहिजेत. नाहींतर डोकें जाअील राहूप्रमाणें भ्रमण करायला आणि मागें पडून राहील केतूचें निर्जीव आणि विकलांग कलेवर.

स्वर्गानें पृथ्वीपासून फारकत करून घेतलीच, आणि त्याबरोबर पृथ्वीवर येण्याजाण्याचा रस्ताहि तोडून टाकला. याचीच जणूं शिक्षा म्हणून आतां देवांना जेव्हां जेव्हां मर्त्य लोकावर येणें जरूरीचें वाटतें, तेव्हां तेव्हां त्यांना आपलें अमरत्व, आणि आपलें दिव्य कांतिमत्व सोडून देअून सामान्य मनुष्याप्रमाणें मरणधर्मी व्हावें लागतें. भूमि अपवित्र आणि स्वर्ग शुचि असा अहंकारी वर्ण-भेद केल्याचें हें प्रायश्चित आहे. अिकडे पृथ्वीदेखील आदर्शाशीं फारकत झाल्यामुळें निष्प्रभ झाली होती. क्षत्रिय लोक धर्मासाठीं न लढतां स्वार्थ-लोभासाठीं लढूं लागले. आणि बृहस्पतीचा आध्यात्मिक ब्राह्म आदर्श सुटल्यामुळें विद्वान देखील जीवन-अुपासना करूं लागले, केवळ भौतिक ज्ञान

आणि सामर्थ्यासाठीं; मुक्तीसाठीं नव्हें; आणि सगळ्याच मानवांचा स्वतःच्या आध्यात्मिक पुरुषार्थावरचा विश्वास अुडून जाअून वस्तूंचे ढीग रचण्याचाच त्यांना हव्यास लागला. साधना क्षीण झाली आणि साधनांचा ढीग मात्र वाढत चालला. स्वर्ग आणि पृथ्वी यांचें पुनः मिलन झालें पाहिजे. दोघांचा सडेपणा जाअून त्यांना सर्वोदयी गृहस्थाश्रम थाटतां आला पाहिजे, म्हणजेच अुभयांचें जीवन कृतार्थ होअील.

रविबाबू जर आपल्या दरेक गीतासाठीं अशीच अेखादी रूपक-कथा लिहिते तर काय बहार झाली असती! येथें आदीं आणि अन्तीं कविता आहेत तर मधला गद्य संवाद नितान्त काव्यमय आहे.

# कथिका

अेकदां वाटूं लागलें कीं माणसानें अन्यायाच्या आगीनें स्वतःचा भविष्यकाळ जाळून कोळसा करून टाकला आहे — आतां तेथें वसंत कधींहि येणार नाहीं आणि कोंवळ्या पानांची लवलवहि फुटणार नाहीं.

कितीतरी दिवसांपासून मनुष्य अेक आसन तयार करीत आहे. ते आसनच त्याला जाणीव करून देतें कीं त्याची देवता येणार आहे, ती रस्त्यावर येअून पोहोंचली आहे.

ज्या दिवशीं अुन्मत्त होअून त्यानें कितीतरी दिवसांचें तें आपलें आसन फाडून फेंकून दिलें त्या दिवशीं त्याच्या यज्ञस्थलीची भग्नवेदी म्हणाली, '(आतां) कांहींहि आशा करण्याजोगें नाहीं. कोणीहि येणार नाहीं.'

त्याचवेळीं सगळें आयोजन कचरा ठरलें, कचऱ्यांत जमा झालें. आतां चहूंकडून अैकूं येतें, 'जय, पशूचा जय.' आतां अैकतों, 'जसें आज तसेंच अुद्याहि. काळ आहे डोळ्यांवर झांपड बांधलेल्या बैलासारखा, अेकाच घाणींतून अेकच आर्तस्वर चिरकाळ निघत आहे. त्यालाच म्हणतात सृष्टि. सृष्टि म्हणजे आंधळ्याचें क्रंदन.'

मन म्हणालें, 'तर मग काय! आतां गाणें बंद करून टाकावें. जें आहे त्याच्याच केवळ ओझ्यामुळें चालतात भांडणें, जें नाहीं त्याच्या आशेवर चालतें गाणें.'

लहानपणापासून ज्या मार्गाकडे पाहून वारंवार मनाला आगमनीची झुळुक स्पर्श करी — ज्या मार्गाला क्षितिजाकडे कान लावून पसरलेला पाहून वाटायचें कीं त्या तिथून रथ बाहेर निघाला आहे — त्याच मार्गाकडे आज न्याहाळून पाहिलें; वाटलें, तेथें नाहीं कुणा येणाऱ्याची चाहुल कीं नाहीं कुणा घराचा मागमूस.

वीणा (वैतागून) म्हणाली, 'दीर्घ मार्गावर माझ्या सुराला साथ देणारें कुणीच नसेल तर मला रस्त्याच्या कडेला फेकून दे.'

तेव्हां मी रस्त्याच्या कडेला पाहिलें. चकित होऊन पहातों, तों धुळीमधें आहे अेक कांटेरी झाड, त्यावर फुललें आहे अेकुलतें अेक फूल.

मी अेकदम अुद्गारलों, 'ओहोहो, ही तर पावलाची खूण!'

मग दिसलें, क्षितिज पृथ्वीच्या कानाशीं कुजबुज करीत आहे. आणि दिसलें, आकाशा आकाशांत प्रतीक्षा भरली आहे. पुढें दिसलें, चंद्राच्या प्रकाशांत तालवृक्षाचें पानन् पान थरथरत आहे; वेळूकुंजाच्या फटींतून सरोवराच्या जळाशीं चंद्राची नेत्रपल्लवी चालली आहे.

रस्ता म्हणाला, 'भय नाहीं.'

माझी वीणा म्हणाली, 'सूर लाव. सूर.'

## निरूपण — कथिका

पूर्व आफ्रिकेच्या पलीकडे रुआंडा-अुरुंडीच्या रमणीय प्रदेशांत हिंडत असतां अेका पहाडाच्या व सरोवराच्या मध्यें काळा ठिक्कर लाव्हा पसरलेला पाहिला. जेथें पहावें तेथें लाव्हा रसाचे असंख्य भोंवरे थिजून व सुरकतून तडकलेले होते. जणूं सर्वनाशाचें साम्राज्य. ज्वालामुखी फाटून तीनेक वर्षें झालीं होतीं.

कांहीं मैल पुढें गेलों तों-तेरा वर्षांपूर्वीच्या अशाच अेका ज्वालास्फोटाचें तसेंच दृश्य. मात्र येथें कालबलानें थोडा फरक झाला होता. लाव्हारसाच्या पिचलेल्या कोळशांच्या खबदाडांत वाऱ्यानें थोडीथोडी माती आणून टाकली होती. आणि त्या मातींतून कोवळीं कोवळीं गवतें आपल्या हरितपर्णाच्या गोजिरवाण्या पताका नाजूकपणें हलवीत जीवनाचा विजय जाहीर करीत होतीं.

सर्वनाश कितीहि भीषण असो, अल्पजीवी असतो. त्याच्या डोक्यावर माती व पाणी शिंपडून प्राणमय जीवन आपलें सनातन मांगल्य मिरवल्यावाचून रहात नाहीं.

गवताचे अंकूर आणि काटेरी झुडपावरील फुलें जीवनदेवतेच्या पावलांच्या अचूक खुणा बनून आपल्याला आस्तिकतेची आणि अमर श्रद्धेची दीक्षा देत असतात.

---